ॐ

श्रीमद्भगवद्गीतेतील

# कृष्णांचा आत्मसाक्षात्कार



॥ हाच भारताचा निधर्म ॥





लेखक:-

**नीलकंठ विष्णु तुळपुळे.**



अंबुरा[illegible]राज
पुण्य तिथी.

संस्थापक:-
सुबोध गीता कार्यालय
श्री क्षेत्र गाणगापूर

किमत पांच रुपये

# अनुक्रमणिका



## सुबोध–गीता अध्याय.

# कृतज्ञता दिग्दर्शन.

या " सुबोध-गीता " मंदिराचा पाया रचतांना रामकृष्णापुरचे स्टेशन मास्तर श्रीयुत जयंतराव पाटील, व श्रीयुत बेलापूरकर इंजिनियर यांच्या पत्नी सौ. ताराबाई बेलापूरकर, या दोघांचे अनपेक्षित अमूल्य साहाय्य मिळालें. नंतर गाणगापूरला गेल्यावर श्रीमंत बाबासाहेब चौडापूरकर व त्यांचे बधू श्रीमंत बाबूराव चौडापूरकर या बंधुद्वयांनीं मला राहण्यास उत्तम निवांत अशी आपल्या घरीं, स्वतःचीं गैरसोय करूनही, जागा दिली व वेळोवेळीं स्वकीयतेनें सक्रिय सहानुभूति दाखविली आणि त्या मुळेंच हें पुस्तक मला लिहितां आलें, विद्वद्रत्न गुरुवर्य विठ्ठलशास्त्री यांनीं प्रास्ताविक आशीर्वाद दिल्यामुळेंच त्यांचे कृपेनें वाचकांपुढें उभें राहण्याचा धीर आला, शाब्दे परेच निष्णात् श्री प्रभुदास आप्पासाहेब महाराज देशपांडे ( बी. ए. एल् एल् बी. रीजन्ट, श्री माणीकनगर संस्थान ) यांच्या. " सकलमतस्थापित " **"श्री माणीक प्रभू सांप्रदायाच्या यथार्थतेमुळेंच "** माझें लिखाण उजेडांत येऊं शकलें. शेवटीं डॉक्टर रामभाऊ काकडे यांनीं मनावर घेतल्यामुळें श्री प्रेसचे मालक श्रीयुत सुभाषचन्द्र हिरालाल चवडे यांचें प्रेसमध्यें पुस्तक छापण्याची व्यवस्था झाली व श्रीयुत चवडे यांनींही ही श्रीकृष्ण सेवा अत्यंत प्रेमानें आणि भक्तिपूर्वक केली. मला बाहेर फिरतेच रहावें लागत असल्यामुळें प्रुफें तपासण्याची वगैरे सर्व कामें श्रीयुत प्रभाकर विश्वंभर पानसे, व त्यांच्या पत्नी सौ० मिराबाई प्रभाकर पानसे व महाराष्ट्रांतील एक प्रमुख व्यापारतज्ञ व तत्त्वज्ञ श्रीयुत दत्तात्रेय बाळकृष्ण बर्वे, बी. ए., या तिघांवर पडलीं व ती त्यांनीं आनंदानें पत्करून पुरीं केलीं.

या सर्वत्रांचे आम्हीं उभयतां सदैव ऋणी आहों !

लेखक व प्रकाशक.

# वाचकांना थोडी विनंति.

माझ्या आयुष्यांत जी कांहीं अल्पस्वल्प कमाई मी केली, ती आपल्या स्वाधीन केलेली आहे. मराठी न जाणणाऱ्यांची सोय आतां कर्तव्य आहे. म्हणून " सुबोध – गीता कार्यालयांची " स्थापना करून ही मुहूर्तमेढ रोवली. पुस्तक वाचून झाल्यावर या पुस्तकाचीं भाषांतरें होऊन इतरांनाही त्याचा उपयोग व्हावा, असें आपल्यास वाटल्यास, आपण यथानुशक्ति या कार्यास मदत करावी, व गीता प्रचाराचे पुण्य पदरीं बांधावें अशी सर्वांस कळकळीचीं व आग्रहाची विनंति आहे. जगांतील दोनशें भाषेंतून याचा प्रसार व्हावा अशी इच्छा आहे व तेवढया भारी खर्चाकरतां सरकार व जनता दोघांच्या ही मदतीची आवश्यकता आहे. संपूर्ण बायबलचे भाषांतर दोनशें मुख्य भाषांतून व बायबलचें कांहीं भाग ११८० आकराशें एंशी पोट भाषांतून झालेले आहेत, त्या मानानें गीतेसारखा तत्वज्ञानांतील उत्कृष्ट ग्रंथ व्हाव्या तितक्या भाषांत प्रसिद्ध झालेला नाहीं हें पाहिलें म्हणजे भारताच्या औदासीन्या-बद्दल खेद वाटतो, भगवान श्रीकृष्णच या कार्याविषयीं भारताला स्फूर्ति देवोत.

लेखक — नीलकंठ विष्णु तुळपुळे,



# विद्वद्रत्न विठ्ठलशास्त्री रामशास्त्री पुजारी यांचा

## प्रास्ताविक आशीर्वाद

॥ श्री गुरुभ्यो नमः ॥

गीताभाष्यांतील, "अर्जुनं निमित्यकृत्य आह भगवान् वासुदेवः" या प्रमाणावरून, श्रीमद्भगवद्गीता हा ग्रंथ भगवान् श्रीकृष्णांनीं, अर्जुनाला उपदेश, या रूपानें सर्व जनांस अज्ञानांधःकारांतून बाहेर काढण्या करतां केला, हें अखिल भारतीय लोकांनां विदित व मान्य आहे, यांत शंका नाहीं. या भारतभूमींत जेवढें म्हणून प्राचीन व अर्वाचीन अध्यात्मिक ग्रंथ व लेख आहेत, त्यांत गीते सारखा जगमान्य असा दुसरा ग्रंथ नाहीं.

अध्यात्मिक विषय किती मोठा व महत्वाचा आहे, या विषयीं भगवानच साक्ष देत आहेत. "अध्यात्म विद्या विद्यानां" या वाक्यानें सर्व विद्येपेक्षां हीच विद्या सुखदायी ठरते. बाकीच्या विद्या जन्मजन्मांतरांत दुःखद व कालहरणात्मक अशा मानल्या जातात. लक्षचौऱ्यांशी जन्मामध्यें एकच मानवजन्म सर्व दुःख दूर करून संपूर्ण सुखी होण्यास कारणीभूत होऊं शकतो. म्हणून मानवांनां खरें सुखसाधन जर कोणतें असेल तर तें हेंच अध्यात्म ज्ञान होय. या वांचून दुसरें साधनच नाहीं, याला, "ज्ञानादेव तु कैवल्यं" हें भगवंतांचेंच वचन प्रमाणभूत आहे. हें अध्यात्मज्ञान इतकें महत्वाचें आहे कीं, प्रारब्धानुगत जीवात्मा या ज्ञानानें त्रिविध प्रारब्धकर्मांनां जाळून परमात्मपदाला पोंचूं शकतो. बाकीच्या कोणत्याही साधनानें प्रारब्ध सुटत नाहीं, हें ही, "ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुतेऽर्जुन" असें भगवानच आपल्याला सांगतात; म्हणून भगवंतांच्या सांगण्याप्रमाणें वागून जीवानें सुखी व्हावें हेंच योग्य ठरतें. हाच विषय भगवद्गीतेमध्यें श्रीकृष्णानीं विवरण करून सांगितलेला आहे. या ज्ञानप्राप्तीकरतां साधनें किती आहेत. तीं कशीं अमलात आणावी व त्यांत अडथळे आल्यास ते कोणत्या साधनांनीं दूर सारावेत, वगैरे सर्व सांगोपांग विषयांची चर्चा ह्यांत केलेली आहे. तथापि सामान्य बुध्दीच्या मानवानां हे दुर्बोध झालेले विषय सुबोध रूपानें कळवून जनताजनार्दनाची सेवा व्हावी, या हेतूनें हा ग्रंथ तयार करावा, म्हणून

बरींच वर्षे याचा व्यासंग करून यांतील विषय "आत्मसाक्षात्कार" या पुस्तकांत लेखकानें सामान्य बुध्दीला पटविण्या सारखें लिहिले आहेत.

प्रस्तुत लेखक श्री. नीलकंठ विष्णु तुळपुळे हे पुण्याहून श्रीक्षेत्र गाणगापूर येथें श्री सेवेकरितां आले, व त्या प्रमाणें त्यांनीं श्रीसेवारूप श्रीगुरू चरित्राचे सप्ताह करण्यास सुरवात केली. पवित्र भूमीत आपला हेतू लवकर सफल होईल म्हणून येथील संगमावर जाऊन आपलें कार्य आरंभिलें. भावनेंप्रमाणें श्रीकृपें त्यांनां लवकरच अनुभव येऊं लागला, आणि बरेच दिवस ज्यासंबंधी शंका होती ती दूर होऊन ग्रंथलेखनाचें कार्य निःसंशय चालू झालें. त्यांतील गूढ विषयाचा उलगडा एकाएकी स्फुर्तीनेंच होऊं लागला. सर्व विषय लिहून झाल्यानंतर, "बलवदपि शिक्षितानां आत्मन्य प्रत्ययं चेतः" या कालिदासोक्ती प्रमाणें संदिग्ध होऊन, हा लेख कोणातरी विद्वानांना वाचून दाखविल्याशिवाय समाधान होणार नाहीं, असें वाटून, येथें नित्य पुराण सांगणारे विद्वानच असणार या कल्पनेनें ते माझेकडे एका सद्‌गृहस्थानां बरोबर घेऊन आले. आपला हेतू मला कळवून, नित्य थोडेंथोडें वाचन करून सर्व लेख त्यानीं ऐकविला व नंतर माझें मत चार शब्दांनीं लिहून द्यावें अशी सूचना केली.

माझ्या अभिप्रायाची अपेक्षा माझ्या स्नेह्यानीं केली, यावरून त्यांच्या पेक्षां मी ज्ञानानें श्रेष्ठ आहे, असा अर्थ नाहीं, तर केवळ प्रेमाची ती देवघेव आहे असें मी समजतों. कारण मी कांहीं असा मोठा लेखक अगर वक्ता नाहीं, उलट मला असें वाटतें कीं, ही एक माझी परीक्षाच आहे; यांत उत्तीर्ण झाल्यास आनंद होईल.

ग्रथ लेखकांनीं यांतील बऱ्याच विषयांवर सत्पुरुषांची उदाहरणें व आधार वचनें दिलीं आहेत. या वरून त्यांचा बराच काळ सत्समागमांत गेला हे स्पष्ट व्यक्त होतें. "काहीं कठिण विषय श्रीकृपें उलगडलें" असे म्हटल्यावरून यांत, माझें व अहं ही वृत्ति न आढळतां जुन्या ग्रंथकारांचीच परंपरा दिसून येते व लेखकाच्या मनाचीही पारख होते. औधत्यपरिहारात्मक गुण लेखकास असल्यास तो लेख सर्वमान्य होतो, असा अनुभव आहे, व यास "ईश्वरःसर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति" असें भगवदुक्ति प्रमाणही आहे.

ग्रंथांतील विषयाची मांडणी सर्व पौर्वात्य व पाश्चिमात्य आधुनिकांस पटेल, अशीच दिसून येते. सामान्यतः अध्यात्मिक ग्रंथांतून क्लिष्ट वेदांत किंवा नुसतें भक्तीचेच गौरव केलेले एकांगी विषय पुष्कळदां दिसून येतात. परंतु या लेखकांनीं भक्ति, ज्ञान, कर्म बुध्दितत्व वगैरे शब्दांची व्याख्या स्पष्ट खुलासेवार सर्वांना पटण्यासारखी केली आहे, व शक्य तितकें वेदांत पारिभाषक शब्द टाळून, सोपे शब्द वापरून वाचकांना कंटाळवाणें होणार नाहीं अशी दक्षता बाळगलेली आहे.

या ग्रंथांत व्यास निर्मित गीतेहून निराळीच पध्दत रचलेली आहे. कारण, अर्जुनासारखें बुध्दिवान् व मेधावी लोक फारच थोडे आढळतात, तेंव्हां सर्वोपयोगी ग्रंथ व्हावा याच हेतूनें अशी रचना केलेली आहे. तथापि त्यांत मूळ ग्रंथांतील एकही श्लोक गाळलेला नाहीं. फक्त निरनिराळ्या विषयांचें वेगवेगळ्या ठिकाणीं पसरलेले श्लोक वेचून विषयवारीनें एके ठिकाणीं करून त्यांची संगतवार प्रकरणें मांडून विषय सुबोध केला आहे.

तसेंच मुख्य विषयाचा मुद्दाही परंपरे प्रमाणेंच ठेवला आहे. "आत्मा वा रे द्रष्टव्यः" अशी श्रुत्युक्त पध्दतीच मानून आचार्य, ज्ञानेश्वर, समर्थ तुकाराम वगैरें सत्पुरूषांचेंच अनुकरण यांत दिसून येतें. मानव प्रयत्न काय आहे, तो कोठ पर्यंत जाऊं शकतो व पुढें सत्समागमानें कोणतीं भूमिका प्राप्त होते वगैरे विषय बरेच विवरण रूपानें लिहिलेले यांत आढळतात.

एकंदर ग्रंथांत दहा प्रकरणें करून त्यांत आठरा अध्यायांचा विषय आणलेला आहे. त्यांत महत्वाचें विषय म्हणजे बुध्दितत्व, नामस्मरण व तद्वारा श्वासोश्वास नांवाचीं तीन प्रकरणें हीं खरोखरच वाचनीय आहेत. ईश्वराने जीवांनां स्वस्वरूप जाणण्या करतांच हीं मन, बुध्दि, इंद्रियें व प्राण इत्यादिक दिलेली आहेत हें "मनुष्याधिकारत्वाच्छास्त्रस्य" या सूत्रानें सिध्द होते. ही साधनें ज्या करतां दिली, तिकडे यांचा उपयोग न करतां भलत्याच प्रापचिक विषयाकडे करून त्यामुळें दुःख परंपरात्मक जन्मजन्मांतर भोगणें हें मानव कर्तव्य नव्हें, तर "बुध्दियुक्तोजहातीह उभे सुकृत दुष्कृते" या भगवदुक्ता प्रमाणें बुध्दि ही भगवंताकडे लावून कर्म केल्यास तें कर्म बाधक न होतां मोक्षदायक होईल व हेंच मनुष्यानें खरे कर्तव्य ठरेल. कंडूरोग झालेल्या माणसांना

केळी बाधक होतात, पण तींच केळी गंधक घालून दिलीं तर तो रोग घालवतात. त्याचप्रमाणें नामस्मरणयुक्त बुध्दीनें केलेलें कर्म बाधक न होतां पोषक होऊं शकतें. शरीरामध्यें पुष्कळ साधनें शरीरोपयोगीं अशी आहेत, पण त्यांत बुध्दि इतकें महत्व कोणत्याच साधनांला देतां येत नाहीं; कारण एकटी बुध्दीच सर्व जगालां म्हणजे विज्ञानाला जाणणारी असून शिवाय ती परमेश्वरालाही जाणूं शकते. हें "बुध्दिग्राह्यमतींद्रियं" या विधानांत भगवंतानींच स्पष्ट सांगितलें आहे. इंद्रियें, मन इत्यादिकांना अगोचर असें ब्रम्ह बुध्दीला पटूं शकतें हा सिध्दांचा स्वानुभव आहे व तो कोणालाही प्रत्यक्षावगम होईल असें ठरल्यावर, "दिसतें तेंवढेंच सत्य मान्य व न दिसणारें तें सर्व अमान्य व असत्य,-- हें आधुनिक चार्वाकांचें मत फोल होईल, यांत शंकाच नाहीं.

प्रस्तुत लेखकांनीं, "श्वासोच्छवासद्वारा नामस्मरण केल्यानें मानवाचें जीवित सफल होईल-" असें लिहिलें आहे, तेंही अत्यंत महत्वाचें आहे. यास "बुध्दींद्रियमनःप्राणान् जनानामसृजत्प्रभुः मात्रार्थं च भवार्थंच आत्मनेऽकल्पनायच" ही श्रीमद्भागवत दशमस्कंध अध्याय ८६, वेदस्तुति अध्यायांत श्रीशुकाचार्यांनीं परिक्षितीच्या प्रश्नाला उत्तर रूपानें दिलेली भगवदुक्ति प्रमाणभूत आहे. एकें ठिकाणीं, "त्रैगुण्य विषया वेदाः" असें सांगून, बुध्दि ही वेद विवरण करण्या करतां असें म्हटलें, व दुसऱ्या ठिकाणीं "वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो" या वचनानें बुध्दि ही आत्मप्राप्तीकरतां आहे असें सांगितलें, त्यामुळें परस्पर विरोधी वाक्यें एकाच ग्रंथांत आढळून येतात, परंतु भगवान सिद्धांता विरूद्ध सांगणार नाहींत हें लक्षांत घेऊन नीट विचार करून, वेदांस खोटेंपणा न देतां वचनांची एक वाक्यता करावी, हेच बुद्धीचें कार्य आहे. त्याच प्रमाणें इंद्रियें विषयासक्त झालीं असतां प्रपंचाची वाढ होते, आणि मन पूर्व कर्मयुक्त असलेल्या बुद्धीनें वियुक्त झालें असतां जन्मांतर व लोकांतरास जातें. तसेंच प्राण हे गोपिके प्रमाणें "मद्गतप्राणाः" केलें असतां "माझी प्राप्ति" होते, हाच "अकल्पनायच" याचा उघड अर्थ आहे. म्हणून प्राण ईश्वरानें निर्माण केलें ते केवळ अन्न पचनार्थ केलेंलें नाहींत, अन्न पचन हे प्राणांचें मुख्य कर्तव्य नाहीं, तर तें सहज होणारें गौण कार्य आहे. मानवजन्म नुसतां जगण्याकरतां नाहीं, तर अनंत असे आत्मसुख प्राप्त करुन घेण्याकरतां ईश्वरानें दिलेला आहे. नामस्मरणानें त्याचा योग्य उपयोग करुन जन्म

साफल्य मिळवलें नाहीं, तर ईश्वरी कायद्याप्रमाणें जन्मजन्मांतर भोगणें प्राप्त होईल हे विसरुन चालणार नाहीं.

गीतेचा मुख्य विषय ज्ञानप्राप्ति हा आहे, व त्याला आवश्यक अशी इतर साधनें, कर्म, उपासना, योग वगैरे कशीं करावीं यासाठीं त्या त्या ठिकाणचीं वाक्यें एकत्र करुन त्याचा उहापोह चांगल्या रीतीने सुचविलेला या लेंखांत दिसून येतो. कित्येक ग्रंथांतून ज्ञानाचा गौरव करतां करतां इतर कर्मादिकांची खंडना आढळून येते. पण या लेखांत तसा प्रकार नाहीं, हे कौतुकास्पदच वाटतें.

कितीही लिहिलें तरीं प्रत्यक्ष ग्रंथ वाचल्या वांचून ग्रंथाचा आस्वाद मिळणें अशक्यच आहे. वाणीलाच आस्वाद मिळाला असता तर कोणीही पदार्थ सेवन केलेंच नसतें. तेव्हां माझी विनंती अशी कीं, एकवेळ ग्रंथ वांचूनच याचें महत्व काय तें पहावें. हा अध्यात्म विषय लेखकांनीं केवळ स्वबुद्धीनें लिहिलेला नसून सद्गुरूंच्या आज्ञेनें लिहिलेला आहे, हें लेखकांच्या प्रस्तावनेवरून स्पष्टच सिद्ध होतें.

माझ्या अल्प मतीनें जे चार शब्द लिहितां झाले तें लिहून लेखकांच्या ऋणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न केला आहे. याचप्रमाणें जाणत्या माणसांनींही त्यास आपल्या ज्ञानशक्तीनें उज्वलित करावें; कारण वस्तु अमोल असली तरी आपआपल्या ज्ञानाप्रमाणेंच तिची किंमत होत असते. अस्सल हिरा असला तरी अज्ञ माणसांना गारगोटी सारखा वाटतो, रत्नपारख्यामीच त्याची किंमत केल्यास खरी किंमत होईल.

हां ग्रंथ सर्वोपयोगी व्हावा हीच श्रीचरणीं विनंति करून हे प्रास्ताविक शब्द पुरें करतो.

आपला स्नेहांकित

दिनांक २४–६–१९५६ } **विठ्ठलशास्त्री रामशास्त्री पुजारी**
श्रीक्षेत्र गाणगापूरकर.

# प्रस्तावना.

विश्वाचें हें आमुचें वैभव गाजे । आम्ही दुनियेचे राजे ॥
निळ्या नभीं रत्नांच्या तळपति ज्योती ।
भूमींतहि अगणितही माणिक मोतीं ॥
दाहि दिशा विश्वंभर रूपचि गाजे । आम्ही दुनियेचे राजे ॥
धूळींतुनीं सोन्याच्या राशींच उभारूं । किमया करूं ॥
तप अवघे कष्टाचे आचरूं ।
आनंदे जग भारूं ॥ सुख शांती करूं ॥
देवाचें छत्र शिरीं नित्य विराजें । आम्हीं दुनियेचे राजे ॥

आजकाल पुष्कळांच्या कानांत गुणगुणत राहिलेलें हें पद किती गोड आहे!

ही विशाल कवि कल्पना, कां मानवी हृदयाची उदात्त भावना! यांत वैराग्याची रड नाहीं, त्यागाची धडपड नाहीं, की मुक्तीची गडबड ही नाहीं; लोकोत्तर पुरूषांचा हा आत्मविश्वास, कां विश्वप्रेमाचा आत्मसाक्षात्कार!

कल्पना मिथ्या असते, भावना चंचल असते, वैराग्यांत विषाद असतो, त्यागांत दमदारपणा नसतो, तर मुक्ति उतावीळ असते; आत्मविश्वास अव्यक्त व मर्यादित असतो; आत्मसाक्षात्कार सत्य आहे, नित्य आहे, पूर्ण आहे, आनंदमय असून तो धीरोदात्त व गंभीर आहे; प्रेमानें सर्व विश्वाला व्यापून शांतिसुखाचा लाभ देणारा हा योगेश्वर प्रति श्रीकृष्णच आहे!

'आत्मसाक्षात्कार' हा शब्द ऐकल्या बरोबर, त्यांत कांहींतरी विशेष चमत्कार भरलेला आहे, व तो आपणांस पाहण्यास मिळावा असें प्रत्येकाला वाटूं लागतें. श्रीज्ञानेश्वर महाराज, श्रीतुकाराम महाराज अशां सारखे जून्या काळचे संत, किंवा अगदीं अलीकडील श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानंद, वगैरे सत्पुरूष, हें सर्वजण 'आत्मसाक्षात्कारी' म्हणून सर्वांच्या नित्याच्या परिचयाचे आहेत. थोर

विभूति, म्हणून प्रत्येकाला त्यांचेबद्दल आदर आहे; परंतु खरोखर आत्म साक्षात्कार म्हणजे काय, याची कल्पना फारच थोड्यां लोकांनां असूं शकते- नेमके बोट ठेऊन, 'आत्मसाक्षात्कार' म्हणजे स्थिति, असें अगदीं- सोप्या शब्दांत मला कोठेंही वाचावयाला सांपडलें नाहीं, किंवा बोलके वेदान्ती ही यथार्थ पणें नीट सांगूं शकलें नाहींत. जो तो म्हणे; गुरुकृपे खेरीज हें कळणार नाहीं.

तेव्हां, शाब्दे परेच निष्णात् म्हणवून घेणाऱ्या व्यक्तींच्याकडे धांव घेतली. त्यांनीं कानावर हात ठेऊन, — संताना शरण जा — 'तव्दीद्धि प्रणिपातेन' असें सांगून, श्रीकृष्णां प्रमाणें आपले अंग काढून घेतलें. आम्ही ज्या सत्पुरुषांनां आप्तवाक्य प्रमाण मानतों, त्यांना तुम्ही भेटा, असा सल्ला मिळाला. स्वानुभवाची ग्वाही दिल्यावरून, विजापूर जवळच हिंचगेरी या खेड्यांत राहणारे, श्री सद्गुरु अंबुराव महाराज, यांचे दर्शनास मी सन १९१९ मध्यें गेलों व चैत्र शु. १४ शके १८४१ ला त्यांचेकडून अनुग्रह घेऊन परमार्थाच्या वाटेला लागलों. त्यावेळीं मी मुंबईच्या ग्रँन्ट मेडीकल कॉलेज मध्यें इंटर एम् बी. बी. एस् च्या वर्गांत शिकत होतो.

श्री अंबूराव महाराजांनीं सांगितल्या प्रमाणें परमार्थाचा अभ्यास करीत असतां, श्री शंकराचार्यांच्या 'योग तारावलींतील, अनाहत ध्वनी, तेज, बिंदुलें.शेष, नील,-प्रकाश वगैरे निरनिराळे कांहीं अनुभवही माझ्या प्रत्ययाला येऊं लागलें, परंतु कितीही अभ्यास केला तरी त्यापुढें पाऊल पडेना व यांतून शेंवटीं काय निष्पन्न होणार हेंही कळेना. अभ्यास चालूं ठेंवा, त्यांतच सर्व कांहीं कळून येईल, याच्या पलीकडे कोणीच कांही खुलासा करीना व तेवढयानें बुध्दीचें समाधान होईना ! या सुमारास म्हणजे सन १९३४ मध्यें श्री अंबुराव महाराज समाधिस्थ झाले, त्या मुळें पुढे त्यांचे कडून कांहीं कळण्याची ही शक्यता नाहिशी झाली.

याच वेळीं श्री मद्भगवद्गीता वाचण्याला सुरवात केली. पण शब्दज्ञाना पेक्षां त्यांत विशेष कांहीं कळेना व त्यांतही योग, कर्मयोग,

संन्यास वगैरे विषयांनीं शब्दच्छलानें घोंटाळाच उत्पन्न होऊं लागला. मी मी म्हणविणाऱ्या एकाहून एक थोर अशा आचार्यांमध्यें निवांतपणींही जिच्या निश्चित रूपरेषे विषयीं वाद माजून राहिले, ती गीता, लढाईच्या ऐन वेळीं रणांगणावर अर्जुनाला कितपत समजली असेल व ज्ञान होऊन नंतर तो लढाईला तयार झाला असेल, याची दाट शंका येऊं लागली, मन अस्वस्थ झालें व कांहीं दिवस गीता बाजूला ठेऊन दिली.

सन १९४१ मध्यें सहज एका सत्पुरूषांचें दर्शन घडलें. - पुण्यांतच वास्तव्य करणारे, श्री. मारुतीराव सयाजीराव बरके ऊर्फ माळी महाराज यांची तत्पूर्वी भेट होऊ शकली नाहीं, हीही एक भवितव्यताच म्हटली तरी चालेल. माळी महाराजांचा मला पुढें सतत नऊ वर्षें, स. १९५० मध्यें ते समाधिस्थ होई पर्यन्त, सहवास घडला. त्यामुळेंच, स्थितप्रज्ञता म्हणजे काय, हें मला प्रत्यक्ष पाहतां आलें, व गीतेंतील कांहीं खाचाखोचांचा अर्थही सप्रयोग पडताळून पाहतां आला.

श्री माळी महाराज, एक निरक्षर टांगेवाला म्हणून व्यवहारांत प्रसिध्द होते, परंतु परमार्थात स्वानुभवानें ते पूर्ण आत्मसाक्षात्कारी महासागरच बनले होते ! याचा अनुभव त्यांचेकडे येणाऱ्या लहान मोठ्या शेंकडों व्यक्तींनीं घेतलेला आहे, आफ्रिकेंपासून लोक त्यांचे जवळ येऊन गेलें. हे लोक आल्या बरोबर माळी महाराज त्या लोकांची जन्मापासूनची सर्व हकीगत त्यानां सांगत, त्यांच्या वाडवडिला पासूनची सर्व माहिती त्यांना देत व कुळधर्माची वगैरे सर्व कल्पना देऊन आपल्या विषयीं प्रथम श्रध्दा उत्पन्न करीत व नंतर त्यांना योग्य मार्ग सांगून त्यांच्या अडचणींतून मोकळें करीत - नमुन्या करतां, प्रत्यक्ष घडलेंल्या शेंकडों गोष्टीं पैकी, एक हकीगत सांगतो.

मुंबईच्या एका मोठ्या बोट कंपनीचे एक डायरेक्टर माळीबुवांचे भक्त होते. इंग्लन्ड मधील एक बोट त्यांना विकत घ्यावयाची होती, त्या करतां ते सल्ला विचारण्या करितां बुवासाहेबांचें कडे आले असतां, बुवासाहेबांनीं त्या बोटीचें सर्व वर्णन बसल्याजागींच करून, ती बोट जरूर

विकत घेण्याचा सल्ला दिला. त्या प्रमाणे विलायतेला जाऊन डायरेक्टरनीं ती बोट खरेदी केली; मुंबई बंदरांत तीन महिने पर्यंत ती बोट चांगली चालली परंतु एकदम एक दिवस बंद पडली. बरीच खटपट करूनही त्यांच्या अमेरिकन इंजिनिअरनां ती बोट चालू करतां येईना. तेव्हां मुद्दाम ते डायरेक्टर पुण्याला बुवासाहेबांचेकडे आले. त्या वेळीं विडी ओढतां ओढतां सहज, महाराजांनीं बोटीच्या कोणत्या भागांत व यंत्रांत बिघाड झाला आहे हें सांगून तुमच्या इंजिनियरनां त्यांकडे नजर टाकण्यास सांगा म्हणजे बोट सुरु होईल' असें आश्वासन दिलें. त्या प्रमाणें मुंबईला जाऊन डायरेक्टरनीं ती बोट दुरुस्त करून घेतली व पुढें ती फारच फायदेशीर ठरली.

त्यावेळीं "बोटीच्या यंत्रांची बिघडाबिघड येथें बसून आपण कसें सांगू शकलात," असें मी त्यांना विचारलें असतां, बुवासाहेब एकदम आपल्या छातीकडे बोट दाखवून म्हणाले, " अहो जो येथें आहे तोच बोटींत आहे ! मग हें कळणें काय अवघड आहे ? आपलें पोट दुखूं लागलें तर आपण नाहीं का, अमक्या ठिकाणीं पोट दुखतें म्हणून डॉक्टरला सांगत ? त्याच प्रमाणें हें आहे सर्व जग आपलेंच शरीर आहे. देव व आपण कां वेगळे कां आहोंत ? प्रपंच व परमार्थ एकच आहेत."

अशा तऱ्हेनें महाराज संसारिकाना संसारी प्रश्नांतून मोकळे करीत व पारमार्थिकांनांही संशय निरसन करून योग्य तऱ्हेनें पुढील मार्गाला लावीत, " विश्वांत परमेश्वर " व " परमेश्वरांत विश्व " या गीतेंतील पुनः पुनः सांगितलेल्या वाक्यांचा उलगडा मला तेथेंच पहावयास मिळाला. भागवतांतही याच स्थितीला अत्यंत महत्व दिलें आहे.

**सर्व भूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।**
**भूतानि भगवत्यात्मनि एष भागवतोत्तमः ॥**

सर्व उपनिषत्कार एक मुखानें हेंच तत्व सांगत आहेत.

**यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानु पश्यति ।**
**सर्वं भूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥**

साधकाला येणारे, योगतारावलींतील अनुभव ही तुर्यावस्था आहे, व "विश्वांत परमेश्वर" या स्थितीचा तो द्वैती अनुभव आहे; बाह्य विश्वांत व स्वतःचें ठिकाणींही, परमेश्वराचें निर्गुणत्व, या तुर्यावस्थेंत कळूं शकतें; परंतु "परमेश्वरांत विश्व" हा अनुभव स्वतः परमेश्वर बनून, "मीच परमेश्वर व माझ्यांतच विश्व आहे" असें कळून आल्यानंतर उन्मनी अवस्थेंतच येऊं शकतो तुर्यावस्थेंत परमेश्वरांचें निर्गुणत्व अनुभवाला आलेलें असतें, परंतु "मी तोच निर्गुण परमेश्वर आहे" हा अनुभव आलेला नसतो.

या प्रमाणें श्री अंबुराव महाराजांकडून योग्य मार्गदर्शन झालें व श्री माळीमहाराजांचें जवळ त्याचें प्रात्यक्षिक पाहतां आलें, त्यामुळें बऱ्याच गोष्टींचा उलगडा झाला हें खरें, परंतु हे दोनीही सत्पुरुष शब्दविज्ञानांत तयार नसल्यामुळें कांहीं संदिग्ध भाग त्यांचे कडून स्पष्ट झाला नाहीं. सर्व विश्वविज्ञानाचा आधार बुध्दितत्व हे आहे, व ब्रम्हज्ञानही त्याच्याच अधारावर अवलंबून आहे. म्हणून श्रीगुरू चरित्रांत अध्यात्मिक अंतःप्रवाहाची सुरवात "बुध्दि संभवे चेतन । सृष्टि रचावयासी" अशी करून, निर्गुण बुध्दितत्वाचा ज्ञान व विज्ञान या मधील सांधा दिग्दर्शित केला आहे. बुध्दितत्वाचें यथार्थ स्वरूप समजल्या खेरीज, ज्ञान वा विज्ञान, या दोहींतही मनुष्य अंधेरांतच चांचपडत राहतो. बहुतेक वेदांती पुस्तकांतून बुध्दितत्व म्हणजे काय हें बरोबर सांगितलेलें नसतें. इतर सर्व पंचीकरणाचें वर्णन शेंकडों पानें लिहून करतात, परंतु बुध्दितत्वाची वेळ आली कीं, त्याला बगल देऊन पुढें निसटतात बुध्दितत्वाचें स्पष्टीकरण मला कोठेंच नीट मिळेंना, पुढें गाणगापूरला जाण्याचा योग येऊन श्रीदत्तमहाराजांनीच माझ्यांकडून श्रीगुरूचरित्राचें सप्ते करवून घेतले व त्यांतच बुध्दितत्वाचा व इतर कांहीं प्रश्नांचा खुलासा झाला.

अशा तऱ्हेनें केवळ योगा योगानें गीतेंतील आत्मज्ञानाची यथार्थ कल्पना आल्यानंतर ती थोडक्यांत पण स्पष्टपणें जगापुढें मांडावी, म्हणजे " आत्मसाक्षात्कारा " च्या कल्पनेंत कोणाचा गैरसमज होणार नाही, व त्याचबरोबर सर्वांना गीतेच्या अभ्यासाचें महत्वही कळूं लागेल, असें वाटल्यावरून हें छोटेसे पुस्तक लिहिलें आहे. यांत प्रथम आत्मसामर्थ्य, आत्मसंकोचित्व, श्वासोच्छवास, प्रणवोपासना व अभ्यास, या प्रकरणांत अध्यात्माच्या गणिताची रीत दाखवून नंतर त्याचा गीतेंशीं मेळ पडताळून दाखविला आहे. ही रीत एकदां समजली म्हणजे कोणताही अध्यात्मिक ग्रंथ दुर्बोध होणार नाहीं व शाळाकॉलेजांतून हें विद्यार्थ्यांच्या वाचनांत आल्यास, सर्वधर्मांच्या परिणतावस्थेचें स्वरूप लक्षांत येऊन, त्यांच्या अंगी सत्यधर्माभिमान उत्पन्न होईल. हल्लींच्या जगाच्या धांवत्या पळत्या स्थितींत स्थळकाळांचें महत्व जाणून " गीतेंचा अंतःप्रवाह " या प्रकरणांत, गीतेंतील सांतशें श्लोकांतून चाळून फक्त एकशेंपांच श्लोकांची आत्मसाक्षात्कारी माला सुसूत्रपणें ओंवली आहे. हेतु इतकाच कीं, फावल्या वेळीं पंधरावीस मिनिटांत गीतेचा भावार्थ कळून सहज वाचतां वाचतां हे श्लोक पाठ व्हावेत. गीतापाठाची फल श्रुति त्यांहींनीं लाभू शकेल.

येवढे श्लोक रोज वाचनांत आले व त्यांतील तत्व आत्मसात् करण्याचा प्रयत्न सुरू झाला, तर सर्वधर्मव्यापक गीताधर्माचें महत्व पटून कोणीही खोटें ज्ञान सांगून दिशाभूल करूं शकणार नाहीं. गीता ही फक्त हिंदूंचे करता नसून अखिल मानवतेकरतां आहे. श्रीकृष्णांनीं स्वानुभवानें सांगितलेल्या या आत्मधर्माचा डंका जगातील सर्व कोनाकोपऱ्यांतून ऐंकू - गेला पाहिजे. गीतेंतील त्रिकालाबाधित विश्वधर्माच्या प्रसाराखेरीज शांतिपाठाचें बोल फोल आहेत !

हें पुस्तक श्री अंबुरावमहाराज, श्रीमाळीमहाराज, व श्रीदत्त महाराज यांचे कृपेचें प्रासादिक फळ आहे. यांची व्यावहारिक किंमत थोडी असली तरी सर्वस्वाचें मोल त्या करतां अर्पण करावें लागलें आहे. जगांत जिज्ञासूंनां त्यांचा उपयोग होऊन ते कारणी लागावे यवढीच मायिक मनाची ओढ आहे. बुध्दीची नुसती कसरत दाखविण्याचा

जवानीची हिरीरी ओसरल्यावर साठी उलटतांना लेखणी धरल्यामुळें, व केवळ पुस्तकें वाचून गतानुगतीक पध्दतीनें लिहिण्याची चाकोरी सुटल्यामुळें धंदेवाईक वेदांती बध्दीला जरा सावकाश चालावें लागल्यास त्याची क्षमा करावी, अशी विनंती आहे.

आतां मंगलमूर्ती सद्गुरूंनां वंदन करून मुख्य विषयाला सुरवात करूं या.

**अखण्ड मण्डलाकारं व्याप्तं येन चराचरम् ।**
**तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवेनमः ॥**



# विषय परिचय.

**देहसंगे विषय भोगिले। देहसंगें प्राणी गिरवले।**
**देहधर्त्यास चुकले। नवल मोठें ॥** श्री समर्थ रामदास.

जन्माला आलेला प्राणी केवळ सुखोपभोगांतच दंग असतो, त्याला, आपण कोण आहोत, ज्या जगांत आपण वावरत आहों, तें जग ही काय वस्तु आहे, हें सर्व चंद्रसूर्यादि विश्व कसें निर्माण झालें, आपला व या सकल वस्तूंचा शेवट काय होणार, इत्यादि गोष्टींबद्दल, कुतूहल कसें उत्पन्न होत नाहीं, असें आश्चर्य वरील ओवी लिहितांनां श्री रामदास स्वामीनां वाटत असले पाहिजे परंतु अज्ञ जनांविषयींची ही तक्रार कांहीं नवीन नाहीं. ज्ञानी पुरूषांची ती पूर्वापार वहिवाटच आहे. बालस्तावत्क्रीडासक्तः । तरूण स्तावत्तरूणी रक्तः । वृद्धस्तवच्चिंतामग्नः । परे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ॥ ही श्री शंकराचार्यांची चर्पटपंजरिका सर्वांच्या परिचयाची आहे. त्याच प्रमाणें, ' बालपणीं तूं खेळखेळसी । तरुणपणीं विषयांत लोळसी। म्हातारपणीं खोकल्याचा धनी होसी । आतां पंढरिला रे तूं कधीं जासी ॥ अशा तऱ्हेचे संतांचे अभंगही पुष्कळांच्या ऐकिवात आहेत परंतु बारकाईनें नीट निरीक्षण केलें तर वस्तुस्थिति तशी नसते असें आढळून येतें.

प्रत्येक मनुष्याला आपल्या आयुष्यांत केव्हां ना केव्हां तरी, या सर्व प्रश्नांचे विचार मनांत निर्माण होऊन त्याविषयीं जिज्ञासा उत्पन्न होते, व आपापल्या बुद्धी प्रमाणें सर्वांची उत्तरें शोधण्याच्याही प्रयत्नांत तो असतो फरक इतकाच कीं ज्याच्या बुद्धीच्या आंवाक्याप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें कोणाला लवकर वा उशीरा, कोणाला सुस्थितींत वा दुःस्थितींत, हे प्रश्न उद्भवतात. याचा विचार करतां करतां कांहीं लोक आश्चर्यानें दिपून जाऊन जन्मभर परमेश्वरांचे गुणवर्णनच करीत सुटतात, व त्याच आनंदांत डुंबून बसतात. सर्व देशांतील लोक, पूर्वापार, अशातऱ्हेनें ईशमहिमा गात आलेंलेच आहेत. हिमालय पर्वतायेवढ्या काजळाची समुद्रभर शाईकरून धरणी पत्रावर कल्पतरूच्या शाखांच्या लेखणींनें श्री शारदा देवी जरी सर्व काळ लिहीत बसली, तरी परमेश्वराचा गुणमहिमा संपणार

नाहीं, (हिमगिरिसम स्यात्कज्जलं । सिंधुपात्रे । सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वीम् । लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वं कालम् । तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥ ) असें म्हणून जरी प्राचीन कवींनीं हात टेकले. तरी आजच्या क्षणापर्यंत " हे प्रभो विभोहो अगाध किति तव करणी ॥ चांदवा नभाचा केला । रविचंद्र लटकती त्याला । जणु झूंबर सुवक छताला । मग अंथरिली ही धरणी ।। " किंवा रात्रीचें वर्णन करतांना " नाचत ना गगनांत । तारांची बरसात ॥ आणित होती माणिक मोती । वरतुनि राजस रात ॥ नाव उलटली माव हरपली । चंदेरी दरियांत ॥ ती ही वरची देवाघरची दौलत लोक पहात, ॥ " अशा तऱ्हेचें ईशमहिमावर्णन कोल्हटकर, गडकरी वगैरेंचे नाटकांतूनही सतत चालूंच आहे. परंतु ईशमहिमा गात असा कितीही काळ काढला तरी त्यापासून ज्ञान प्राप्त होणें अशक्य आहे असेंच, " आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् । आश्चर्यवद्वदति तथैवचान्यः ॥ आश्चर्यवच्चैनमन्यच्छृणोति । श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ " या गीतेंतील श्लोकांत श्री कृष्णांनी दिग्दर्शित केलें आहे.

देहबुध्दीच्या जोरावर हें विश्वाचें कोडें सोडवितांना कोणी थकून जाऊन, मानवी बुध्दीला याचें उत्तर सांपडणें शक्य नाहीं, या समजुतीनें त्याचा नाद सोडून देतात, व अज्ञेयवादी होऊन त्यांतच समाधान मानून आयुष्याची कालक्रमणा करीत असतात. प्रा. बापूसाहेब माटे यांनीं आपल्या एका काव्यांत म्हटल्याप्रमाणें, " हातीं घेउनि बुध्दी दिवली । वुन्ड घुन्डितां सवेच विझली । जिथल्या तेथें ॥ प्रभुराम एकला जाणी ॥ अन्य न कोणी ॥ " अशी अगतिक अनवस्था प्राप्त झाल्यावर या प्रकारच्या हतबुध्द मनाला " निर्वाहः प्रतिपन्नवस्तुषु " या न्यायानें केवळ " विज्ञानबोधा " शिवाय समाधानाला अन्य मार्ग उरला नाहीं तर नवल काय ? आणि खरोखर विचार करतां मनुष्याला जितकी आत्मज्ञानाची, तितकीच विश्वविज्ञानाचीही जरूरी असतेच येरवी, शाब्दे परेच निष्णात होतां येणार नाहीं, " डुकृञ् करणें " हें व्याकरणसूत्र पाठ करणाऱ्या ज्या व्यक्तीला अनुलक्षून श्रीशंकराचार्यांनीं, " भज गोविंदं मूढमते । प्राप्ते सन्निहिते मरणे । नहि नहि रक्षति

डु कृय करणें ।। " असा उपदेश केला त्या व्यक्तीला तरी संस्कृत भाषेच्या विज्ञानाखेरीज या चर्पटपजरिकेचा अर्थ समजला असतां काय ? विज्ञानाचा मनुष्याला पूर्ण उपयोग आहे, परंतु तेंवढयावरच समाधान मानून राहू नयें, असाच या उपदेशाचा अर्थ आहे. कारण तात्पुरती डोळेंझाक करून मानून घेतलेलें हें विज्ञान-समाधान, शेवटपर्यंत, सावधान असलेल्या मनाला निर्वाणीला आधार देईल किंवा नाहीं, ही शंका वाटते. नाहीं तर मोठ मोठचा लढाया मारून अजिङ्क्यपद मिळवणारा अर्जुन, पांडवांना सदैव छळत आलेल्या आपल्या बांधवांसमोर, कुरूक्षेत्रावर, धनुष्यबाण घेऊन युद्धाला सज्ज असतांना व स्वार्थी राज्यतृष्णेचा जोर त्याला पांठिबा देण्यास तयार असतांनाही, "स्वजनांचा नाश करून त्यांच्या रक्तानें माखलेल्या उपभोगांचा अभिलाप कसा धरू" या मायामोहांत गुरफटून गेला नसता, व "त्रैलोक्याचें साम्राज्य मिळालें तरीही कारुण्यानें द्रवलेलें माझें अंतःकरण ठिकाणावर येऊं शकणार नाहीं," असा आत्यंतिक निर्वाळा देण्याला थोडा लाजलाही असता.

तात्पर्य हें कीं देहबुध्दि लंगडी पडल्यानंतर हतबल होऊन ऐन कसोटीच्या प्रसंगीं देहबुध्दीच्या पलीकडील प्रांत ज्यांनीं आक्रमण केला आहे, अशा स्वानुभवी लोकांच्याकडे धांव घेणें व त्यांच्या कडून मायेच्या निरांसाकरता या विश्वकोडयाचा उलगडा करून घेणे, शेवटीं भाग पडतें. अशा क्रमप्राप्त स्थितींतच अर्जुनाचे मुखांतून "शिष्यस्तेऽहं शाधिमांत्वां प्रपन्नम्" । असे उद्‌गार बाहेर पडले. बज्रापेक्षां कठीण व फुलापेक्षां हळूवार म्हणून गणलें गेलेल्या लोकोत्तर पुरुषांच्या अंतःकरणाची जी अवस्था तीच प्रत्येक व्यक्तीच्याही अंतःकरणाची स्थिति असते, कांहीं बाबतींत अत्यंत निर्दय असणारें हृदय, कांहीं ठिकाणीं तितकेंच कोमल असल्याचा अनुभव येतो, सामान्य परिस्थितींत स्वतःला अज्ञेयवादी म्हणवून बेपर्वा असणारा मनुष्य आत्यंतिक अगतिक परिस्थितींत देहबुध्दीला अगम्य वाटणाऱ्या गोष्टींविषयीं आस्थेवाईक व श्रद्धावान बनतो, व अखेर आप्तवाक्य प्रमाण मानण्याला तयार होतो. सब झूट म्हणणारेही लोक मग अशावेळी देवीचीं अनुष्ठानें, रूद्राभिषेकांचीं आवर्तनें किंवा सहस्त्रनामाचे पाठ वगैरे सुरू करतांना दिसल्याचें पुष्कळाना ठाऊक आहे,

ही झाली विचारक्षम लोकांची स्थिति. परंतु जे लोक भावनावश होऊन, किंवा खानापीना, या तत्वापलीकडे जाऊन आपल्या बुध्दीचा उपयोग करूं इच्छीत नाहींत त्यांच्या अंतःकरणांत अतिशय अनुकंपनीय प्रसंगानुसार करुण्याचा उद्भव होऊन, त्याचा जोर बळाबला, म्हणजे त्याची लाट बुद्धीवर आदळून ती कदाचित विझूनही जाण्याचा संभव असतो, व अशावेळीं सर्वनांश होण्याचीही भीति असते. हल्लीं याचा अनुभव पदोपदी दिसून येतो. अमूक पक्ष माझें ऐकत नाहीं, दे जीव, परीक्षा नापास झाली दे जीव, प्रियकरणीनें विवाहाला नकार दिला दे जीव, बाप बोलला दे जीव, हीं सर्व वरील दुश्याची नित्यांचीं उदाहरणें आहेत अंतःकरणाच्या नालायक हळुवारपणाचा हा अविचारी परिणाम आहे.

संस्कृतिकरतां जशी शिक्षणाची व सतत अभ्यासाची जरूरी आहे, तशीच किंबहुना त्यापेक्षांही जास्त महत्वाची जरूरी, बुध्दीचा सदैव समतोलपणा संभाळण्यास शिकविणें या करतांही आहे. शिकवल्या खेरींज कळत नाहीं व अभ्यासाखेरीज वळत नाहीं, हा नियम जसा व्यवहारांत, तसा परमार्थांतही लागूं आहे. तहान लागल्यावर विहीर खोदण्यास सुरवात करावी, तशीच स्थिति अर्जुनाचे बाबतीत झालेली आहे. गीतेंत सांगितलेलें आत्मज्ञान, लहानपणापासूनच अर्जुनाला सांगून, त्याच्या कडून त्या ज्ञानाचा अभ्यास हळूं हळूं करून घेतला असतां, तर अर्जुनावर भावनावश होऊन, करूणास्पद स्थितींत, हातातून धनुष्यबाण गळून पडण्यासारखा, केविलवाणा प्रसंग ओढवला नसता. स्वतःच्या कर्तृत्वा-बद्दल अर्जुनाला आत्मविश्वास होता व प्रसगविशेषीं लागणाऱ्या श्रीकृष्णाच्या आधारावर त्याची भक्तिपूर्वक पूर्ण श्रद्धा होती. पण ती श्रद्धा आंधळी होती. अंतःकरणाच्या आत्यंतिक कसोटीच्या वेळीं अंधश्र दम धरू शकेलच असा भरवसा नाहीं ऐन प्रसंगीं चिडून जाऊन, नदींत देव फेकून दिल्याची उदाहरणें पुष्कळदां घडलेलीं आहेत. म्हणून, ‘ तू वरवर देहाकडे बघून कर्तव्याला चुकूं नको, देह नाशवंत आहे, आत्मा अमर आहे, हा वेदान्त अर्जुनाला पटेना व केवळ, श्रीकृष्णसांगत आहेत, या श्रध्देवर अर्जुनाचें मन युध्दाला तयार होईना.

आतांपर्यंत श्रीकृष्णांवर असलेली अर्जुनाची श्रध्दा मायिक स्वरूपाची होती, कृष्णभगवंतांचें यथार्थ स्वरूप अर्जुनाला समजलें नव्हतें; आणि म्हणूनच मायिकरूपावर आधारलेली मायिक श्रध्दा आत्यंतिक मोहाच्या प्रसंगी अर्जुनाचा मोह निवारण करुं शकली नाहीं, येवढचा करतांच, " माझ्या तात्विक स्वरूपाची योग्य जाणीव झाल्या खेरीज तुझा मोह जाणार नाहीं, " असा स्पष्ट सिध्दांत पुढें मांडून, अर्जुनाला आत्मज्ञानचें महत्व, त्याचा मार्ग व उपयुक्तता पटवून देण्याकरतां, आपला मायिक बुरखा दूर सारून, आपल्या आत्मसाक्षात्कारचें यथार्थ स्वरूप भगवान् श्रीकृष्णांनां त्याचें पुढें उघडें करून दाखवावें लागलें. जगांत ज्ञानाखेरीज श्रेष्ट व पवित्र पुरुषोत्तम दुसरा नाहीं, हीच जाणीव अर्जुनाला करून द्यावयाची होती व त्या ज्ञानाचा नुसता मार्ग दाखविण्याचा श्रीकृष्णांचा हेतु होता. अनंत जन्मींचा मायामोह जाण्यास, ज्ञानमार्ग कळल्यानंतर त्याचा पूर्ण अभ्यास होउन, अज्ञान निरास होण्यास, कांहींतरी काळ मध्यंतरी जाण्याची आवश्यकता असते, कोय लावल्या बरोबर लगेच आंबा खाण्यास मिळत नाहीं, हें श्रीकृष्ण जाणून होते म्हणूनच, ' तत्स्वयं योग संसिद्धः कालेनात्मनि विंदति' - हें ज्ञान समजून घेऊन तें आत्मसात् करण्याच्या मार्गाला तूं सुरवात केलीस म्हणजें कालांतरानें तुला त्याची पूर्ण प्राप्ती होईल - असा इषाराही श्रीकृष्णांनीं वेळींच अर्जुनाला देऊन ठेवलेला होता. कांहीं काळ अभ्यास केल्या नंतरच कोणतीही गोष्ट माणसाच्या अंगवळणी पडते ; सायकलवर बसतां येंऊं लागले तरी त्यांत तरबेज होऊन, हात सोडूनही सायकल चालवितां येण्याला बराच काळ जावा लागतो. पक्का मुरब्बी बनण्याला काळांतराची आवश्यकता असते. परंतु, जरी ज्ञानमार्ग दाखविल्यावर अभ्यास लगेच पुरा होत नाहीं, तरी त्या अभ्यासाची थोडीशी सुरवातही, कर्म करताना मनुष्याला पुष्कळ धीर देऊ शकते व आपत्तींत वांचवूं शकते, हें दाखविण्याकरतांच, " स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् " असें आश्वासनही अर्जुनाला श्रीकृष्णांनीं दिलेलें आहे. सर्कसमधील सायकल पटूप्रमाणें साधारण जनतेला जरी तारेवर सायकल चालवितां आली नाहीं, तरी व्यवहारांत कामापुरता सायकलचा उपयोग होऊन पुष्कळ त्रास वांचं

शकतो. त्याचप्रमाणें ज्ञानमार्गाचा मोठा पल्ला जरी सामान्य माणसाला गांठतां आला नाहीं, तरी त्याचा थोडाफार अभ्यासही आयुष्यांत पदोपदीं उपयोगी पडतो व जीवितयात्रा सुखावह होऊं शकते.

सकृद्दर्शनीं गीता वाचतांना असें वाटतें कीं, अशा तऱ्हेची आत्मज्ञानाची पेरणी करीत असतांनाच, " मी तुला पूर्ण ज्ञानी केलें आहे, आतां तुझा मोह गेला ना ? आतां लढाईला उभा राहतोस ना ? " असें विचारून अर्जुनाकडून " हो देवा, माझा मोह गेला, मी आतां तुम्ही सांगतां त्या प्रमाणें लढाईला तयार आहे, " असा जबाब श्रीकृष्णांनीं एकाद्या बॅरिस्टर प्रमाणें, अर्जुनाच्या तोंडून लगेच तेथल्या तेथेंच वदविला आहे; आणि श्रीकृष्णांनी अर्जुनाला विश्वरूप दर्शन देऊन, आपल्या मोठेंपणाची व योगैश्वर्याची जाणीव करून दिल्यामुळें कधींही न दिसलेली कल्पनातीत गोष्ट पाहून गांगरून जाऊन, " आपण ज्ञानी झालों, ' असा अर्जुनाला संभ्रम उत्पन्न झाला असावा व त्या भरांतच, " माझा मोह गेला, मी लढाईला तयार आहे, " असें तो बोलून गेला, अशीही वाचकांची कल्पना होण्याचा संभव असतो. " राजाला पाहून, त्याच्या खाणाखुणावरून, हा राजा आहे, अशी खात्री पटली तरी जो पर्यंत राजाचें ऐश्वर्य आपणाला लाभलें नाहीं, तोपर्यंत राजा तो राजा, व आपण भिकारी ते भिकारीच राहणार ! श्रीकृष्णांचें विश्वरूप पाहून, त्यांचें योगैश्वर्य कळेल व पटेल, पण त्यापासून अर्जुनाला स्वतः अभ्यास केल्या खेरीज, ज्ञान होऊन, त्यांचें स्वतःचें ठिकाणीं हें योगैश्वर्य कसें दिसून येईल व तसा स्वतःला अनुभव आल्याशिवाय, अर्जुनाचा मोह कसा दूर होईल ? ज्ञान मार्गाचे अभ्यासाला सुरवात केलीस म्हणजे काळांतरानें तूं पूर्ण होशील असें श्रीकृष्णांनींच त्याला अगोदर सांगितलें नव्हतें काय ? " असेंही विचार लगेच उत्पन्न होतात, आणि त्याबरोबरच, " श्रीकृष्णांनीं यथार्थ ज्ञानाचें वर्णन करताना, " यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेव यास्यसि पाण्डव । येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ --ज्या ज्ञानानें माझ्या ठिकाणीं व तुझ्या स्वतःचें ठिकाणीं सर्व विश्व तुला दिसूंलागेल व पुन्ह असा मोह तुला उत्पन्न होणार नाहीं—असा मोह प्रतिकाराचा कस व पडताळा

स्वत: स्पष्टपणें सांगून, श्रीकृष्णांनीं आपल्या ठिकाणीं विश्वरूप दाखवून, अर्जुनाला त्याचें ठिकाणीं विश्वरूप दिसलें नसतांनाच, " माझा मोह गेला " असा धडधडीत खोटा जबाब अर्जुनाकडून वदवून घेतलेला आहे, " ही वाचकांची शंका बळावत जाते.

वास्तविक श्रीकृष्णांवर केलेला हा असत्याचा आरोप किंवा अर्जुनावर लादलेला बुध्दिसंभ्रम हे खरे नाहींत, हे थोडयाशा विचारानें सहज लक्ष्यांत येऊं शकते. अर्जूनाला दाखविलेले विश्वरूप फक्त भयाण स्वरूपाचें व अर्धवट होते; श्रीकृष्णांनी विश्वरूपांतील शांत व आनंदमय भाग त्याला दाखविला नव्हता. खरोखर ज्ञानी होऊन जर अर्जुनाची आत्मैक्य दृष्टि झालेली असती तर विश्वरूप दर्शनानें घाबरून जाण्याचें त्याला मुळींच कारण नव्हतें. श्रीकृष्णांची स्वत:ची आत्मैक्यदृष्टी असल्यामुळें अर्जुनाला दिसलेला विश्वरूपाचा भयानक देखावा प्रत्यक्षपणें स्वत:चें ठिकाणीं असतांनाही श्रीकृष्ण घाबरले नाहींत. पण अर्जुन नुसता देखावा पाहूनच गर्भगळित झाला, व देहाची गोष्ट तर सोडाच पण आपला आत्मा तरी आतां तगतो कीं नाहीं, अशी अज्ञानामुळें त्याला धास्ती वाटली, ज्ञानाची पूर्णावस्था म्हणजे मनुष्याला आपले ठिकाणीं विश्व दिसणें व विश्वसाक्षित्वाचा अनुभव येणें, हें सांगून ही स्थिति कशी असते, हें प्रत्यक्ष दाखविण्याकरतां स्वत:चे देहांत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला विश्वरूपदर्शन दिलें होतें. ज्ञानाचें सप्रयोग शिक्षण देण्याचा त्यांचा हेतु होता. न जाणो, अभ्यासाला वेळ लागून आपल्या पश्चात् अर्जुनाची ज्ञानपूर्ति व्हावयाची असेल, तर पुढेंमागें त्याचा घोटाळा होऊं नये, म्हणून विश्वरूप दर्शन देऊन, " याचें नांव ज्ञान व यालाच आत्मसाक्षात्कार म्हणतात " अशी ज्ञानाची यथार्थ कल्पना श्रीकृष्णांनी अर्जुनाला दिलेली होती; त्याला ज्ञानी बनविलें नव्हतें. तसे नसते तर, 'माझा मोह गेला, मी ज्ञानी झालों' असें अर्जुनानें म्हटल्याबरोबर आपल्या ज्ञानाची, म्हणजेच आत्मसाक्षात्काराची परीक्षा त्याला श्रीकृष्णांपुढें द्यावी लागली

असती व मग श्रीकृष्णांची गुरूप्रचीति, अर्जुनाची आत्मप्रचीति व ज्ञानी पुरूषांनीं लिहून ठेवलेली शास्त्रप्रचीति, अशा तिन्ही प्रचीतींचा मेळही जगाला घालता आला असता. परंतु श्रीकृष्णांनीं तशी अर्जुनाची परीक्षा घेतलेली नाहीं व तशी परीक्षा देण्याचें कांही कारणही नव्हते.

"माझा मोह गेला" हें विधान अर्जुनानें दोन ठिकाणीं गीतेंत केलेलें आहे. प्रथम दहा अध्यायांत श्रीकृष्णांनीं आत्मज्ञान म्हणजे काय तें सांगून आत्मज्ञानाचा मार्ग दाखवून दिला व त्याप्रमाणें अभ्यास केल्यावर आत्मैक्यता कशी प्राप्त होते हेंही सांगितलें, व थोडक्यांत परोक्षज्ञानाचा विषय पुरा केला. त्याबरोबर बुध्दिमान अर्जुनाच्या लक्ष्यांत सर्व विषय उतरला व आपण युध्द केलें नाहीं तर कर्म चुकेल व व्यवहारांत आपण नालायक ठरून 'इदं च नास्ति परं न लभ्यते" अशी त्रिशंकू प्रमाणें परिस्थिति निर्माण होईल, याची पूर्ण कल्पना त्याला आली. युध्द न करण्यांत होणारी चूक कळून येऊन "माझा मोह गेला" म्हणजे "माझ्या अदूरदर्शित्वाचा परिणाम माझ्या लक्षांत आला" असा अर्जुनानें श्रीकृष्णांना कबुली जबाब दिला, व लगेच आत्मज्ञानाचा विषय पुरा करण्या करतां, आतांपर्यंत श्रीकृष्णानीं सांगितलेल्या ज्ञानाचें प्रात्यक्षिक बघण्याकरतां विश्वरूपदर्शनाची इच्छा त्यानें श्रीकृष्णांना दर्शविली. पुढें विश्वरूपदर्शनानंतर उरल्यासुरल्या शंका अर्जुनानें विचारून ज्ञानाचें संपूर्ण स्वरूप श्रीकृष्णांकडून समजून घेतलें व शेंवटीं पुनः एकदां "माझा मोह गेला' म्हणजे कर्मांतील व्यवहाराची पूर्ण वस्तुस्थिति माझ्या ध्यानांत आली, असें सांगून "आतां मी लढाईला तयार आहे' अशी कबुली त्यानें अखेरीला श्रीकृष्णांना दिली. या दोंही ठिकाणीं म्हणजे अकराव्या व आठराव्या अध्यायांत, "माझा मोह गेला" याचा अर्थ "मायेचा संपूर्ण निरास होऊन पूर्ण आत्मैक्य स्थितीचा स्वानुभव आला," असा नसुन "आत्मज्ञानाची व्याप्ति यथार्थपणें समजून अदूरदर्शित्वामुळें होणारें युध्द न करण्यांतील भावी दुष्परिणाम माझ्या लक्ष्यांत आले" असा अर्थ आहे. रोग्याला पाहून, वेळींच एक बोट तोडलें तर रोग न पसरतां बाकीच्या शरीराचें संरक्षण होईल या

दूरदर्शित्वाच्या ज्ञानानें डॉक्टर रोग्याचे बोट तोडतात; किंवा निष्ठूर होऊन भावी कल्याणाकरतां शिक्षक विद्यार्थ्याला शिक्षा करतात, व तेवढ्याकरतां क्षणिक मोह दूर सारावाच लागतो, त्याचप्रमाणें "माझा मोह गेला" या जबाबांत अर्जुनाचा क्षणिक मोह गेला असा ध्वनि निघतो, श्रीकृष्णांच्याप्रमाणें अर्जुनाचें ठिकाणीं विश्वरूपाचा अनुभव येऊन अर्जुन ज्ञानाच्या कसोटीला उतरल्याची साक्ष या जबाबांतून मिळत नाहीं व अर्जुनाचा तसा हेतूही दिसत नाहीं.

सर्व गीतेमध्यें अपरोक्ष ज्ञानाचा, म्हणजे अतींद्रिय दृष्टीनें अर्जुनालाच स्वसंवेद्य असलेला, असा विश्वरूप दर्शनाचा फक्त एकच अध्याय आहे. बाकीचे सर्व अध्यायांत शाब्दिक विज्ञान व परोक्ष ज्ञानच सांगितलें आहे, व त्यापासून नुसत्या श्रवणानें आत्मैक्यता कधीही प्राप्त होऊं शकणार नाहीं, हें कोणीही कबूल करील. विश्वरूप दर्शनांतही श्रीकृष्णांनीं दिलेल्या दिव्य दृष्टीनें अर्जुन स्वसंवेद्य अनुभव घेत होता. व त्यावेळीं स्वप्नाप्रमाणें दृश्यद्रष्टारूपानें, आत्मिकस्वरूपाचेंच का होईना, पण द्वैत कायम होतें व तो तुरीयावस्थेंतच होता. ही तुरीयावस्थाही सहाव्या अध्यायांतील आत्मसंयमाचा स्वतः अभ्यास करून अर्जुनानें मिळविलेली नव्हती. श्रीकृष्णांनीं आपलें योगैश्वर्य दाखविण्याकरतां त्याला तात्पुरती दिव्यदृष्टि दिली व योग्य परिणाम होण्याकरतां फक्त भयानक स्वरूपच अर्जुनाला त्या तुरीयावस्थेंत दाखविले. उन्मनी अवस्थेपर्यंत अर्जुन पोंचल्याचे कोठेंच दिसून येंत नाहीं, व त्यामुळें ज्ञानाची पूर्णावस्था त्याला प्राप्त झाली होती असें म्हणतां येत नाहीं. सिध्दपुरूषांना आपल्या कर्तुमकर्तुंअन्यथाकर्तुं शक्तीनें कोणालाही आत्मज्ञानी करतां येतें व प्रपंचचपरब्रम्ह करता येतो, ही गोष्ट सत्य असली तरी त्या निर्गुण शक्तीच्या जोरावर श्रीकृष्णांना अर्जुनाला ज्ञानी करावयाचें नव्हतें. नियतीच्या मार्गानेंच अर्जुनाची व अर्जुनाच्या निमित्तानें प्रत्येक मानवाची आत्मोन्नति व्हावी असाच विश्वनाटकी श्रीकृष्णांचा हेतु होता व तेवढ्यासाठींच येवढ्या अठरा अध्यायी गीतेचा सर्व खटाटोप आहे !

अर्जुनाला ज्ञान होवो वा न होवो, जगाला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं; येवढें मात्र खरें कीं, अर्जुनाच्या मोहपाशांत सांपडून, त्याला ज्ञानी करण्याचें निमित्तानें श्रीकृष्णांचें स्वतःचें मायेचे सोंग बाहेर पडलें आणि न कळत कां होईना, भगवान जगापुढें उघडे झाले. प्रेमाचे भरांत गुरुशिष्यांचीं प्रश्नोत्तरें चालली असतां, सहज बोलतांबोलतां श्रीकृष्ण म्हणालें, " हा योग मार्ग मी पूर्वीं विवस्वानाला सांगितला, विवस्वानानें मनूला सांगितला, आणि अशाच परंपरेनें सांगतांसांगतां तो राजर्षींनां सांगितला गेला व तुलाही तोच मार्ग आज मी सांगत आहे. " हें ऐकल्या बरोबर अज्ञानी अर्जुनाला साहजिक शंका आली व त्यानें भगवंतांना प्रश्न केला कीं, " देवा, तुम्ही व मी आजकालचे बरोबरचे, अन तुम्ही विवस्वानाच्या वेळच्या गोष्टी बोलतां आहां, हा काय प्रकार आहे ? इथें भगवंतांनां अर्जुनानें पकडलें. तेव्हां आजपर्यंत अर्जुनापासून लपवून ठेवलेल्या आपल्या आत्मसाक्षात्काराचें सूतोवाच श्रीकृष्णांनां करावें लागलें !

" बाबारे, तुझे माझे अनेक जन्म झाले आहेत, तुला त्या सर्व जन्मांतल्या गोष्टींची आठवण नाहीं; मला मात्र सर्व जन्मांची आठवण आहे, व हाच तुझ्या माझ्यांत मुख्य फरक आहे. माझी बुध्दि व्यापक आहे. दोन तऱ्हेनीं ती व्यापक आहे; एक, सर्व काळांत मी आहे, व दुसरे सर्व स्थळांत मी आहे. म्हणूनच, वर्तमान, भूत, भविष्य या तिन्हीं काळांतील व सर्व विश्वांतील हकीगत मी सांगूं शकतों; विश्वाच्या सर्व कर्मगतीची मला पूर्ण माहिती आहे.

श्रीकृष्णांचें हें उत्तर ऐकून अर्जुनाला विस्मय वाटला. देहानें इतर मानवासारखा मर्यादित, पण ज्ञानानें परमेश्वराप्रमाणें व्यापक, या स्थितीची कल्पना, अर्जुनाला बरोबर करतां येइना. परमेश्वर चराचरांत भरलेला आहे, तो वर्तमानभूतभविष्याचा साक्षी आहे, तो अव्यक्त असून अविनाशी आहे, इत्यादि गोष्टी त्याच्या कानांवर होत्या, व परमेश्वर तसा असणें शक्य आहें, हें त्यानें मान्यही केलें असतें. कारण, कर्तुं, अकर्तुं, अन्यथा कर्तुं अशी पूर्ण सत्ता असल्याखेरीज, एवढें अफाट विश्व निर्माण करणें अशक्य आहे, याची

त्याला पुरेपूर जाणीव होती, आणि मानवी शक्तीच्या पलीकडल्या या सर्व विश्वघटना आहेत, इतपत मान्य करण्याजोगी बुध्दिची नम्रताही त्याचेजवळ होती. चार इंजिनिअर एकें ठिकाणीं बसून, नकाशे काढून, गवंडया सुतारां करवीं या विश्वाची रचना झालेली नाहीं, किंवा चंद्रसूर्यादि ग्रहांनां कोणा ड्रायव्हरकडून गति मिळालेली नाहीं हें तो जाणून होता. प्राणिमात्राला खेळण्याकरतां जो विश्वाचा पसारा नियंत्यानें निर्माण केला आहे, त्यांतूनच पुनः पुनः डाव पिसून, किंवा आहे त्यांतच कांहीं ढवळाढवळ करून माणूस आपली करमणूक करून घेत असतो, निर्माण झालेल्या विश्वाव्यतिरिक्त माणूस कांहींही नवीन निर्माण करूं शकत नाहीं, या कर्तृत्वहीनतेची जाणीवही अर्जुनाला पूर्ण होती.

कोणीतरी अदृश्य जगच्चालक आहे, असला पाहिजे, इतका तर्क अर्जुनाचे जवळ होता, परंतु ही निर्गुण सत्ता व्यक्त मानवाच्या सगुणतेंत समावूं शकते, याची मात्र त्याला मुळींच कल्पना करतां येईना. कंदिलांतील किल्लीबरोबर वात खालीं वर होऊन प्रकाश लहान अगर मोठा करतां येतो, त्याप्रमाणें घटकेंत संकोचित तर घटकेंत व्यापक अशी बुद्धिच्या साम्यावस्थेची सहजसमाधी असूं शकते, हें श्रीकृष्णांनीं त्याला पूर्वी कधींच दाखविलें नव्हतें किंवा सांगितलेंही नव्हतें. ग्रामोफोनच्या शोधापूर्वी, एकदां म्हटलेलें गाणें बांगडीवर धरून पुनः कोठेंही व केव्हांही हुबेहुब तसेंच ऐकतां येतें, असें म्हणणारा मूर्ख ठरला असता; रेडिओपूर्वी विलायतचे गाणें आपल्या खोलींत बसून ऐकतां येते असें म्हणणाऱ्याचीही तीच अवस्था झाली असती. मग सर्व विश्वांत मीच आहे, सर्व काळांत मीच आहे, मी जन्ममरणरहित आहे, सर्व शक्तिवान मीच आहे किंबहुना मीच परमेश्वर आहे व कृष्ण म्हणून असलेली व्यक्ती ही मीच आहे, असें सांगितल्यावर अर्जुन गोंधळून गेला तर त्यांत आश्चर्य वाटण्याचें कांहींच कारण नाहीं !

श्री समर्थरामदासस्वामींनी म्हटल्याप्रमाणें, "संत समाधीचें मंदिर" असतात; देहानें त्यांची बुद्धी जरी मर्यादित असली तरी आत्म्यानें त्यांची बुध्दि व्यापक अर्थात् सम असते, "तो जनामध्यें वागे परी

जगावेगळी गोष्टी सांगे," अशी सतांची सहज समाधी असते, या स्थितींत डोळे मिटावे लागत नाहींत, इंद्रियें जखडून ठेवावीं लागत नाहींत, स्वतःला मौनी बनवावें लागत नाहीं किंवा पुरूनही घ्यावें लागत नाहीं; चालती, बोलती, खेळती अशी ही श्रीकृष्णांची सहज समाधी अवस्था होती, व हिलाच जागृत समाधी किंवा आत्मसाक्षात्कार असें म्हणतात म्हणून श्रीकृष्ण सांगतात, " माझ्या प्रमाणें जर तुला जागृत समाधिस्थ होऊन, परमेश्वर बनून आपला मोह जावा अशी इच्छा असेल, तर आत्मसाक्षात्काराच्या मार्गाला लाग; म्हणजे कालांतरानें कां होईना तूं सिद्ध पुरूष होशील, आत्मसाक्षात्कारी, होशील ! टीचभर देहाचा मालक मी अर्जुन, ही कल्पना जाऊन, मीच सर्व चराचर विश्वाचा स्वामी आहे, ही जाणीव तुला उत्पन्न होईल. संकोचित अवस्थेंत, ज्या प्रमाणें, माझा हात, माझा पाय, माझी इंद्रियें हीं सर्व मीच व माझीच असा तुला दुहेरी अनुभव येतो, त्याचप्रमाणें सर्व विश्वांतील यच्चायावत पदार्थ व शक्ति मीच व माझीच असा तुला दुहेरी अनुभव येईल; व त्याचवेळी आपल्या म्हणजें आत्म्याच्या व्यापकत्वाची पूर्ण जाणीव व मालकी तुजकडे येऊन सर्व ब्रम्हसंपत्तीचें तारूं तुझ्या हातीं लागेल.

सर्व विश्वांतीत चराचर वस्तु मीच आहें, हें जरी अनुभवानें समजून आलें, तरी त्याच्याही पलीकडे जाऊन, हें सर्व मीच असलों तरी या सर्वांशीं कार्यकारण कर्तृत्वाचा माझा मुळींच संबंध नसून मी त्याहींपेक्षां व्यापक व निर्गुणी आहे. हे तुला समजल्याखेरीज तूं पूर्णावस्थेस पोंचूं शकणार नाहींस, याची जागृति भगवंतांनीं अर्जुनाला पुनः पुनः दिलेली आहे. " सर्व भूतस्थमात्मानं ! सर्व भूतानि चात्मनि ॥ " " यो मां पश्यति सर्वत्र । सर्वत्र मयिपश्यति । " - म्हणजे सर्व विश्वांत आपण व आपल्या ठिकाणीं सर्व विश्व, अशा दोन अवस्थांची जाणीव श्रीकृष्णांनीं अर्जुनाला वारंवार दिलेली आहे. देह व्यापक असूनही, गुणधर्मांनें आपण देहाच्या गुणधर्मांहून भिन्न आहों, एकादा अवयव तुटला तरी आपण तुटत नाहीं व आपल्या ' मी ' म्हणणाऱ्यांत कांहींही उणीव

येऊं शकत नाहीं, असा अनुभव आल्यावर, देहांत असलों तरी देहधर्मांहून आपण भिन्न आहों, याची जाणीव उत्पन्न होते, व देह म्हणजेच मी या अवस्थेंतून सुटून, माझ्यांत देह आहे, ही स्थिति प्राप्त होते; ती स्वानुभवानें येऊं शकते. त्याचप्रमाणें, ज्ञानमार्गाला लागल्या नंतर अभ्यासानें, कालांतरानें, मीच विश्व आहे या पदावर येऊन शेंवटीं "माझ्यांत विश्व आहे" या परमपदावर पोंचतांच खुद्द परमेश्वराच्या पंगतीला येऊन सायुज्यमुक्तीचा धनी होतां येतें,

"एकं, नित्यं, विमलं, अचलं, सर्वधी साक्षिभूतं" अशी ही वर वर्णन केलेली अवस्था माणसाला प्राप्त करून घेतां येणें शक्य आहे काय? बघूं या वर जरा विचार करून ! पण विचार तरी करण्याचें काय कारण आहे ? श्रीकृष्ण भगवान स्वतःच त्याबद्दल ग्वाही देत आहेत. सर्व संत त्याची 'स्थिरचर व्यापुनी अथवा दशांगुलें उरला" अशी साक्ष देण्याला तयार आहेत, "चराचरी व्यापकता जयाची" अखंड भेटी मजला तयाची" अशी आपली आत्मसाक्षात्कारी सहजावस्था श्रीसमर्थांनीं वर्णन केली नाहीं कां ? "तिळा येवढें बिंदुलें" तेणें त्रिभुवन कोंदाटलें" ही अभंगवाणी संत तुकारामांनीं कशाकरतां वज्रलेप करून ठेवली? "अवघें विश्वचि माझें घर" किंबहुना चराचर आपणचि जाहला" हा श्रीज्ञानोबारायांचा आत्मानुभव काय सांगतो ? समुद्रांत बिंदू आहेत हें प्रत्येकाला कळतें पण ज्यांनीं बिंदुत सिंधू पाहिला तेच खरोखर धन्य" असे उद्‌गार संतमणि कबीरसाहेब यांनीं कशाकरतां काढले ? मोहरीसमान असलेल्या आत्मश्रद्धेची प्रौढी धर्मात्मा ख्राईस्ट हे कशाकरतां शिकवतात ? "चिमूटभर मातींत" ही अल्ला पाहणारें धर्मवीर महंमद पैगंबर कशाची साक्ष देतात ?

सर्व देशांत सर्व मानवांत, किंबहुना सर्व विश्वांत एकचतत्व असून त्याला एकाच मार्गानें गांठतां येतें, असा आत्मसाक्षात्कारी धर्मोत्तम छातीठोक स्वानुभवानें भगवान श्रीकृष्णांनीं जगाला दाखविला आहे, व गीतेंतील या राजगुह्य राजविद्येचा प्रत्यक्षावगमानें स्वानुभव पडताळून पाहण्याचा राजमार्ग पृथ्वीवरील प्रत्येक मानवाला सदैव खुला आहे!

---

# आत्म सामर्थ्य.

सर्व विश्वाला गवसणी घालण्याचे अगोदर आपण जरा मानवी प्राण्याकडें नजर टाकूं या. डोळें, कान, हात, पाय, इत्यादि अवयव असलेल्या हाडमांसादि द्रव्यांच्या चालत्या बोलत्या समूहाला मनुष्य असें म्हणतात. शवविच्छदन करून नुसत्या शरीररचनेचा अभ्यास करण्यास दोन दोन वर्षे लागतात; व त्या सुन्दर सूक्ष्म शरीर रचनेकडे पाहून विद्यार्थ्याला विधात्याबद्दल कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं. शव विच्छेदनानें वगैरे भौतिक शास्त्रांनी जरी शरीरांतील जड तत्वांचा शोध लागला तरी तेवढयानें काम भागूं शकत नाहीं. जिवंत मनुष्य व शव यांतील जड द्रव्यें जरी एक असली तरी दोघींतील नैसर्गिक क्रिया भिन्न भिन्न असतात. म्हणून जड देहां व्यतिरिक्त कांहीं विशिष्ट वस्तु जिवंत माणसांत असली पाहिजे. गीतेंत देहाचें वर्णन करतांना, “ पंच महाभूतें, दहा इंद्रियें व त्यांचे विषय, अहंकार, बुध्दि, मन, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संधान, चेतना, व धृति ” या तत्वांच्या बनलेल्या समूहाला देह असें म्हटलें आहे; व या सर्वांना जो जाणतो त्याला देही, म्हणजे ही तत्वें धारण करणारा, असे नांव दिलें आहे. या देहीलाच आत्मा हें सर्व व्यापक नांव आहे. आत्माच्या सान्निध्यानें देह वेगवेगळीं कर्मे करीत असतो. या कर्मांत आत्म्याचा साक्षित्वापलीकडे कांहीं ही संबंध नसतो. सूर्य उगवल्यावर त्यांच्या प्रकाशांत घडणाऱ्या कर्मांबद्दल जसा सूर्य जबाबदार नसतो, तशीच आत्म्याची अवस्था आहे. सूर्य प्रकाशांत वाटल्यास ज्ञान सांगा, वाटल्यास चोरीकरा, सूर्याचा त्यांत मुळींच संबंध नाहीं; तो फक्त साक्षी आहे; म्हणजे स्वस्थ राहून बरे वाईट सर्व पाहून तटस्थ राहणारा आहे. प्रत्यक्ष सूर्यावर या कर्मांच्या बरे वाईट पणाचा कांहींच आरोप करतां येणार नाहीं, किंवा त्याचेवर त्या कर्मांचा कांहीं ही परिणाम होऊं शकणार नाहीं, कर्माला लागणारा प्रकाश देऊन तो मोकळा झालेला आहे. सूर्य एक आहे, कर्मे अनेक आहेत, तो कर्मांशीं निर्लेप आहे. त्याच प्रमाणें देहांतील आत्म्याची स्थिति आहे. अशी स्थिति

आत्म्याचें अस्तित्वाची जरूरी मान्य केल्या नंतर, असूं शकेल; पण मुळांत आत्म्याची तरी आवश्यकता आहे काय, व ती आवश्यकता असल्यास त्या आत्म्याचें स्वरूप काय असलें पाहिजे तें पाहूं या.

दूरचा पदार्थ जवळ व मोठा दिसण्याकरतां आपण दुर्बिण वापरतो. लोखंड, काचा वगैरे जड म्हणजे निर्जीव पदार्थापासून तयार केलेली दुर्बिण पुढें ठेऊन, मनुष्य त्यांतून आपणांला हवा असलेला प्रदेश पाहूं शकतो. ज्या जड पदार्थापासून दुर्बिण तयार केली, त्याच लोखंड, कांचा वगैरे पदार्थांची बाहुली तयार करून तिच्यापुढें दुर्बिण मांडली, तर ती बाहुली दुर्बिणींतून पाहूं शकेल काय ? अर्थात, नाहीं, कारण बाहुली व दुर्बिण दोनीही समान धर्माच्या, म्हणजे दोनीही जड, निर्जीव वस्तु आहेत. म्हणून या सजातीय वस्तूंचा संभोग घडूं शकत नाहीं. मनुष्य चैतन्य व दुर्बिण जड, अचेतन, अशा दोन विजातीय म्हणजे भिन्न गुणधर्मांच्या वस्तु असल्याकारणानें, मनुष्याची दृष्टी व दुर्बिण यांचा संभोग घडूं शकतो; म्हणजेच मनुष्य दुर्बिणींतून पाहूं शकतो

आपला डोळा ही एक प्रकारची दुर्बिणच आहे, म्हणजे पाहण्याचें साधन आहे, म्हणून आपल्या देहांतही, डोळा हें पाहण्याचें जड साधन व त्यांतून पाहणारा चैतन्य आत्मा, असे दोन भाग असले पाहिजेत. जड भाग व्यक्त व विकारी असतो. तेव्हां आत्मा अव्यक्त व निर्विकार असला पाहिजे. नाहींतर डोळयांत म्हणजे जड साधनांत बिघाड झाला असतां चष्म्या सारख्या जड साधनानें त्याची उणीव भरून काढून, त्यांतून पाहणाऱ्याला अर्थात चैतन्य आत्म्याला पूर्ववत पाहतां आलें नसते. अशा रीतीनें जड डोळयाचा एक भाग व त्यांतून पाहणाऱ्या आत्म्याचा दुसरा भाग, असे दोन भाग माणसांत पडतात, व या दोहोंच्या संयोगावेगेज कर्म घडूं शकत नाहीं. जी स्थिति डोळयांची तीच इतर अवयवांची. प्रत्येकांत कर्माचें वेळीं चैतन्य. आत्मा व जड इंद्रिय अशा दोन भागांचा संयोग व्हावा लागतो, व ते दोन भाग भिन्न धर्मीय असावे लागतात. वेगवेगळया इंद्रियांची क्रिया चैतन्य आत्म्यामुळेंच होत असते, परंतु इंद्रियें भिन्न भिन्न असल्यामुळें क्रियाही भिन्न भिन्नच होत असतात.

इंद्रियांपासून उत्पन्न होणाऱ्या क्रिया जरी भिन्न भिन्न असल्या, तरी त्या, एकाच आत्म्याच्या आधारावर झालेल्या असतात. डोळयांनीं सुंदर चित्र पाहिल्यावर ज्या आत्म्याला आनंद होतो, त्याच आत्म्याला कानांनीं गोड गाणें ऐकून समाधान वाटतें, विस्तवावर पाय पडला तर चटका बसल्याचें दुःख त्याच आत्म्याला प्राप्त होतें. हीच सर्व इंद्रियांची गोष्ट; इंद्रियें भिन्न पण त्यांच्या पासून होणाऱ्या सुखदुःखाचा भोक्ता, आत्म्या, हा एकच असतो. हें सुखदुःखही आत्म्याच्या संकल्पामुळें उत्पन्न झालेलें असते. सूर्याप्रमाणें वास्तविक आत्म्यावर त्याचा कांहींच परिणाम होऊं शकत नाहीं. श्रीमंत माणसानें नाटकांत भिकाऱ्याची घेतलेली भूमिका ज्याप्रमाणें संकल्पित असते, त्याचप्रमाणें विश्वांतील सर्व सगुणता विश्वनाटकी आत्म्याच्या संकल्पामुळें उत्पन्न झालेली असते, व प्रत्यक्ष आत्मा त्यांत सर्वस्वी अलिप्त असतो निर्जीव जडाचे भिन्न गुणधर्म भिन्न भिन्न साधनांनीं आजमावतां येतात. परंतु आत्म्याची तशी स्थिती नाहीं. आत्मा निर्गुण आहे; जड साधनांनीं त्याला आजमावतां येणार नाहीं; निर्गुण असल्यामुळेंच अव्यक्त राहुन तो सर्व कार्य करीत असतो व त्यांत लिप्त होऊं शकत नाहीं. प्रत्यक्ष गुणानें जरी आत्मा व्यक्त होऊं शकला नाहीं, तरी अनंत गुण निर्माण करण्याची कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं, ही अनंतशक्ति त्याच्या निर्गुणतेंत आहे, व तिच्याच सहयानें तो सर्व सगुणता निर्माण करून आपण उत्पन्न केलेल्या विश्वाचा आपणच अव्यक्त व अलिप्त राहुन स्वसंकल्पानें उपभोग घेत असतो. त्याचमुळें दासबोधांत श्री समर्थांनीं " निर्गुणी म्हणजे बहुगुणी " अशी निर्गुणात्वाची व्याख्या केली आहे. आपल्या आत्मिक निर्गुणत्वासंबंधीं बोलतांना श्रीकृष्णांनीं " मी अव्यक्त असून स्थलकालातीत, अव्यय व निर्गुणी काहे " असें सांगून आपल्या व्यापकत्वाचें म्हणजेच परमेश्वराचें वर्णन सुचविलें आहे. आत्ममहिमा तो हाच व यांतच आत्मसाक्षात्काराचें रहस्य सांठविलें आहे. सूर्य व त्याचें तेज ही एकरूपच आहेत, आत्मा व त्याची निर्गुणशक्ती हींही एकरूपच आहेत व त्यानांच शिवशक्ति ही संज्ञा आहे, आत्मा व त्याची निर्गुण शक्ति ही एकमेकांपासून केव्हांही भिन्न करतां येत नाहीं मनुष्य व त्याची शक्ति, किंवा प्रत्येक पदार्थ व त्याची शक्ति हीं एकमेकांपासून भिन्न करतां येत नाहींत. मनुष्याला काम करण्याची इच्छा झाली म्हणजे आपल्या शक्तिची जाणीव मनुष्याला होतें व मग

त्यांतून आपल्या कामापुरत्या शक्तीचा उपयोग मनुष्य कार्याचे वेळीं करीत असतो. त्याचप्रमाणें ईश्वशक्ति एकरूप असलेल्या आत्म्याला कार्याचे वेळीं आपल्या निर्गुण शक्तीची जाणीव होते व मग त्या निर्गुणतेंतून आत्मा विश्वनाटकाला सुरवात करतो. आत्म्याला आपल्या निर्गुण शक्तीची होणारी जाणीव यालाच " निर्गुण बुद्धितत्व " असें म्हणतात. निर्गुणबुध्दीलाच गणपती, सरस्वती, परावाणी, परब्रम्ह, अक्षर पुरुष, पराश्रद्धा, पराभक्ती, नित्ययुक्तता, व्यवसायात्मिकाबुध्दि, नैष्कर्म्यसिद्धि; ज्ञान, व संन्यास अशी वेगवेगळीं नांवें पडलेलीं आहेत. एकाच पुरुषाला निरनिराळ्या नात्यांनीं बाप, भाऊ, दीर, मुलगा, सासरा स्नेही वगैरे नांवें पडतात त्याप्रमाणें आत्म्याला ही वरील नांवें पडलेली आहेत. असो.

परमेश्वर अव्यक्त आहे. देहांतील आत्मा तरी कुठें व्यक्त आहे? दुसऱ्याचे दृष्टीला न दिसेना कां, पण स्वतःचें शरीरांत 'मी' म्हणविणाऱ्या स्वतःला तरी, आत्मा व्यक्त होऊं शकतो काय? मुळींच नाहीं. डोळयानें चित्र पाहिल्यावर " मला आनंद झाला "असें माणूस म्हणतो, पण डोळयाचे आंत अमक्या विशिष्ट ठिकाणीं चित्राचें प्रतिबिंब, डोळयाचे मागें आधारभूत असलेल्या आत्मचैतन्याच्या विशिष्ट भागावर पडलें, हें आपल्याच देहांत, " मी चित्र पाहिलें " असें म्हणणाऱ्या व्यक्तीला, आपल्याच इंद्रियांत असूनही सांगतां येत नाहीं. " मी त्याच्या तोंडांत मारली " असें म्हणतांना तोंडात मारण्याला लागणारी शक्ति कोठल्या बिंदूपासून निर्माण झाली याचा यथार्थतेनें आपल्याला पत्ता लागत नाहीं.

फोटो काढतांना, एक फोटो घेतल्यावर, कॅमेरांतील मागची कांच दुसरा फोटो घेतांना बदलावी लागते. प्लेटवर एक गाणें घेतल्यावर दुसऱ्या गाण्याचे वेळीं प्लेट बदलावी लागते. मनुष्याची याच्या विरुध्द स्थिती आहे. जन्माला आल्यापासून वर्षानुवर्ष मनुष्य डोळयानें नानाविध पदार्थ व दृश्यें बघून, त्या सर्वांची मनांत सांठवण करीत असतो; व जन्मभर शब्द ऐकून ते सर्व नामरुपासहित लक्षांत ठेवतो.

डोळ्यांनीं कमी दिसूं लागलें तर चष्मा लावून तो दृश्य बघूं शकतो; म्हणजे डोळे बिघडले तरी आंतला पाहणारा बिघडत नाहीं; कान अधू झाले तरी आंतला ऐकणारा अधू होत नाहीं. हीच सर्व इंद्रियांची व त्यांनीं होणाऱ्या कर्मांची आणि त्या इंद्रियांच्या मागें आधारभूत असलेल्या चैतन्य आत्म्याची स्थिति असते. देहांत 'मी' म्हणून म्हण-विणारा जर व्यक्त, जड व मर्यादित स्वरुपाचा असतां तर भौतिक शास्त्राचे नियम त्यालाही लागू झाले असते; मग प्रत्येक इंद्रियांचा आधारभूत आत्मा प्रत्येक इंद्रियामागें वेगवेगळा झाला असता. चित्र पाहून आनंद होणारा वेगळा, गाणे ऐकणारा वेगळा, जेऊन समाधान झालेला वेगळा, असें 'मी' त्वाचे वेगवेगळे भाग पडले असते; याचाच अर्थ, सर्व देह माझा एकटयाचा असें म्हणणें अशक्य होऊन, सर्व इंद्रियें माझीच एकटयाचीं, हा अनुभव नष्ट होऊन, व्यक्तीचें व्यक्तिमत्व नाहींसें झालें असतें. देहाचा अभिमानी नाहिंसा होऊन, सर्व इंद्रियें वेगवेगळीं होऊन देहाची एकत्रित क्रिया अशक्य झाली असती. असो.

याप्रमाणें परमेश्वरासमान अव्यक्त असणारा देहांतील देही, म्हणजे, 'माझा देह' असें म्हणणारा 'मी' म्हणजे संकोचित आत्मा सर्व इंद्रियांची व समुच्चयरूपानें सर्व देहाची मालकी आपणाकडे घेऊन देहाच्या आधारानें, स्वतः अव्यक्त असूनही, 'मी' म्हणून व्यक्तिमत्वाचा भास निर्माण करतो. परमेश्वर अव्यक्त व अविनाशी असून सर्व काळांत व सर्व स्थळांत एकटाच असतो. त्याच्याचप्रमाणें देहापुरतां 'मी' म्हणणारा अव्यक्त आत्माही देहाच्या स्थळकाळापुरता एकच व अविनाशी असतो, असा अनुभव येतो. देह ज्याज्या स्थळांतून व काळांतून फिरवला जातो, त्यात्या सर्व स्थळांत व काळांत 'मी' म्हणणारा एकच अव्यक्त आत्मा बरोबर असतो; तरूणपणींचा आत्मा वेगळा, म्हातारपणींचा आत्मा वेगळा, शाळेंत जाणारा किंवा मैदानावर खेळणारा आत्मा वेगळा, असें होत नाहीं, त्याच प्रमाणें देहाची विकृति झाली असतां, हा अव्यक्त आत्मा बदलत नाहीं, किंवा हातपाय तुटले असतां आत्म्याच्या पूर्णत्वांत कमीपणा उत्पन्न होत नाहीं; म्हणजेच, तो

आपल्या अविनाशित्वाची साक्ष देतो. परमेश्वराचें ठिकाणीं कर्तुं अकर्तुं अन्यन्था कर्तुं, म्हणजे वाटेल तें निर्माण करणें, केलेलें मोडून टाकणें किंवा या व्यतिरिक्त तिसरेंच कांहीं निर्माण करणें, ही शक्ति आहे, व हिलाच निर्गुणता असें म्हणतात. मनुष्यांतील आत्म्याच्या ठिकाणींहीं या शक्तीचा पडताळा पाहता येतो.

जागेपणीं देहाच्या व जगाच्या दृश्यत्वाचा पसारा निर्माण करुन त्याचा अनुभव घेणारा आत्मा, गाढ झोपेंत त्या सर्वांचा क्षय करुन देहाला व जगाला विसरून 'मी' त्वाच्या भ्रमांतून मोकळा होतो. तोच आत्मा स्वप्नांत नवीन जग निर्माण करुन व त्यातही आपली जागेपणांतली व्यक्ति निर्माण करुन, स्वप्नांत आपल्या नवीन निर्मितीचा अनुभव घेतो. मनुष्य म्हणतो, मला असें स्वप्न पडलें, कीं रस्त्यांतून जात असतां एक सायकलवाला माझें अंगावर आदळला व त्या धक्क्यानें मी जागा झालों. या ठिकाणीं रस्ता, सायकल, सायकलवाला मनुष्य व धक्का लागून जागी झालेली झोपणारी व्यक्ति, हीं सर्व एकच आहेत, एकटया आत्म्यानेंच ही निर्माण केलेलीं आहेत. सर्व स्वप्नसृष्टि निर्माण करून त्यांत जागेपणांतील देहही अनुभवाकरतां निर्माण केलेला असतो. स्वप्नांत दुसऱ्या व्यक्तीला धक्का लागला तर झोपणाऱ्या व्यक्तीवर कांहीं परिणाम होऊं शकत नाहीं; पण स्वप्नांतील स्वतःच्या देहाला धक्का लागल्याबरोबर झोपणारी व्यक्ति जागी होते. आत्म्याला निर्गुणबुध्दिनें स्वतःच्या उपभोगाकरतां असे द्वैत निर्माण करतां येतें व या निर्गुण शक्तीचा म्हणजे आत्म्याच्या पूर्णत्वाचा अनुभव मनुष्याला आपल्या मर्यादित देहांतच, पण तात्पुरता तो देह बाजूला करुन, घेतां येतो. जागेपणी घडलेल्या गोष्टींचा स्वप्नांतील अनुभव व जागेपणीं मनानें केलेलें त्या गोष्टींचें स्मरण, यांत फार फरक असतो. स्वप्नांतील अनुभव प्रत्यक्ष असतो; म्हणजे यांचीं ज्ञानेंद्रियांनीं त्याचा पूर्ण अनुभव येत असतो, म्हणून स्थलकालादिकांचेंही पूर्णत्व त्यांत कायम असते. परंतु मनानें जागेपणीं केलेलें भूतकाळांतील गोष्टींचें स्मरण हें बुद्धीच्या अपूर्णत्वामुळें अपूर्ण व अप्रत्यक्ष असते. हा विषय पुढें येणारच आहे, व देहबुद्धि म्हणजे

काय हें कळल्याशिवाय त्याचें जास्त विवरण कळणार नाहीं, म्हणून त्यांविषयीं आतांच अधिक लिहीत नाहीं.

आपल्या देहांतच अनुभवाला येणारें निर्गुणत्वाचें दूसरेंही उदाहरण आपल्या नित्य परिचयाचें आहे. फोटो काढतांना कॅमेरांत ज्या लांबी-रुंदीची कांच असेल तेवढयांच आकाराचा फोटो त्या काचेवर निघूं शकतो. परंतु कॅमेरासमान असलेल्या डोळयांचे बाबतींत तसें होत नाहीं. जी वस्तु किंवा जो प्रदेश आपण पाहतो तो तेवढया संपूर्ण आकाराचा आपण पाहूं शकतों, तो फोटोप्रमाणें लहान दिसत नाहीं कारण डोळयांचे वाटेनें आत्मा जेव्हां प्रतिबिंबाशीं संलग्न होतो तेव्हां तो आपल्या निर्गुणशक्तीमुळें प्रतिबिंबाइतका व्यापक होऊं शकतो. घटकेंत विश्वापेक्षांही मोठें होण्याची किंवा अणूहूनही बारीक होण्याची जी कर्तुंमकर्तुमन्यथाकर्तुं अशी निर्गुणशक्ति आत्म्यामध्यें आहे, तिच्याच साधनानें, म्हणजे निर्गुणबुद्धीनेंच आत्मा सर्व विज्ञान गोळा करीत असतो.

अशारीतिनें परमेश्वराचें अव्यक्तत्व, स्थलकालातीतत्व, अविनाशित्व व निर्गुणत्व मनुष्याचें ठिकाणीं असलेल्या चैतन्य आत्म्याचें ठिकाणींही अनुभवतां येतें. परंतु त्याचा अनुभव देहापुरतांच मर्यादित स्वरूपाचा असतो. मनुष्यांतिल अव्यक्त आत्म्याला देहामुळें सगुण मर्यादा आहे व नाशवंत सगुणतेबरोबर स्थलकालांचीही मर्यादा उत्पन्न झाली आहे; त्याचें मुळचें व्यापकत्व व निर्गुणत्व कायम असूनच त्याला संकल्पामुळे संकोचित्व प्राप्त झालें आहे. यांतून सुटून, देहबंधनापलीकडे जाऊन, पूर्ण स्वातंत्र्य, देह असतानांच प्राप्त करुन घेण्याची विचारी मनाची धडपड आहे. देहाची मर्यादा ओलांडून विश्वाची मर्यादा गांठावयाची व अखेर सर्व विश्व पोटांत घालून परमेश्वराला मिठी मारून त्यांतच विलीन होऊन जावयाचें! देहच मी असें म्हणणाऱ्या देहबुद्धीला देहांतून सोडवून, पूर्णत्वाच्या अनुभवानें, मी देहानें मर्यादित आत्मा नसून, पूर्ण व्यापक व निर्गुण आहे, अशी आत्मबुध्दि बनवावयाची! अपूर्ण देहांत असूनच संकल्पित संको-

चित्व सोडून आत्म्याने पूर्ण व्हावयाचें व आपल्या पूर्णत्वाची साक्ष देहाच्या साधनानें, अपूर्णत्वानें द्यावयाची. याचेंच नांव आत्मसाक्षात्कार व हीच आयुष्याची इतिकर्तव्यता. एकाच वेळीं पूर्णत्वांत व अपूर्णत्वांत राहण्याचे सामर्थ्य आत्म्याच्या निर्गुणत्वांत आहे व हेंच निर्गुण बुद्धीचें वैशिष्टय आहे, म्हणून श्रीगुरुचरित्रांत या विधानाला

**" बुध्दिसंभवे चेतन " व " बुध्दिसंभवे प्रपंच गुण । "**

असें म्हणून पुष्टी दिली आहे व परमेश्वरानें " सृष्टि रचावयाकारणें " प्रथम " निर्गुणबुध्दि " व नंतर " सगुणबुध्दि " अशीं दोन प्रकारचीं बुध्दितत्वें निर्माण केली, असें अगदी स्पष्टपणें दाखविलें आहे. म्हणून सगुणबुद्धि म्हणजे देहबुद्धि सोडून निर्गुणबुद्धि अर्थात आत्मबुद्धि प्राप्त करणें हेंच मानवाचें परमकर्तव्य आहे!

काय साध्य करावयाचें हें ठरलें, पण त्याला मार्ग ? होय, तोही सांपडेल! बुद्धीचा सांधा बदलला व तिला सगुणशक्तीच्या रूळावरून आत्म्याच्या निर्गुणशक्तीच्या रुळावर आणली, म्हणजे बुद्धि आपणाला सरळ परमेश्वरापाशीं नेऊन ठेवील. चक्रव्यूहांत शिरतांना ज्या वाटेनें आंत शिरावें लागतें, त्याच वाटेनें बाहेर पडतां येतें. ती वाट चुकली तर मनुष्य आंत आडकून पडतो. ज्या मार्गानें 'मी' म्हणून आत्मा मर्यादित झाला, त्याच मार्गानें त्याला निसटून व्यापक होतां येईल. देहामुळें आत्म्याला संकोचित्व कसें प्राप्त झालें, हें आतां पाहूं या!



# आत्म संकोचित्व

जन्माला आल्याबरोबर आपणांला नांव गांव कांही नसतें. नंतर आईबापांनीं नांव ठेवल्यावर, मी म्हणजें, शंकर, वसंत वगैरे अमूक एक व्यक्ति, असें व्यवहाराचे सोयी करतां आपण नांव ठरवून घेतों, व येथून जगांतल्या सर्व ज्ञानाला म्हणजे विज्ञानाला सुरवात होते. ( गीतेंत भौतिक ज्ञानाला विज्ञान म्हटलें आहे व आत्मिक स्वानुभवाला ज्ञान असें म्हटलें आहे; म्हणून तीच परिभाषा चालू ठेवली आहे. ) डोळयानें पदार्थ बघून व कानानें शद्ब ऐकून याला हात, याला पाय, याला पाणी, याला दूध म्हणतात हें कळून सर्व पदार्थांची ओळख होऊं लागते, यालाच आपल्याला कळूं लागलें किंवा ज्ञान होऊं लागलें असें आपण म्हणतों. हें ज्ञान अर्थात विज्ञान आपणाला कसें होतें यांचा स्वस्थ बसून आपण कधीं विचार करतों कां ? बहुतेक, 'नाहीं' असेंच उत्तर द्यावें लागेल. पण त्यांत दोषही मुळींच कोणाला देतां येत नाहीं; कारण तो मार्गच सहजासहजीं लक्षांत न येणारा असा आहे. थोडया विचारांनीं, तो कळूं ही शकतो.

आपणाला जर पायरीवरून उडी मारावयाची असेल तर आपण आपला श्वास, एक निमिषभर कां होईना, आंत रोखून धरतों; म्हणजे आंतील हवा बाहेर जाऊं देत नाहीं व बाहेरील हवा शरीरांत येऊं देत नाहीं. अशी हवा रोखून धरण्यांत, म्हणजे श्वास कोंडून ठेवण्यांत सायकलच्या टयूब मधील बंद हवेंतील शक्तीप्रमाणें, एक प्रकारची शक्ति निर्माण होते; व त्या शक्तीचा इंद्रियांच्या चलनवळणाला जोर मिळतो बाहेर जाणाऱ्या किंवा आंत येणाऱ्या हवेची गति बंद करून, त्या पासून उत्पन्न होणारी शक्ति, आपणाला ज्या इंद्रियाकडून जें कार्य करून घ्यावयाचें असतें त्या इंद्रियाच्या दिशेला आपण वळवून घेतों, व त्या शक्तीचें कार्य झाल्यावर श्वासोच्छवास पुन: पूर्ववत चालूं करतो. या सर्व क्रिया आपल्या न कळत, त्या बद्दलची विशेष जाणीव न होतां आपोआप घडत असतात. डोळयाने पाहतांना, कानानें ऐकतांना किंवा कोणत्याही इंद्रियानें कोणतीही क्रिया करताना प्रथम श्वास बंद होऊन नंतर उत्पन्न झालेल्या शक्तीच्या गतीच्या दिशेंत बदल व्हावा लागतो, व तें कार्य झाल्यावर श्वासोच्छवास पूर्ववत चालू होतो; व हें सर्व आपोआप सदैव चालू असतें; याला जाणून बुजून प्रयत्न करावा लागत नाहीं. श्वासोच्छवासाचे विशिष्ट अवरोधन व त्या

शक्तीनें आत्म्याचें विशिष्ट इंद्रियाकडे केन्द्रीकरण यालाच 'एकाग्रता' असें म्हणतात !

सरळ रस्त्यानें कामाला जात असतां मध्येंच वाटेंत एकाद्यानें हांक मारावी, व गति खुंटून त्याचें बोलणें ऐकल्यावर पुन: रस्त्याला चालूं लागावें, असाच प्रकार श्वासोच्छवासाचे बाबतींत सदैव चालूं असतो. जन्माला आल्या पासून मरेपर्यंत श्वासोच्छवासाला विश्रांति ठाऊक नसते; विशिष्ट गतींत व वेगांत त्याचें आंदोलन सदैव चालूं असतें; सर्व शक्ति त्याच्यांत सांठविलेली असते; सर्व इंद्रियांचा लगाम तोच असतो, व अव्यक्त निर्गुण आत्मा या लगामानेंच आपलें चैतन्य सर्व इंद्रियांशीं वेळोवेळीं संलग्न करून कर्मेंद्रियाकडून सर्व शारीरिक क्रिया व ज्ञानेंद्रियाकरवीं, सर्व विज्ञान, उत्पन्न करीत असतो.

एकाद्याचें बोलणें ऐकत असतां, व त्याकडे पहात असतां, असें वाटतें कीं, ऐकणें व पाहणें, या दोनी क्रिया आपण एकाच वेळीं करत आहोंत. परंतु हा केवळ भास असतो; ऐकत असतां, आपण पहात नसतों, व पहात असतां, ऐकत नसतो. कारण पहात असतांना, श्वासाचा अवरोध होऊन, निर्माण झालेल्या शक्तीची गति, डोळयांकडे लागलेली असते; पाहण्याची क्रिया झाल्यावर, ती शक्ति कानांकडे वळते, व ऐकण्याची क्रिया झाल्यावर, श्वास पूर्ववत चालूं होतो. या सर्व क्रिया इतक्या जलद वेगानें होतात कीं हा वेग स्थूलइंद्रियांनां कळूं शकत नाहीं, व म्हणूनच, आपण, एकाच-वेळीं दोनी गोष्टी, ऐकणें व पाहणें करतों आहोंत, असें माणसाला वाटत असतें.

उदबत्ती पेटवून अंधारांत फिरवली, तर एकदम अग्नीची रेघ ओढलेली आपणाला दिसते. वास्तविक त्या रेघेला मुळींच अस्तित्व नसतें. पेटलेल्या टोंकाची जागा व वेळ, उदबत्ती फिरवताना बदलत असतात, तो वेग फार असल्या मुळें, फिरत्या टोंकांतील बदलतें अंतर डोळयांनां, स्पष्ट वेगळें, असें दिसत नाहीं, व म्हणुन अग्नीच्या रेघेचा भास होतो. हाच प्रकार इंद्रियांच्या क्रिया करतांना श्वासोच्छवासाच्या गतीच्या व वेगाच्या बाबतींत घडत असतो. एका इंद्रियाची क्रिया करून, पुन: आंत जाऊन

बाहेर येतांना, किंवा बाहेर येऊन आंत जातांना, निरोधन होऊन, आत्म्याच्या संयोगानें, श्वास दुसऱ्या इंद्रियाची क्रिया केव्हां करतो, व पुनः मूळस्थितींत केव्हां जातो, या भिन्नस्थलांतील कालांतराची जाणीव इंद्रियांनां होऊं शकत नाहीं. परंतु इंद्रियांनां जरी ही जाणीव झालीं नाहीं तरी श्वासनिरोधना खेरीज कोणतेही इंद्रियाचें कार्य होऊं शकत नाहीं.

सायकलाच्या रबरी टयूबमध्यें हवा भरतांनां, ती टयूब फुगत जाते; ज्या प्रमाणांत टयूबमध्यें हवा जाते, त्या प्रमाणांत ही पोकळी निर्माण होत असते. प्रसरण पावणें हा वायूचा सहज धर्म आहे; म्हणून आंत हवा कोंडल्यामुळें, त्यांतील प्रसरण शक्तिचें निरोधन, होऊन त्या पासून पोकळी म्हणजे आकाश निर्माण होतें. याचाच अर्थ वायूंतील अव्यक्त सगुण शक्ति आकाशतत्यांत व्यक्त होत असते, म्हणजे अव्यक्त सगुण शक्तिचें आकाश हें व्यक्त स्वरूप ठरतें. अशा रीतीनें आत्मा प्रथम आकाशतत्वांत सगुण शक्तीशीं संलग्न होतो व तिच्या साहृयानें नंतर क्रिया करतांना इंद्रियांशीं संलग्न होत असतो. सगुण शक्तीची जाणीव आत्म्याला प्रथम आकाशतत्वांतच होत असते, म्हणून निर्गुण आत्मा व सगुणशक्ति यांच्या या संयोगाला सगुण बुद्धितत्व किंवा देहबुद्धि असें म्हणतात. या सगुण शक्तीशीं संलग्न होतांनाहीं अत्म्याला आपल्या निर्गुण शक्तीचाच उपयोग करावा लागतो, सगुण शक्ति आपण होऊन आत्म्याला भेटूं शकत नाहीं, आत्मा निर्गुण शक्तिनें वायूला खेचून सगुणशक्तीशीं संलग्न होत असतो. याप्रमाणें. प्रथम निर्गुण बुद्धितत्वानें आत्मा सगुण बुद्धितत्व निर्माण करतो व नंतर सगुण बुद्धितत्वाच्या आधारानें कोणत्याही इंद्रियाशीं संलग्न होतो. कर्मेंद्रियांनीं कामें करतांना आत्मा आपल्या सगुण शक्तीचा उपयोग करतो; परंतु डोळे, कान, नाक, त्वचा व रसना या पांच ज्ञानेंद्रियांनीं काम करण्याचे वेळीं सगुण बुद्धीनें आत्म्याला ज्ञानेंद्रियाशीं संलग्न केला, म्हणजे पुढें सगुण बुद्धीचें कार्य आत्म्याला त्या ज्ञानेंद्रियाशीं थोपवून धरण्यापुरतेंच शिल्लक उरतें; नंतरचें विज्ञानग्रहण करण्याचें कार्य निर्गुणबुद्धि करीत असते, व त्यांत सगुण बुद्धि, आकाशतत्व अव्यक्त असल्याकारणानें, अडथळा आणूं शकत नाहीं. सगुणबुद्धिच्या आधारावर पंचज्ञानेंद्रियांचें साधनानें निर्गुण बुद्धीनें मिळविलेल्या विज्ञानालाच, मन असें

म्हणतात. या तयार झालेल्या मनांतून, म्हणजे, नामरुपाच्या पोतड्यांतून असंख्य विज्ञान निर्माण होऊं शकतें व ती क्रिया करतांनाहीं निर्गुणबुद्धीला सगुणबुद्धीचाच आधार घ्यावा लागतो. याचाच अर्थ एकदा झालेल्या ज्ञानाची पुन: आठवण होतांनाही श्वास निरोधनाची जरूर असते; फरक इतकाच कीं त्यावेळीं कालावधि फार थोडा पुरतो. एकाद्या गोष्टीची लवकर आठवण होत नसली तर माणूस जरा डोळे मिटून व डोकें धरुन आठवण करीत असतो; या डोळे मिटण्यांत व कानशिलाला हात लावण्यांत श्वास निरोधन होऊन पूर्ण एकाग्रता व्हावी, हाच न कळत झालेला, हेतु असतो, म्हणून सगुण बुद्धितत्व हेंच आत्म्याचें व्यक्त संकोचित्व ठरतें. श्वासनिरोधन हाच सगुणनिर्गुणाचा सांधा व हीच देहबुद्धीची सुरवात !

विश्वाची सगुणशक्ति व मनुष्याची सगुणशक्ति एकाच स्वरूपाची आहे. परंतु विश्वाची सगुणशक्ति आत्म्यानें निर्गुणबुद्धीनें आपल्या निर्गुण शक्तींतून उत्पन्न केली आहे, व त्या सगुणशक्तींत असलेल्या पंचभुतांची उत्पत्तीही निर्गुणबुद्धीनेंच झालेली आहे. म्हणून आत्म्याचें निर्गुणबुद्धितत्व, आत्म्याचें सगुणबद्धितत्व व आत्म्याचें मन हीं तीन्ही एकरूप आहेत व त्यांत आत्म्याचें पूर्णत्व आहे. याचा अनुभव स्वप्नांत पहावयाला सांपडतो. स्वप्नांतील सगुणसृष्टि ही आत्म्याच्या निर्गुणबुद्धीनें उत्पन्न केलेली असते व त्यावेळीं आत्म्याची निर्गुणबुद्धि, सगुणबुद्धि व मन हीं सर्व एकरूप असतात. याच्या उलट मनुष्याच्या सगुणबुद्धीतील शक्ति, श्वासोच्छवासानें विश्वाच्या सगुणशक्तींतील वायूपासून उत्पन्न झालेली असल्यामुळें, आत्म्याचें मानवी सगुणबुद्धितत्व व निर्गुणबुद्धितत्व हीं दोनीं भिन्न आहेत, व परावलंबी सगुणतेमुळें मानवी मन मर्यादित व सर्वथैव अपूर्ण आहे. निर्गुणत्वामुळें परमेश्वराचा संकल्प सत्यत्वांत उतरतो, पण सगुणत्वामुळें मानवी संकल्प फोल ठरतो; व मानवामध्यें सगुणबुद्धिनें बद्ध झालेलें आत्म्याचें निर्गुणबुद्धितत्वही पूर्ण स्वसंकल्पामुळें नाटकांतील नटाप्रमाणें तात्पुरतें परतंत्र बनतें व मानवाला आत्मिक निर्गुत्वाचा अनुभव स्वतंत्र होईपर्यंत देऊं शकत नाहीं. परमेश्वराच्या

निर्गुणबुद्धितत्वालाच "व्यवसायात्मिकाबुद्धि" असें नांव गीतेंत दिलें आहे व या निर्गुणत्वाचा आधार "व्यवसायोजस्मि" या शब्दांत पूर्ण व्यक्त केला आहे.

परमेश्वराच्या निर्गुणबुद्धीपासून आत्मिक सगुणबुद्धि उत्पन्न होते व त्यापासून पुढें पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश हीं पंचमहाभूतें निर्माण होतात. ही सगुणबुद्धि प्रथम अव्यक्त असते व त्यास्थितींत तिला 'अहंकार' असें म्हणतात. पुढे आकाशतत्वांत आत्म्याला त्यांतील पंचभूतात्मक शक्तीची जाणीव होतें व मग 'बुद्धि' हें नांव प्राप्त होतें, शक्तींतील पंचतत्वांचें पृथक्करण होऊन त्याची जाणीव आत्म्याला झाली म्हणजे 'मन' निर्माण होतें. पंचमहाभूतें, मन, बुद्धि व अहंकार यालाच अष्टधा प्रकृति हें नांव आहे. अहंकारांत आत्मा व सगुणशक्ति हीं दोनीं अव्यक्त असतात; मनांतही आत्मा व त्याची विज्ञानमयशक्ति हीं दोनों अव्यक्तच असतात. सगुणबुद्धीतत्वांत आत्मा अव्यक्त व सगुणशक्ति आकाशतत्वांत व्यक्त असते व आकाशतत्व अव्यक्त असलें तरी त्यांतील शक्ति सगुणत्वामुळें आत्म्याला संवेद्य असते.

मनुष्यांमध्यें जागेपणीं पंचभूतांचा अनुभव पंचज्ञानेंद्रियांनीं घेतां येतो, व सगुणशक्तीचा अनुभव श्वासनिरोधनानें म्हणजे सगुणबुद्धितत्वानेंच घेतां येतो. पंचज्ञानेंद्रियांनीं मिळविलेला शक्तितील पंचभुतांचा अनुभव म्हणजेच विज्ञानमय आत्मा किंवा मानवी मन, व श्वास निरोधनापूर्वीची श्वासांतील अव्यक्त शक्ति व तिच्याशीं आत्म्याचा अव्यक्त संयोग याचें नांव मानवी अहंकार. अहंकारांतच चित्त म्हणजे चैतन्यआत्मा सगुणत्वामुळें चित्त बनतो, पण त्यावेळीं शक्ति अव्यक्त असल्यामुळें चित्तही अव्यक्तच असतें. हेंच अव्यक्त चित्त श्वासनिरोधनानें सगुणबुद्धितत्वांत व्यक्त होत असतें; म्हणून अंतःकरण चतुष्टयांत दाखविलेलें चित्त हे आत्म्याचें रूप गीतेंत अहंकार व बुद्धि यांतच समाविष्ट करून निराळें दाखविलें नाहीं. अहंकाराबरोबर आत्मा आपल्या मूळ निर्गुणस्वरूपाला विसरतो, म्हणजे

अज्ञानी बनतो; सगुणबुद्धितत्वाबरोबर अहंकाराला व्यक्त स्वरूप येतें व त्यालाच विज्ञान प्रारंभ, म्हणतात. आत्म्याचें मूळ निर्गुण स्वरुपाला ज्ञान असें म्हणतात, ज्ञान, अज्ञान व विज्ञान यालाच सत्व, तम व रज हीं नांवें पडलेलीं आहेत. वास्तविक हे तीन गुण नसून आत्म्याच्या या तीन अवस्था आहेत व त्यानांच विष्णु, महेश व ब्रम्हा अशी विज्ञानात्मक नांवें दिलेलीं आहेत.

कोणत्याही पदार्थाचें ज्ञान पूर्णत्वानें प्राप्त होण्याला सगुण बुद्धीच्या आधारानें निर्गुणबुद्धि याचीं ज्ञानेंद्रियांशीं संलग्न व्हावी लागते आंबा हातांत घेतल्यावर त्याचें रंगरुप, त्याचा वास, त्याचा स्पर्श, त्याची चव आंबा हें त्याचें नांव अशा पांच तऱ्हेनें त्याचें पूर्ण ज्ञान होतें. परंतु मनानें आंब्याची कल्पना करतांना, निर्गुण बुद्धितत्व फक्त "आंबा" या शब्दाशींच संलग्न होत असतें व त्यामुळें बाकीच्या चार इंद्रियांशीं निर्गुणबुद्धीचा संयोग न झाल्यामुळें मनानें केलेल्या आंब्याच्या कल्पनेंत पंचज्ञानेंद्रियांनीं होणाऱ्या विज्ञानाचें पूर्णत्व असूं शकत नाहीं. "मुंबई" शब्द उच्चारल्यावर त्या शब्दानें येणारा मर्यादित अनुभवच निर्गुणबुद्धि घेऊ शकतें. श्वास देहांत असतो व देहाला स्थळकाळाची मर्यादा असल्यामुळें सगुणबुध्दीनें मुंबईच्या क्षेत्रांत व पूर्वीच्या काळांत मानवी निर्गुणबुध्दीला परावलंबि त्यामुळें जातां येत नाहीं म्हणून मनाचा अनुभव अपूर्ण असतो.

अशा तऱ्हेनें इंद्रियें, मन व सगुणबुद्धि या सर्वांना श्वासाचाच आधार लागतो, व तो माणसाला न कळत सहज धर्मानें मिळत असतो. श्वासाची गति व वेग एकसारखा अडत अडत चाललेली असतात, व याचें कारण इंद्रियांची व मनाची सतत विज्ञानप्रवृत्ति हें असतें. सहज धर्मानें विज्ञानप्राप्त करता करतां दिवसभर इंद्रियें पूर्ण थकून मनुष्य गाढ झोंपीं गेला, म्हणजे श्वासाची इंद्रियांच्या व मनाच्या तडाक्यांतून सुटका होते व सगुणबुध्दितत्व तात्पुरतें नाहींसें होऊन अहंकारतत्वांत श्वासाच्या आंदोलनाची गति आपल्या

विविक्षित साम्यावस्थेंत सुरू होते. यालाच स्वस्थ झोंप लागणें, असें, आपण म्हणतों. झोपेंतील स्वस्थता किंवा शांति ही इंद्रियांवर अवलंबून असते. व ती, अहंकारतत्व शिल्लक असल्यामुळें, अपूर्ण असते सर्व इंद्रियें जागी असून ही शांति मिळवतां आली पाहिजे. मूळ अहंकार हीच अशांत स्थिति व हाच वृत्तीचा उदय. या संकल्पित सगुणत्वांतून निर्गुणत्वांत येणें याचेंच नांव निवृत्ति. सगुणत्व अहंकारानें उत्पन्न केलें आहे, म्हणून अहंकाराच्या पलीकडे जाऊन निरहंकारी व निर्विकल्प होण्याला, सगुणशद्व सोडून एकटा निर्गुणशद्व म्हणजे निःशद्वाचा शद्वच समर्थ आहे. तोच पूर्ण शद्व अपूर्ण अहंकाराचा नाश करून सगुणाला निर्गुण बनवूं शकेल, व मगच वृत्तीची निवृत्ति होऊन हुकमी शांति लाभूं शकेल. सगुणत्व हें श्वासोच्छवासानें व्यक्त होत असतें व आत्मसंकोचित्व सगुणबुद्धीमुळें श्वासावरच अवलंबून असतें. म्हणून मनुष्याच्या निर्गुणबुद्धीला सगुणत्वांतून सुटण्याला श्वासाचेंच साह्य घ्यावें लागेल. तेव्हां प्रथम श्वासोच्छवासाचें महत्व लक्ष्यांत घेऊन पुढें पाऊल टाकणें श्रेयस्कर ठरेल! पंच ज्ञानेंद्रियें व मन हीच षट्‌चक्रें आहेत व त्या चक्रांच्या चक्रव्यूहांत आत्माचें निर्गुणबुध्दितत्व स्वसंकल्पानेंच श्वासाच्या आधारावर तयार होणाऱ्या मानवी सगुणबुद्धितत्वामुळें परतंत्र होऊन आडकून पडलेलें आहे. श्वासाबरोबर नामस्मरण करीत या सहा चक्रांतून सुटून आत्मा स्वतंत्र होऊं शकतो. हा मार्ग चुकला तर परमार्थाच्या भ्रामक कल्पनेनें संभ्रम निर्माण होऊन डोक्यांत चक्रें फिरायला लागतात, व "चक्रं भ्रमति मस्तके" असा चक्कर छापाचा शिक्कामोर्तब त्याला करण्याला लोक तयार होतात!



# श्वासोच्छ्वास.

**ब्रम्हांड खंड पिडाद्याः स्वरेणैवहि निर्मिताः ।**
**सृष्टिसंहारकर्ता च स्वरः साक्षात्महेश्वरः ॥**

( शिव स्वरोदय )

( सर्व ब्रम्हांडखंड व पिंड हे श्वासोच्छ्वासापासूनच निर्माण झाले, जगाची सृष्टि व संहार याचा कर्ता जो साक्षात ईश्वर तोही स्वासोच्छ्वासरूपच आहे. )

असें सांगतात कीं, श्रीमारुतिराय आपली वानरसेना लंकेंत नेण्याकरतां समुद्रावर दगड ठेऊन पूल तयार करीत होते. दगड उचलून, रामाचें नांव घेऊन तो धोंडा समुद्रातील पाण्यावर मारुतिराय ठेवीत व त्या रामनामाच्या शक्तीनें दगड पाण्यावर तरंगत राही. प्रभुरामचंद्रांनां वाटलें, बिचारा मारूति एकटा सेतूचें काम करतो आहे, तर आपणही चार दगड टाकून त्याला मदत करूं या. म्हणून एक दगड उचलून श्रीरामांनीं समुद्रांत टाकला; परंतु तो धोंडा पाण्यांत बुडाला; दुसरा दगड टाकला, तर तोही बुडाला रामचंद्रांनां आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, " माझें नुसते नांव घेऊन मारुति पाण्यांत दगड टाकतो व तो तरंगतो, पण मी प्रत्यक्ष देहधारी राम पाण्यांत धोंडा सोडीत असतांना तो बुडतो, हा काय परमेश्वराचा न्याय ? " रामचंद्रांना राग आला, व ही तक्रार श्री शंकरांकडे गेली. शंकर हंसूं लागले. ते म्हणाले, रामा, अरे, मारुतीचा राम वेगळा आहे; तुझ्या सारखा दोन हात पायाचा त्यांचा राम नाहीं. तुझ्या देह बुद्धीच्या रामाचें म्हणजे संकोचित सगुणाचे, राम हे नांव " घेऊन, मारूती धोंडा टाकीत नाहीं; त्याचा राम कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु असा पूर्ण शक्तिमान आहे. त्याच्या रामनामाच्या पूर्णत्वांत धोंडा तरंगत ठेवण्याची ताकद आहे तूं सगुण देहधारी असल्यामुळें तुझी शक्ति मर्यादित आहे. तुला आपला धोंडा तरावा असें वाटत असल्यास तूं मारुतीप्रमाणें निर्गुणाचा, म्हणजे निःशब्दाचा शब्द तयार करून त्या नांवानें धोंडा टाक म्हणजे मगच तो तरू शकेल !

निर्विक्षित साम्यावस्थेंत सुरू होते. यालाच स्वस्थ झोंप लागणें, असें आपण म्हणतों. झोपेंतील स्वस्थता किंवा शांति ही इंद्रियांवर अवलंबून असते. व ती, अहंकारतत्व शिल्लक असल्यामुळें, अपूर्ण असते सर्व इंद्रियें जागी असून ही शांति मिळवतां आली पाहिजे. मूळ अहंकार हीच अशांत स्थिति व हाच वृत्तीचा उदय. या संकलित सगुणत्वांतून निर्गुणत्वांत येणें याचेंच नांव निवृत्ति. सगुणत्व अहंकारानें उत्पन्न केलें आहे, म्हणून अहंकाराच्या पलीकडे जाऊन निरहंकारी व निर्विकल्प होण्याला, सगुणशद्ब सोडून एकटा निर्गुणशद्ब म्हणजे निःशद्बाचा शद्बच समर्थ आहे. तोच पूर्ण शद्ब अपूर्ण अहंकाराचा नाश करून सगुणाला निर्गुण बनवूं शकेल, व मगच वृत्तीची निवृत्ति होऊन हुकमी शांति लाभूं शकेल. सगुणत्व हें श्वासोच्छवासानें व्यक्त होत असतें व आत्मसंकोचित्व सगुणबुद्धीमुळें श्वासावरच अवलंबून असतें. म्हणून मनुष्याच्या निर्गुणबुद्धीला सगुणत्वांतून सुटण्याला श्वासाचेंच साह्य घ्यावें लागेल. तेव्हां प्रथम श्वासोच्छवासाचें महत्व लक्ष्यांत घेऊन पुढें पाऊल टाकणें श्रेयस्कर ठरेल ! पंच ज्ञानेंद्रियें व मन हीच षट्चक्रें आहेत व त्या चक्रांच्या चक्रव्यूहांत आत्माचें निर्गुणबुध्दितत्व स्वसंकल्पानेंच श्वासाच्या आधारावर तयार होणाऱ्या मानवी सगुणबुद्धितत्वामुळें परतंत्र होऊन आडकून पडलेलें आहे. श्वासाबरोबर नामस्मरण करीत या सहा चक्रांतून सुटून आत्मा स्वतंत्र होऊं शकतो. हा मार्ग चुकला तर परमार्थाच्या भ्रामक कल्पनेनें संभ्रम निर्माण होऊन डोक्यांत चक्रें फिरायला लागतात, व "चक्रं भ्रमति मस्तके" असा चक्कर छापाचा शिक्कामोर्तब त्याला करण्याला लोक तयार होतात !



# श्वासोच्छ्वास.

ब्रम्हांड खंड पिंडाद्याः स्वरेणैवहि निर्मिताः ।
सृष्टिसंहारकर्ता च स्वरः साक्षात्महेश्वरः ॥

( शिव स्वरोदय )

( सर्व ब्रम्हांडखंड व पिंड हे श्वासोच्छ्वासापासूनच निर्माण झाले, जगाची सृष्टि व संहार याचा कर्ता जो साक्षात ईश्वर तोही स्वासोच्छावासरूपच आहे. )

असें सांगतात कीं, श्रीमारुतिराय आपली वानरसेना लंकेंत नेण्याकरतां समुद्रावर दगड ठेऊन पूल तयार करीत होते. दगड उचलून, रामाचें नांव घेऊन तो धोंडा समुद्रातील पाण्यावर मारुतिराय ठेवीत व त्या रामनामाच्या शक्तीनें दगड पाण्यावर तरंगत राही. प्रभुरामचंद्रांनां वाटलें, बिचारा मारुति एकटा सेतूचें काम करतो आहे, तर आपणही चार दगड टाकून त्याला मदत करूं या. म्हणून एक दगड उचलून श्रीरामांनीं समुद्रांत टाकला; परंतु तो धोंडा पाण्यांत बुडाला; दुसरा दगड टाकला, तर तोही बुडाला रामचंद्रांनां आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, “ माझें नुसते नांव घेऊन मारुति पाण्यांत दगड टाकतो व तो तरंगतो, पण मी प्रत्यक्ष देहधारी राम पाण्यांत धोंडा सोडीत असतांना तो बुडतो, हा काय परमेश्वराचा न्याय ? ” रामचंद्रांना राग आला, व ही तक्रार श्री शंकरांकडे गेली. शंकर हंसूं लागले. ते म्हणाले, रामा, अरे, मारुतीचा राम वेगळा आहे; तुझ्या सारखा दोन हाता पायाचा त्यांचा राम नाहीं. तुझ्या देह बुद्धीच्या रामाचें म्हणजे संकोचित सगुणाचे, राम हे नांव “ घेऊन, मारुती धोंडा टाकीत नाहीं; त्याचा राम कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु असा पूर्ण शक्तिमान आहे. त्याच्या रामनामाच्या पूर्णत्वांत धोंडा तरंगत ठेवण्याची ताकद आहे तूं सगुण देहधारी असल्यामुळें तुझी शक्ति मर्यादित आहे. तुला आपला धोंडा तरावा असें वाटत असल्यास तूं मारुतीप्रमाणें निर्गुणाचा; म्हणजे निःशब्दाचा शब्द तयार करून त्या नांवानें धोंडा टाक म्हणजे मगच तो तरू शकेल !

" निःशब्दाची ओळखण । तेचि अनुभवाची खूण !। असें श्री समर्थांचेंही दासबोधांत वचन आहे. हें निःशब्दाचें स्थान कोणते असू शकेल ?

विश्वांतील प्रत्येक शब्दाला कांहीं मर्यादित अर्थ आहे व तो सगुणत्वाचा द्योतक आहे. सर्व विश्व हें व निर्गुण परमेश्वराचेंच सगुणरूप आहे व त्यांत मर्यादित शक्ति आहे; हें दाखविण्याकरतांच सर्व शब्द विज्ञान तयार झालें आहे. सर्व भाषांतील सर्व शब्द, अकारापासून मकारापर्यंत उत्पन्न होणाऱ्या अक्षरांत, वैखरी वाणींत दृष्टोत्पत्तीस येतात. म्हणून शब्दाच्या मूळ स्वरूपाला ॐ कार असें म्हणतात; अकार ही सुरवात, उकार हा मध्य भाग, व मकार हा शेवट असें, शब्द विज्ञानाचें रूप असतें. ही झाली वैखरीतल्या शब्दांची स्थिति परंतु शब्द जरी वैखरी वाणींत पूर्ण व्यक्त होतो, तरी अगोदर शब्दांची कल्पना मनांत तयार होत असते व तिलाच मध्यमा वाणी असें म्हणतात. मागचें प्रकरणांत आपण पाहिलेंच आहे कीं इंद्रियांची स्थूल क्रिया होताना व मनाची अव्यक्त क्रिया होतानां श्वासनिरोधन व्हावें लागतें; म्हणजे मध्यमा व वैखरी या दोनी वाणींनां श्वासोच्छवासाची जरूर असते. मनामध्यें म्हणजे मध्यमा वाणींत शब्दाची कल्पना तयार होते, परंतु कल्पना तयार होतांना लागणारी शक्ति श्वासाखेरीज उत्पन्न होऊं शकत नाहीं; श्वास हा पश्यंती वाणींत उत्पन्न होतो, म्हणून मध्यमावाणीचें मूळ पश्यंतींत सांपडते, व श्वासाचा किंवा वृत्तीचा उदय हेंच पश्यंतीवाणीचें रूप ठरते. परतु या सगुण शक्ताचें व ज निर्गुण आत्माच्या अहं या संकल्पांत निर्माण होतें, व मूळ अहंकार म्हणजे अव्यक्त सगुणबुद्धी ही निर्गुणबुद्धीपासून उत्पन्न होते; म्हणून निर्गुणबुद्धीलाच परावाणी असें म्हणतात. परावाणी हेंच निःशब्दाचें ठिकाण ! प्रथम जमीन, नंतर त्यांतून वेगळी केलेली माती, मग त्यांत पाणीघालून केलेला चिखलाचा गोळा व शेंवटीं त्यापासून केलेलें मातीचे चित्र, अशा मातीपासून चित्र.पर्यंत चार अवस्था होतात. त्याच प्रमाणें निर्गुण बुद्धितत्व, पुढें अहंकारानें उत्पन्न केलेली सगुणशक्ति म्हणजे श्वास, नंतर सगुणबुद्धीनें तयार झालेली शब्दकल्पना व शेंवटीं स्थूल इंद्रियांनीं केलेलें कल्पनेचें व्यक्त स्वरूप म्हणजें शब्द अशा परा. पश्यंती, मध्यमा, व वैखरी, या वाणीच्या म्हणजे ॐ कराच्या चार अवस्था होतात ॐकाराचा हाच चार वाणींतील अनुभव, जागृति, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या

या अवस्थांत पूर्णपणें स्पष्ट दिसून येतो.

विश्वांतील सर्व शब्द ॐ कारांत, सामावतात, म्हणून परमेश्वराला संबोधतांना, ॐ या नांवानें हांक मारण्याची पद्धत आहे. ॐ म्हणून परमेश्वराला हांक मारण्यांत दुसराही एक हेतु असतो, व परमार्थीच्या दृष्टीनें त्याला जास्त महत्व आहे. ॐ या चिन्हाला एकाक्षर ब्रम्ह असें म्हणतात. जागृतावस्थेला अकार मात्रा, स्वप्न स्थितीला उकार मात्रा, सुषुप्ति म्हणजे निद्रावस्थेला मकार मात्रा, व तुर्यावस्थेला अर्धमात्रा असे म्हणतात. अकार मात्रेंत, म्हणजे जागेपणीं विश्वाचा अनुभव आत्म्याला निर्गुणबुद्धीनेंच पण सगुणबुद्धीच्या व इंद्रियांच्या किंवा मनाच्या साधनांनीं घेतां येतो; यांत विश्वगोचर होत असल्यामुळें, हिला विज्ञानमय किंवा रजोगुणी अवस्था म्हणतात. उकार मात्रेंत म्हणजे स्वप्नांत स्थूलइंद्रियें सुप्त असतात व सगुणबुद्धितत्व तयार होऊं शकत नाहीं, त्यामुळें आत्म्याला आपल्या निर्गुणशक्तीचा उपयोग करून निर्गुणबुद्धीनें मनाचा म्हणजे विज्ञानमय आत्म्यचाच पूर्णत्वानें अनुभव घेतां येतो; म्हणून ही जागेपणीं संपादन केलेल्या विज्ञानांचीच पुनरावृत्ति असते; परंतु कांहीं वेळां आत्म्यांच्या विश्वसंकल्पित भूतभविष्याचाहीं अनुभव - म्हणजे आत्मिकमनाचा अनुभव- स्वप्नांत येत असतो व यालाच सूचक दृष्टांत असे म्हणतात. स्वप्नस्थिति ही केवळ आत्मिक, पण विज्ञानमय असल्यामुळें अपूर्ण, असतें, म्हणून हिला सत्वगुणी अवस्था, असे म्हणतात. मकार मात्रेंत म्हणजे गाढ निद्रावस्थेंत इंद्रिये व मन हीं जागी नसल्यामुळें विज्ञान बंद असतें परंतु देह म्हणजे संकल्पित सगुणशक्ति असल्यामुळें - अहंकार शिल्लक असल्यामुळें - स्वस्वरूपाचे ज्ञान आत्म्याला असूं शकत नाही; म्हणून या अवस्थेंत आत्मा ज्ञान विज्ञान रहित अशा आत्यंतिक अज्ञानांत सांपडलेला असतो. यामुळें हिला तमोगुणी अवस्था असें म्हणतात अर्धमात्रा म्हणजे तुर्यावस्था ही आत्म्यांची पूर्णावस्था असते; निर्गुण आत्म्याची कायमची अशी ही एकच अवस्था असते, परंतु जागृति, स्वप्न व सुषुप्ति या संकोचित तीन अवस्थांच्या अनरोधानें या पूर्णावस्थेला तुरीय म्हणजे चौथी अवस्था असें म्हणण्याची वहिवाट आहे, व हिलाच पारमार्थिक महत्व आहे.

परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चार वाणी, आणि तुर्या, सुषुप्ति, स्वप्न व जागृति या चार अवस्था समान धर्मात्मक आहेत.

**वैखरी वाचा स्थूल देह जाण। मध्यमावाचा सूक्ष्म देह जाण।**
**पश्यंती वाचा देहकारण। परावाचा देह महाकारण ॥**

( श्री वासुदेवानंद सरस्वति )

पश्यंती, मध्यमा व वैखरी यांतील ॐकार मात्रा व सुषुप्ति, स्वप्न, व जागृति यांतील ॐकार मात्रा, या दोनींही मात्रांचें म्हणजे सगुण ॐ काराचें स्वरूप श्वासोच्छवासांतील शक्तीवर अवलंबून आहे. व या एकाक्षर ब्रम्हाचें सगुणत्व म्हणजे सगुण ॐ कार हा आत्म्याच्या निर्गुणबुद्धीपासून उत्पन्न झालेला आहे. परमेश्वर म्हणजे आत्मा, अशातऱ्हेनें श्वासोच्छवासांत कसा सांपडला आहे हें आपणांला दिसून येतें. हेंच वर्णन श्रीगुरूचरित्रांत पुढील ओवींत केलेलें आढळून येतें.

**महाप्रलय समयासी। सत्पार्णव मिळणी जैसी।**
**तैसा या श्वासोच्छवासीं । ईश्वर बैसलासे ॥**

आत्म्यानें आपल्या संकोचित्वांत श्वासाला सतत घट्ट धरून ठेवलें आहे, परमेश्वराचा पत्ता सांगतांना तुका सत्पुरूषांनीं म्हणूनच पुढील प्रमाणें दोहा केला आहे.

**क्यौं तू मुझको धुंडे बंदे । है तो तेरे पासमे॥**
**ना मंदिरमे ना मस्जिदमे। ना काशी कैलासमे॥**
**ना मूरतमे ना तीरथमे। ना दया धर्म दान मे ॥**
**ना मै जपमे ना मै तप मे। ना योगी संन्यास मे॥**
**हूं तो तेरे पास बंदे । मैं श्वासनका श्वास मे ॥**

अव्यक्त परावाणींत श्वास, म्हणजे विश्वबीज ॐकार, निर्माण झाला व त्याबरोबर आत्म्याला विश्वाची मर्यादा सुरू झाली, व परमेश्वराला संकल्प सगुणतेबरोबर स्थळकाळांनीं बांधलेली नाशवंत आकारता ही येऊं

लागली. दिव्यांत तेलवात घालून वात पेटवल्यावर, ज्योत तयार होऊन तिचा सर्वत्र प्रकाश पडतो. त्या प्रकाशाचें मूळ शोधतांना, व्यापक प्रकाश सोडून ज्योतीपर्यंत यावें लागतें, नंतर स्थूल ज्योत सोडून आंतील सूक्ष्म निळसर ज्योतीपर्यंत नजर सूक्ष्म करावी लागते; व त्या सूक्ष्म ज्योतीची परमावधी झाली, म्हणजे तेलांत भिजलेलें वातीचें टोंकच आपल्याला दिसतें. त्याच प्रमाणें, विश्वांतून म्हणजे आत्म्याच्या दृश्य कल्पनेतून. कल्पना बीजांत, म्हणजे आत्म्याच्या मनांत, व नंतर मनाच्या बीजांत म्हणजे आत्म्याच्या सगुणबुद्धीतत्त्वांत व शेवटीं सगुणबुद्धीच्या बीजांत म्हणजे निर्गुणबुद्धीतत्त्वांत जावयास पाहिजे. म्हणजेच विश्वाच्या उगमबिंदूवर-अर्थात, निश्चल चंचलाचे संध्यांवर उभे राहतां येईल. समर्थ म्हणतात " निश्चल चंचळाचा संधी। तेणें भांबावते बुद्धि; ॥ हें मानवी निर्गुणबुद्धीचें भांबावण्याचे ठिकाण जें सांगुणभुद्धितत्व म्हणजे श्वास, तें निश्चित सांपडल्यावर बुद्धि भांबावून जाणार नाहीं. मग त्या बिंदूवर उभे राहून निर्गुणबुद्धीला आपलें मर्यादित स्वरूप विश्व, व व्यापक स्वरूप निर्गुण आत्मा,ही दोनींही आजमावतां येतील. श्वासाचें अलीकडे सगुणब्रह्म दिसेल व पलिकडे निर्गूण ब्रम्ह म्हणजे आत्मा दिसूं शकेल " क्षण एक ब्रह्म व्हावें। क्षण एक दृश्य धांडोळावें। या समर्थांनीं वर्णन केलेल्या स्थितीचा श्वासानेंच अनुभव घेतां येईल, व मगच त्यांनीं सांगितल्या प्रमाणें, " कांहीं गलबला कांहीं निवळ । ऐसा कंठित जावा काळ ॥ " असा पुढे आयुष्यभर काळ कंठतां येऊं शकेल !

**हकारो निर्भवे प्रोक्तः सकारेण प्रवेशनम् ।**
**हकारः शिवरूपेग सकारः शक्तिरुच्यते ॥**

( शिव स्वरोदय )

उच्छवास बाहेर पडतांना 'हं' असा उच्चार होतो व श्वास आंत शिरतांना 'स' असा उच्चार होतो; त्यांत 'हं' हें शिवाचें रुप व 'स' हें शक्तीचें रूप जाणावें. 'हं' आणि 'स' या मिश्ररुपानें साक्षात शंभू श्वासोच्छवासांत वास करीत असतो; " शंभुर्हंसस्वरूपकः ": असें म्हणूनच वर्णन करतात. " देवाचिये द्वारीं

उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ।।" यांतील देवाचें द्वार म्हणजे श्वासाचा उगमबिंदु हेंच आहे, व तेथें माणसाला क्षणभरापेक्षां जास्तवेळ उभें राहतांच येत नाहीं. देवाचें द्वारांत, म्हणजे निर्गुणांत, जाऊन पोंचतों न पोंचतों, तोंच श्वासाला परत देहांत यावें लागतें हें द्वार गांठतांना सर्व इंद्रियें व मन बाजूला ठेवून निर्गुणबुद्धीला श्वासाबरोबर एकटीलाच जातां येते, म्हणून श्री तुकारामांनी "एका पाउलाची वाट । कोणें करावा बोभाट ।।" असें सांगून श्वासाला परमेश्वराची पाउलवाट ठरविलें आहे; व त्या वाटेला लागल्यावर त्यांनींच "शरीर तें करीं शरीराचें धर्म । नको देऊं वर्म चुको मना ।।" असा उपदेश केलेला आहे. मनाला हें श्वासाचें वर्म सांपडल्यानंतरच श्वासांत रामनामाला अडकवून या अभंग वाणीचा सदैव उपभोग घेतां येतो.

श्वासानेंच आत्म्याला व्यक्तत्वांत आणून काळाचें स्वाधीन केलें आहे. काळाला जिंकून कळिकाळ होण्याला, काळाचें काळ करण्याला आपल्याला तोच मदत करुं शकेल; तोच आपणांला अमर करील ! सर्व संतांनी त्याचीच मदत घेतली, आपणही त्यालाच गांठलें पाहिजे ! परमेश्वराला असत् स्थितींत आणून, अचित् करुन श्वासानेंच परम-पुरुषाला दुःखी केलें व मग त्याचा गौरव करून त्याला सच्चितानंद ही पदवी दिली. या सच्चितानंद पदाला तोच आपणांला पोंचवूं शकेल !

ज्ञानप्राप्तिचा अभ्यास करतांना प्रथम श्रवण, नंतर मनन व शेवटीं निदिध्यास अशा तिन पायऱ्या सर्व संतांनीं सांगून ठेवल्या आहेत. पैकीं श्रवण व मनन यांत मानवी निर्गुणबुद्धितत्व अध्यात्माची निश्चित रुपरेषा समजून घेण्याकरतां शद्वविज्ञानांतच घोंटाळत असतें. निर्गुण आत्म्याची शद्वविज्ञानानें निर्गुणबुद्धीला कल्पना आली म्हणजे ज्ञानाच्या यथार्थ अनुभवाकरतां निदिध्यासाची जरुर असते; त्यावेळीं परमेश्वराचें अनुसंधान ठेवण्याला निर्गुणबुद्धीला नामस्मरणाची

आवश्यकता असते. व हें नामस्मरण अहर्निश अखंड चालूं ठेवण्याला, आमरणांत चालूं राहणारा, श्वासोच्छवास, हा एकच मार्ग शिल्लक उरतो. या मार्गानें नामस्मरण केल्यावर निर्गुणबुद्धीची आपोआपच इंद्रियांतून व मनांतून सुटका होते, व देहबुद्धीची आत्मबुद्धि बनूं लागते. यालाच श्री तुकारामांनीं " चित्त चाकाटलें स्वरूपा माझारीं ।। " असें म्हणून नामस्मरणाच्या चाकोरींत चैतन्य आत्मा सगुणत्वांतून सुटून निर्गुण बनतो, हें दिग्दर्शित केलें आहे. श्री ज्ञानेश्वरांनीं हाच अनुभव, " अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ।। " या ओवींत सांगून, मन नामस्मरणानें निर्गुण बनून निर्गुणबुद्धितत्वाशीं एकरुप होतें व मग मानवी सगुणबुद्धीही निर्गुण बनते, असें दाखवून त्यालाच चित्ताची समता म्हणतात व त्यांतच आत्मा अहंकारांतून सुटून निरहंकारी बनतो व निर्विकल्प होतो, असें सिद्ध केलें आहे. श्री समर्थांनींही, मानवी सगुण मन निर्गुणनामानें आत्मिक मन बनतें व पूर्ण होतें, हें " मनास मिळतां मनें पाहून येती निरंजन ।। " यांत स्पष्ट सांगितलें आहे, व हेंच आत्मसाक्षात्काराचें रहस्य आहे. गीतेंतही श्रीकृष्णांनी, " मग्दत: प्राण: " या शद्बांनीं, श्वासानें, " मच्चित्त: संततंभव, " असें सांगून, मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते । " असे लोक " युक्ततम " होतात, म्हणजे माझ्याशीं पूर्ण ऐक्य पावतात, व विज्ञानमय मन निर्गुण बनतें, हाच सिद्धांत शेवटीं ठरविलेला आहे. श्रीकृष्णांच्या पावलांवर पाऊल टाकून दासबोधांतही ' देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी । सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोहीं वेंचावा ।। " असें सांगून, जिवलग इंद्रियें व मन यांतून काढून प्राण म्हणजे श्वास परमेश्वराच्या नामस्मरणाकडे लावावा, या प्रतिपादनानें श्रीकृष्णांचें आप्तवाक्यच प्रमाण ठरविलें आहें. म्हणून शिवस्वरोदयांत श्वासाबद्दल पुढील मार्मिक वर्णन केलें आहे.

**स्वरज्ञानात्परं गुह्यं स्वरज्ञानात्परं धनम् ।**
**स्वरज्ञानात्परं ज्ञानं न वा दृष्टं न वा श्रुतम् ॥**

श्वासोच्छवासाहून गुप्त कांहीं नाहीं; व मुख्य धन हेंच होय; यापेक्षां श्रेष्ठ ज्ञान कोठें पाहण्यांत नाहीं व ऐकण्यांतही नाहीं.

श्वासाचें साहचार्यानें इंद्रियांच्या टांकसाळींत विश्वविज्ञानाची नाणी तयार होतात, व तीं सर्व मनाच्या तिजोरींत पडतात. मनाला वेगवेगळ्या नाण्यांची किंमत कळते पण ॐकार नाण्याजवळ आल्यावर मन मूढ बनतें. इंद्रियांची विज्ञानमर्यादा कळून ॐकाराचें बाबतींत त्यांची जातृत्वहीनता दिसून येते, व मन हिरमुसलें होतें सर्व सगुणब्रम्ह ॐकाराच्या पोटांत गडप होतें व सगुण ॐकारा विरहित निर्गुण ॐकार म्हणजे " ॐकार केवल, " पुन: शिल्लक उरतोच ! अव्यक्त आत्मा आपल्या सगुणतेला उच्छवासाबरोबर दूर करतो व तेव्हां वृत्तीची निवृत्ति होते. अशी श्वासोच्छवासाचा " वृत्ति निवृत्ति " ची गति जन्मभर अखंड चालू असते.

अशा तऱ्हेनें श्वासोच्छवास हा चंचल निश्चलाचा सांधा बनलेला आहे. म्हणून समर्थांनीं नामस्मरणानें " वृत्तीनिवृत्तें बरे पहा ! " म्हणजे प्रपंच व परमार्थाचा लाभ घ्या असें सांगितलें आहे. परंतु हा सांधा अतिशय निसरडा आहे. त्यामुळें या सांध्यावर आल्यावर, आपणाला आतां सर्व ज्ञान झालें व आपण ब्रम्ह झालों. असें वाटून, हीच साक्षीभूत अवस्था आहे अशी कल्पना होऊन, पुढील अभ्यास सुटून परमार्थ मार्गावरून घसरुन पडण्याचा फार संभव असतो. श्वास हा सगुण असल्यामुळें स्वत:च्या जडत्वाच्या आधारावर त्याला चैतन्याच्या ठिकाणीं पोंचून निर्गुण होतां येणार नाहीं. निर्गुणाला शरण गेल्याखेरीज ॐकार आडवा येऊन त्याला पुन: जगांत लोटील. आईच्या पोटांतून बाहेर आल्यावर अन्नपाणी घेऊन वाढलेला देह, मोठा झाल्यावर, असें म्हणेल कीं, " मला जगाचा

त्रास सहन होत नाहीं मी आईच्या पोटांत पुन: जाऊन निवांत बसतो, " तर त्याला आतां या देहानें आईच्या पोटांत बसतां येणार नाहीं; हा देह टाकून पुन: नियतीच्या विज्ञान मार्गानेंच तेथें जावें लागेल. त्याचप्रमाणें श्वासालाही कर्तमकर्तु अन्यथाकर्तूं अशा समर्थ निर्गुण ॐकाराला ॐकार केवळ याला गांठल्याशिवाय, निशब्दाशीं संलग्न झाल्याशिवाय, आपल्या मूळच्या निर्गुणब्रम्हांत विलीन होतां येणार नाहीं; म्हणजेच वृत्तीची पूर्ण निवृत्ति होऊं शकणार नाहीं.

विहिरींत भांडें पडल्यावर तळाचा ठाव घेण्याकरतां नुसता दोर सोडला तर तो दोर पाण्यावर तरंगत राहील; तळाशीं जाऊं शकणार नाहीं, कारण दोराचें विशिष्ट गुरूत्व पाण्यांचें विशिष्ट गुरूत्वापेक्षां कमी आहे. त्या दोराला जास्त विशिष्टगुरुत्वाचा, लोखंडाचा तुकडा बांधला तर तो दोराला तळाशीं नेऊं शकेल, व विहिरीची खोली आपणाला कळूं शकेल. त्याचप्रमाणें, भौतिक दृष्टया सगुण, परंतु आध्यात्मदृष्टया निर्गुण, असाच शब्द श्वासा–बरोबर संलग्न होऊन आत्म्याला सगुणत्वांतून वा संकोचित्वांतून निर्गुणत्वांत आणूं शकेल. मग विज्ञानांतून व अज्ञानांतून सुटून मानवी निर्गुणबुद्धीला आत्मज्ञान होईल! देहबुद्धीची आत्मबुद्धी होईल! म्हणून नामस्मरणाचे कष्ट घेतल्याखेरीज देवकळा येणार नाहीं तेव्हां, साधकानो या निश्चळचंचळाच्या सांध्यावर सावध रहा! फसून येथेंच अडकून पडूं नका! दिल्ली तो बहोत दूर है!

—○—

**मंकार म्हणिजें आपुलें मन । मकार नाम आपुला प्राण ॥**
**मन प्राण एकवटोन । जप करावा एक चित्तें ॥**

( श्री गुरू चरित्र )

अव्यक्त, निर्गुण आत्म्याला प्रणव असें म्हणतात. सगुणत्वामुळें संकोचित्व उत्पन्न होऊन आत्मा आपल्या मूळ पूर्णत्वापासून तात्पुरता दूर होऊन अपूर्णत्वांत सांपडतो. या अपूर्णत्वांतून पूर्णत्वांत येणें यालाच उपासना म्हणतात. उप म्हणजे जवळ व अस म्हणजे बसणें, या पासून उपासना म्हणजे बैठक असा अर्थ होतो. मुळ निर्गुण त्वाशीं तद्रुप होणें असा प्रणवोपासना या शब्दाचा अर्थ आहे. एकाद्या श्रीमंत माणसानें नाटकांत दरिद्री गृहस्थाची भूमिका करावी व नंतर नाटक संपल्यावर पुन: आपला पोषाक चढवून आपल्या व्यवहाराला सुरवात करावी, अशा पैकींच आत्म्याची स्थिती असते. नाटकांत काम करण्याच्या संकल्पाबरोबर मूळ स्वरूपाचा विसर पडतो, म्हणजे अज्ञान उत्पन्न होतें, भूमिकेचें काम सुरूं झाल्यावर विज्ञान सुरूं होते; नाटक संपल्यावर पुन: ज्ञानी अवस्था प्राप्त होते. अज्ञान, विज्ञान व ज्ञान या तिन्हितही एकच मनुष्य कायम असतो; त्याच्या व्यक्तित्वांत कांहींच फरक होऊं शकत नाहीं, केवळ भूमिकेमुळें वेगळा भासत असतो; व ही भूमिका संकल्पित असल्यांमुळें, तो ठरलेला संकल्प पुरा झाल्याबरोबर म्हणजे, नाटक संपल्याबरोबर मूळ स्वरूपाचा व्यवहार सुरूं होतो. त्याच प्रमाणें अहंकाराबरोबर अज्ञान, व सगुणबुद्धितत्वा बरोबर विज्ञान सुरूं होतें. या विज्ञानामुळें मूळ स्वरूपा पासून दुरावलेल्या आत्म्याला पुन:ज्ञानस्थिति किंवा निर्गुण अवस्था प्राप्त होणें यालाच आत्मोपासना किंवा प्रणवोपासना असें म्हणतात.

या प्रणवोपासनेलाच सायुज्यतामुक्ति असें म्हणतांत. जागृतावस्थेंत विश्वाचा अनुभव येऊन आत्म्याला सलोकता प्राप्त होते; स्वप्नांत ही सलोकता नाहिंशी होते, म्हणजे सलोकता मुक्ति, मिळते. व आत्म्याला मनोमय अनुभवामुळें समिपता प्राप्त होतें, नंतर गाढ झोपेंत ही समीपता नाहिंशी होऊन, समीपता मुक्ति मिळणें, व प्राज्ञास्थितीच्या अनुभवानें सरुपता प्राप्त होते, परतु ही सरूपता अपूर्णावस्था असते, तुर्यावस्थेंत ही सरूपता नाहिंशीं होऊन,

सरूपतामुक्ति मिळते; या ठिकाणीं, ओंकार ब्रम्हांतील अकार, उकार व मकार जागृति, स्वप्न व सुषुप्ति - या तीन संकोचित अवस्था सुटून आत्मा, अर्धमात्रेत ॐकार केवल या अस्थेंत - म्हणजे सायुज्यतेंत येतो व या सायुज्यतेलाच प्रणवोपासना असें यथार्थ नांव देतां येते. हींच वामनाची तीन पावलें किंवा मांडुक्य उपनिषदांतील बेडकाच्या तीन उड्या मारून स्थिर झालेली बैठक. श्री वासुदेवानंद सरस्वती स्वामीनीं दत्तमाहात्म्यांत या अवस्थां चें पुढील प्रमाणें वर्णन केलें आहे.

**पहिली व्यक्त मात्रा । दुसरी अव्यक्त मात्रा ।**
**त्रिच्छक्ति तिसरी मात्रा । अमात्रा परब्रम्ह ॥**
**प्रणव आत्म याचें नाम । म्हणोनि ओंकार ब्रम्ह ।**
**अभेद असली नामी नाम । म्हणोनि ही उपासना श्रेष्ठ ॥**
**सार्ध त्रिमात्रा ध्यान । घडे तो होय अपरिच्छिन्न ।**
**तो राहे व्यापून । त्याचें गमन कोठें व्हावें ॥**

ओंकारांतील तीन मात्रा, म्हणजें, जागृति, स्वप्न, व सुबुद्धि या अवस्था निर्गुण आत्म्याच्या अहं या संकल्पाबरोबर म्हणजे मर्यादित सगुण शक्तीपासून निर्माण झाल्या आहेत हें आपण मागें पाहिलेंच आहे. ज्या प्रमाणें हें सगुणता निर्माण करण्याचें सामर्थ्य आत्म्याच्या निर्गुणतेंत आहे, त्याच प्रमाणें ही संकल्पसगुणता नाहिशी करण्याचें समर्थ्यही त्याच्याच निर्गुणतेंत आहे. राजाच्या हुकमानें एकाद्याला बंदींत टाकला तर राजाच दुसरा हुकूम देऊन त्याची बंधनांतून सुटका करूं शकेल; लूंग्यासुंग्याच्या हातून तें काम होणार नाहीं. म्हणून अहं या शब्दाचा म्हणजे अहंकाराचा नाश करून निरहंकार करण्याला निःशब्दाच्या शब्दाची म्हणजे आत्म्याच्या निर्गुण शब्दाचीच जरूर आहे. ॐकार शब्दांत तीन मात्रा सगुण ब्रम्हाच्या आहेत व अर्धमात्रा निर्गुण ब्रम्हाची द्योतक आहे, म्हणून ॐ हा शब्द पूर्ण निर्गुण ठरत नाहीं; व सगुणाला निर्गुण करण्याचे त्याच्यांत सामर्थ्य येऊं शकत नाहीं; सद्‌गुरुंच्या आशीर्वादानें त्यांत हें सामर्थ्य येऊं शकते परंतु यावेळीं त्याचे एकाक्षर ब्रम्हत्व नष्ट झालेलें असते; तो पूर्ण निर्गुणत्वाचा निदर्शक बनलेला असतो.

सर्व सगुण शब्द अपूर्ण शक्तीचें द्योतक असल्यामुळे त्यांच्यांत सगुणाला निर्गुण करण्याचें सामर्थ्य नसतें. ज्याला नांवगांव कांही नाहीं असें निःशब्दाचें ठिकाण आत्मा हाच आहे, म्हणून जो शब्द दिसण्याला सगुण पण निर्गुणत्वानें आत्म्या येवढा पूर्ण, अव्यय, व्यापक, व सामर्थ्यवान होऊं शकेल, तोच निर्गुण शब्द सर्व विज्ञानाला निर्गुण बनवून मनुष्याला ज्ञानी करूं शकेल, म्हणजे आत्म्याची संकोचित्वांतून सुटका होऊन तो पूर्ण व्यापक होऊं शकेल समर्थांनीं सद्गुरूची व्याख्या करतांनां, " सग्दस्तु दाखवी तो सद्गुरू " असें म्हटलें आहे, सग्दस्तु, म्हणजे निर्गुण आत्मा, दाखवण्याची ज्याच्यांत ताकद आहे म्हणजे जो स्वतः निर्गुण बनलेला आहे, तोच हें कार्य करूं शकेल. हा निर्गुण शब्द अहर्निश जवळ बाळगला पाहिजे जागेपणीं, स्वप्नांत व झोपेंत फक्त श्वासच सतत चालू असतो, म्हणून निर्गुण नामाचें सतत अनुसंधान राहण्याला श्वासाखेरीज दुसरा मार्गच नाही, वैखरी वाणींत चालू असलेले नामस्मरण जीभ थकल्यावर बंद पडेल !

म्हणून सद्गुरूंनीं दिलेला निर्गुणशब्द किंवा परमेश्वराचा नाम-मंत्र - सतत श्वासाबरोबर आंत घेतला पाहिजे व उच्छवासाबरोबर बाहेर सोडला पाहिजे; म्हणजे वैखरी वाणी बंद करून, नामस्मरण श्वासोच्छवासांत करावयास पाहिजे; म्हणजे नामस्मरण मनांत करावयास पाहिजे. हा अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे. मनांत नामस्मरण सुरुं झालें, म्हणजे मानवी निर्गुणबुद्धि आपोआपच नामानें मानवी सगुण-बुद्धींशी म्हणजे श्वासांतील शक्तीशीं संलग्न होतें व नामांतील निर्गु-शक्तीचा अनुभव घेऊं शकते; याचाच अर्थ विज्ञानमय आत्मा ज्ञानी होऊं लागतो; म्हणजेच सगुणबुद्धि निर्गुण बनूं लागते किंवा देहबु-द्धीची आत्मबुद्धि होण्यास सुरवात होते,

आत्म्याला पूर्णत्वांतून संकोचित्वांत आणण्याला श्वासच कारणीभूत आहे, म्हणून पूर्णत्वाचा वियोग दूर करण्याला श्वासांतून नामस्मरण, हा एकच मार्ग समर्थ आहे; म्हणून या मार्गाला योग-मार्ग म्हणतात. श्वासामुळें निर्गुणत्वापासून आत्मा विभक्त झाला आहे, म्हणून याच मार्गाला भक्तिमार्ग असें नांव दिलें आहे.

आत्मा अज्ञानी होऊन विज्ञानी बनण्याला श्वासच जबाबदार आहे म्हणून याच मार्गाला ज्ञान मार्ग, असें म्हणण्याची वहिवाट आहे. कर्म करीत असतांही, श्वासामुळें अनुसंधान ठेऊन, परमेश्वराशीं संलग्न होतां येतें, व, वृत्ति व निवृत्ति यां दोहींतही राहतां येऊन नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त करुन घेतां येते, म्हणून याच मार्गाला कर्ममार्ग म्हणण्याची प्रथा आहे. याच मार्गानें संकल्पातून सुटून निर्विकल्प होतां येतें, म्हणून "संकल्पयासः संन्यासः" या तत्वानें यालाज संन्यास हें उग्र नांव ठेवलें आहे, नांवें भिन्न पण मार्ग एकच आहे व त्यानें गांठावयाचें ठीकाणही एकच आहे. श्री तुकारामांनीं त्याला भक्तिमार्ग म्हटलें; श्री ज्ञानेश्वरांनीं योगमार्ग म्हटलें, रामदासस्वामी यालाच ज्ञानमार्ग म्हणूं लागले, एकनाथांनीं हाच कर्ममार्ग म्हणून चोखाळला, व यालाच संन्यास मार्ग म्हणून श्री शंकराचार्यांनीं आत्मदीक्षा घेतली.

अशा तऱ्हेचा हा मार्ग ज्यांना बरोबर कळत नाहीं, तें लोक श्वासाच्या केवळ पूरकरेचक कुंभकांतच अडकून पडतात. श्वास कोंडल्यामुळें कांहीं शक्ति निर्माण होते, व त्या शक्तीचा मोटार थांबविणें, छातीवर धोंडा फोडून घेणें, हत्ती उचलणें, किंवा श्वास कोंडून मृतवत् देह पुरून घेऊन, भ्रामक समाधीचें सोंग दाखविणें, अशासारख्या गोष्टीकडें दूरूपयोगकरून, पैसा मिळविण्याचें एक साधन ते निर्माण करतात; यापेक्षां त्यांतून जास्त कांहीं प्राप्ति होऊं शकत नाहीं त्यानें आत्मप्राप्ति होऊं शकणार नाहीं हा इषारा श्रीकृष्णांनी "यतन्तोऽप्य कृतात्मानो नैनं पश्यंत्य चेतसः।" यांत साधकांनां दिलेला आहे! अष्टांगयोगाची धडपड जर नामस्मरणाविरहित केवळ हटयोगी असेल तर अपूर्ण शक्तीच्या आधारामुळें पूर्णत्व प्राप्तीकरतां तो निरुपयोगी ठरेल, व नुसता हठयोग पगू होईल !

मुंजीमध्यें गायत्रीमंत्र देऊन संध्या करण्यास सांगतात. वृत्तीच्या उदयाबरोबर म्हणजे श्वासाबरोबर नामस्मरण करणें, पूर्णश्वास घेत—

त्यावर, म्हणजे वृत्ति पूर्ण झाल्यावर, नामस्मरण करणें व उच्छवासा बरोबर वृत्ती कमीकमी होत, उच्छवास पूर्ण होतांना नामस्मरण करणें, यालाच प्रातर्, माध्यान्ह व सायं अशा तीन संध्या म्हणतात, व या प्रत्येक श्वासाबरोबर अखंड व्हावयाच्या असतात. त्याचप्रमाणें गायत्री मंत्राची स्थिति आहे. " प्रातर्माध्यान्ह, तृतिय सवनानी । विश्वतैजस प्राज्ञ स्वरुपिणी ।। जागृति स्वप्न सुषुप्त्यवस्था ' ऐसे त्रिपदा गायत्रीसी । ओं हसेंकाक्षर मंत्रीं । जपावा तुम्ही गायत्री ।। " असा श्रीगुरुचरित्रांत उल्लेख केलेला आहे. व ओं या एकाक्षर गायत्रीचा जप " ईश्वर सन्निधानीं अनंत फल " देतो, व ' ईश्वर श्वासोच्छवासीं बैसलासे " असें स्पष्ट सांगून, ईश्वर सन्निधानीं, म्हणजे श्वासोच्छवासांत मंत्राचा जप करा, म्हणजे त्या जपानें पुनर्जन्माचें पाप दूर होऊन मोक्ष मिळेल ' जकार जन्म विच्छेदोनीं । मकारें जन्म पाप दुरी । ' — असें आश्वासन दिलें आहे, व यांत संदिग्धतां राहूं नये म्हणून पुन: एकदां " मंकार म्हणजे आपुलें मन । त्रकार नाम आपुला प्राण । मनप्राण एकवटोन । जपकरावा एकचित्तें ।। " असा मंत्र या शब्दाचा अगदीं स्वच्छ अर्थ दिलेला आहे. श्री गुरुचरित्रांत भस्माची अध्यात्मिक व्याख्याही अशीच केलेली आहे, " गोमय द्रव्य, देवता अग्नि " यांनीं जागृति, स्वप्न व सुषुप्ति या अवस्थांचें भस्मकरून त्या तीन रेषा लावल्या म्हणजे निर्गुण प्राप्ति होते " शिवशक्ति निर्धारिसी । तीन रेषा येणें परी ।। " असें सांगून नामस्मरण हाच उपासना मार्ग दाखविला आहे ! इतकें सर्व विस्तृत लिहिण्याचें तात्पर्य हेंच कीं, निर्गुण नामाचें श्वासाबरोबर सतत स्मरण करणें हा एकच मार्ग प्रणवोपासनेला किंवा सायुज्यता प्राप्तिला म्हणजेच आत्मसाक्षात्कारकरून देण्याला, समर्थ आहे ! नामस्मरणाबरोबर निर्गुणबुद्धीची बाह्यदृष्टि म्हणजे विज्ञानदृष्टि बंद पडते व नामांतील निर्गुण शक्तीमुळें मन निर्विकल्प बनून निर्गुणबुद्धीच्या अंतर्दृष्टीला म्हणजेच आत्मज्ञानाला सूरवात होते. निर्गुणबुद्धीचा सांधा बदलून ती इंद्रियांच्या रुळावरुन आत्म्याच्या रूळावर येते व देहबुद्धीऐवजी आत्मबुद्धि बनूं लागते !

विज्ञान व अज्ञान, म्हणजे जागृति व सुषुप्ति यां दोहोंच्या

मध्ये ज्याप्रमाणें स्वप्न स्थिति उत्पन्न होते, व त्यांत सगुणबुद्धिविरहित निर्गुणबुद्धीनेंच आत्म्याला मनोमय विज्ञानाचा उपभोग घेतां येतो, त्याच प्रमाणें विज्ञान व ज्ञान म्हणजे जागृति व उन्मनी या दोन अवस्थामध्ये तुर्यावस्था उत्पन्न होते, परंतु या अवस्थेत सगुणबुद्धीच्या आधारावर निर्गुण नामाशीं संलग्न होऊन निर्गुणबुद्धि फक्त निर्गुणत्वाचाच अनुभव घेत असते. ॐ या एकाक्षर ब्रम्हां पैंकी जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन सगुण अवस्था असून नसल्या सारख्या होतात व आत्मा तुरीय म्हणजे चौथ्या अवस्थेंत पाऊल टाकतो "ओमि त्येकाक्षरं ब्रम्ह व्याहरन्मामनुस्मरन् । यःप्रयाति त्यजन्देहंस याति परमां गतिम् ॥- निर्गुण नामानें माझें नामस्मरण करीत, ॐ हें एकाक्षर सगुणब्रम्ह, म्हणजे जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्था, नाहिंशा करून, व त्याबरोबरच देह सोडून, जो निघून जातो तो परमगतीला पोंचतोः- श्रीज्ञानेश्वर म्हणतात, " पैं विश्व वेंऊनि गेला मार्गेंसी । तया चोरातें कवण कें गिवसी जे कोणी एकी दशा ऐसी । बुद्धि ते मी ॥ तुर्यावस्थेंत जागृतादि तीन अवस्था तात्पुरत्या दूर केलेल्या असतात व देहही सोडलेला बनसतो; फक्त परमगतीचा मार्ग चालू असतो ही परमगति काय असते व कशी गांठतां येतें, हें अभ्यासानेंच कळूं शकते. निर्गुणबुद्धि परमेश्वराच्या नामाशीं संलग्न होणें, यालाच श्री ज्ञानेश्वरानीं सद्बुद्धि म्हणून तिचें पुढील प्रमाणें सुंदर वर्णन केले आहे व त्यालाच " विधिपूर्वक नामयज्ञ " हे नांव गीतेंत दिले आहे !

**जैसी दीप कलिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रगटी ॥**
**तैसें सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणों नये ॥**
**तैसें ईश्वरावांचूनि कांहीं । जिथे आणिक लाणी नाहीं ।**
**ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥**
**राजाज्ञेचीं अक्षरें आहातो । तिथे चामा एका जथा पडती ।**
**तथा चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥**
**तैसें उत्तमत्व तें चि सरें तींच सर्वज्ञता सरें ।**
**जैं मनोबुद्धि भरें । माझेनि प्रेमें ॥**

**इंद्रियांचिया संगतीं । जिये पसरू होतसे मती ।**
**ते स्थिर होईल मागुती । आत्मास्वरूपीं ॥**

वरील ओवीतील राजाज्ञेचीं अक्षरें म्हणजे परमेश्वराचें नाम !

सद्‌गुरूंची भेट होऊन, त्यांचेकडून जरी निर्गुण नामाचा अनुग्रह झालेला नसला, तरी आपल्याला आवडणारें परमेश्वराचें कोणतेही नाम श्वासाबरोबर घेऊन, म्हणजे मनांत नामस्मरण करून, अभ्यासाला सुरुवात करण्यास हरकत नाहीं. आत्मानुभव त्यानेही येऊं शकतो, असा पुष्कळांचा अनुभव आहे. शिवाय आत्मा हाच सद्‌गुरु आहे व देहबुद्धि म्हणजे देहच शिष्य आहे; "आप हि गुरु । आप हि चेला;" मनुष्य आपणच आपला गुरू व आपणच आपला शिष्य असतो. हेंच श्रीगुरुचरित्रांत, "आपण आपली दावूनि खुणा । गुरुशिष्यरूपें क्रीडसी ॥ या शब्दांत सांगितलें आहे. असो.

अशा रीतीनें तुर्यावस्थेला आरंभ होऊन सायुज्यता प्राप्त होते, व पुढें परमेश्वराशीं सदैव तादात्म्य होऊन, त्यांतच राहता येऊं लागले, म्हणजे सायुज्यतेंतून मुक्त होऊन उन्मनी अवस्था प्राप्त होते. उन्मनीलाच, सायुज्यतामुक्ति, असें म्हणतात. सायुज्यता किंवा तुर्यावस्था; यांत फक्त परमेश्वराच्या निर्गुण ज्ञानाला सुरवांत होते, व निर्गुण परमेश्वराला सगुणत्वा पासून निराळा ओळखतां येऊं लागतो; सगुणबुद्धीचें सगुणत्व नाहींसें होईपर्यंत स्वत: परमेश्वर होतां येत नाहीं. परंतु सायुज्यतामुक्ति नंतर उन्मनी अवस्थेत, सगुणबुद्धि पूर्ण निर्गुण बनते व मनुष्याला परमेश्वर होतां येते, व त्याबरोबरच परमेश्वराचें योगैश्वर्यही प्राप्त होतें. नुसतें राजाला ओळखणें व स्वत: राजा होणें, या दोन स्थितींतला फरक, तुर्या व उन्मनी यामध्यें आहे, "सर्वभूतस्थमात्मानं" ही तुर्यावस्था आहे व सर्व ठिकाणीं आत्मादर्शन होणें हा त्या अवस्थेचा अनुभव आहे. "सर्व भूतानि चात्मनि"- आपल्या देहासुद्धां सर्व विश्व आपल्या ठिकाणीं आहे, सगुणविश्व आपणच बनलों आहों, परंतु विश्वाच्या सगुण मर्यादेपलीकडील, निर्गुणव्यापकता, आपल्या ठिकाणीं आहे, म्हणजे आपण आत्मा आहोत, हा अनुभव उन्मनी अवस्थेंतच

येतो. हें सर्व अभ्यासानें प्राप्त करून घेतां येतें. म्हणून त्याला " प्रत्यक्षावगमम् " असें गीतेंत म्हटलें आहे, त्यांतील अनुभवांची रूपरेशा नीट समजली, म्हणजे प्राणवोपासनेचें स्वरूप पूर्ण लक्ष्यांत येईल.

**दोरें चिरा कापे पडीला काचणीं । अभ्यासें सेवनों दिषपडे ॥**
**असाध्यतें साध्य करीतां सायास । कारण अभ्यास तुका म्हणें ॥**

नामस्मरण मनांत सुरू झालें म्हणजे निर्गुणबुद्धि इंद्रियें व विज्ञानमय मन, यांतून सुटून आत्मा प्रवृत्तींतून निवृत्तींत प्रवेश करतो हें आपण मागें पाहिलेंच आहे. परंतु निवृत्तीच्या या प्राथमिक अवस्थेंत, अर्थात तुर्यावस्थेंत, सगुण शक्तींतील पंचभूतांचेच निर्गुण स्वरूपांतील अनुभव स्वप्नांतील अनुभवा प्रमाणें, आत्म्याला येत असतात; म्हणून या निवृत्तींतही निर्गुणी परंतु द्वैती अवस्था कायम असते. हा निवृत्तींतला द्वैती भागही पुढें उन्मनींत नाहिसा होतो व आत्मा मूळ स्वरुपांत स्थिर होतो. अशा तऱ्हेनें प्रवृत्ति व निवृत्ति या दोहींचे भागांतून निर्गुणबुद्धि सुटल्या खेरीज पूर्णावस्था आत्म्याला प्राप्त होऊ शकत नाहीं म्हणूनच श्रीतुकारामांनी, " प्रवृत्ती निवृत्तीचें आटोनिया भाग । उतरीलें चांग रसायन ।। " असें सांगून, त्याकरतां कष्टच घेतले पाहिजेत व अभ्यासच केला पाहिजे, हा स्वानुभव साधकांकरतां नमूद करून ठेवला आहे. पाणी व दूध या दोहींचेही भाग आटवून नाहींसे केल्याखेरीज खवा तयार होत नाही. म्हणून त्या करतां कष्टच सोसलें पाहिजेत, श्री समर्थांनीं दासबोधांत, " धरितां सो टाकितां हं । अखंड चाले सोहं सोहं ॥ असें सांगून " हे शब्द सांडून बैसला । तो मौनी म्हणावा भला ॥ " अशी पूर्णत्वाची स्थिति वर्णन केली आहे. गीतेंतही, " मौनं चैवास्मि गुह्यानां । ज्ञान ज्ञानवहतामहं ॥ " असें म्हणून श्रीकृष्णांनीं आपली "दंद्याग़ि बुद्धि योगांत" हा नाम मार्ग दाखवून "अभ्यास योग युक्तेन" या वचनानें स्वत: पूर्णावस्था व्यक्त केली आहे. व त्या करता अभ्यासच केला पाहिजे असें अर्जुनाला बजावून सांगितलें आहे.

अभ्यासाखेरीज नुसत्या वाचिक गोंधळानें कधींही पूर्णत्व येऊ शकणार नाही. " रूप पाहतां लोचनीं । सुख झालें हो साजणी ।। असें तोंडानें म्हणता म्हणता हातांतील टाळ झिजून गेले तरी त्याचा यथार्थ बोध होणार नाही

व आत्मिक सुख कधीं मिळणार नाहीं. "मी स्थूल सूक्ष्म कारण देह नव्हे, मी सच्चितानंद आहे" वगैरे वेदांताचे धडे नुसते तोंडानें कितीही पाठ केले तरी त्यामुळें शुकनळिकान्यायानें आत्मस्वरूपाची प्राप्ति होणार नाही. टोपल्यांत भाकरी असली म्हणजे असा परमार्थ पुष्कळ बडबडतां येतो व भक्तीचें स्तोमही खूप माजवितां येतें. परंतु "अन्न आच्छादन हें तो प्रारब्धा आधीन" ही अभंगवाणी प्रत्यक्षांत उतरून टोपल्यांतील भाकरी संपल्यावर साक्षीभूत अवस्थेत प्रारब्धातील अन्न आच्छादनाची वाट पाहण्याचा प्रसंग येऊन ठेपला म्हणजे डोक्यांपुढें काजवे चमकून, "असेल त्याला असो। आमुच्या नांवें देव मेला" असें श्रीतुकारामांचे उग्दार चटकन आठवूं लागतात. सांगण्याचे तात्पर्य हें कीं परमार्थअंगीं बाणण्याला अभ्यासाचे कष्टच घ्यावे लागतात, नामस्मरणानें प्रथम प्रवृत्ति बंद करून नंतर त्याच्याच आधारानें निवृत्तींत स्थिर व्हावें लागतें. येवढयाकरतां अभ्यासच करावा लागतो. कष्ट घेतल्या खेरीज नुसत्या शब्द विज्ञानानें समाधान मानून राहिल्यास ती केवळ आत्मवंचना ठरेल व ऐन वेळीं अवसानघात होईल ! म्हणून अभ्यासाचे कष्टानें, "तुका म्हणे जीवें। आधीं मरोनी रहावें ॥" हेंच तत्व सांगण्या करतां समर्थांनीं, दास बोधांत, "गेलीं पंडितांचीं थाटें। गेलीं शब्दांचीं कचाटे ॥ असे वर्णन करून, शेंवटीं देह असतांनाच अभ्यासानें स्वस्वरूप प्राप्ति करूनच काळाला जिंकतां येतें हें "परी एकचि राहिले। जे स्वस्वरूपो मिळाले ॥" या ओवींत नामस्मरणाच्या अभ्यासाचे महत्व साधकाकरतां लिहून ठेवलें आहे. श्री ज्ञानेश्वरांनींही "अभ्यास योगु म्हणजे। तो हा एकु जाणिजे। येणें कांहीं न निपजे ऐसे नाहीं ॥" या ओवींत नामस्मरणानें "स सर्वं लक्षते, स सर्वं लभते, ॥ व "स सर्वं विद्भवति, सर्वं विद्भवति" हेंच उपनिषत्सर साठवून ठेवले आहे,



# अभ्यास

**ओठ कंठ हाल नहो । जिभ्या स्मरे न नाम ॥**
**राम हमारा जप करे । हम् बैठे आराम ॥**

शाळेंत विद्यार्थ्याला कविता पाठ करुन येण्यास सांगितलें असतां, विद्यार्थी कविता पाठ करतांना काय काय क्रिया घडतात? प्रथम मुलगा एका जागेवर स्वस्थ बसतो; या बसण्यांत कर्मेंद्रियांची खेळाकडील वगैरे प्रवृत्ति बंद होते; कवितेकडे लक्ष लागल्यावर निर्गुणबुद्धीनें ज्ञानेंद्रियें जखडली जातात, बाह्य मनप्रवृत्ति थांबविते, व श्वासाची गति खुंटून सगुणबुद्धितत्व ज्ञानेंद्रियांशी संलग्न होतें; अशा तऱ्हेनें यम, म्हणजे इंद्रियांचें नियमन, नियम म्हणजे मनाचें नियमन, आसन म्हणजे बैठक, व प्राणायाम म्हणजे श्वासनिरोधन, अशा चार क्रिया होतात; पुढें अभ्यास करतां करतां पुन: उठून खेळाकडे पळण्याची इंद्रियवृत्ति थांबविणें किंवा जागचे न हालतां अभ्यासांतून मन उडून जाऊं लागल्यास मनानें इतर गोष्टींचा विचार सोडून पुन: अभ्यासांत लक्ष घालणें, अशा प्रत्याहार व धारणा मिळून आणखी दोन क्रिया होतात. कवितेकडें सारखें लक्ष ठेवणें याला ध्यान म्हणतात, व ही सातवीं क्रिया होते; व पुन: पुन: पाठ करून कविता पूर्ण पाठ झाली म्हणजे ती आत्मसात होते; व मग पुस्तकाकडे पाहण्याची किंवा तोंडानें एकसारखें घोकण्याची जरुर रहात नाहीं; वाटेल त्या ठिकाणीं व वाटेल त्या वेळीं, कविता म्हण, असें म्हटल्याबरोबर मुलगा ती कविता म्हणून दाखवितो. याचाच अर्थ निर्गुणबुद्धि कवितेंशीं सम होते व त्यालाच तेवढ्या कवितेपुरती समाधी असें हणत

यम, नियम आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी, अशा योगाच्या आठ पायऱ्या आहेत, व म्हणून त्याला अष्टांग योग असें म्हणतात. योग हा शब्द, युज म्हणजे जोडणें, या धातू पासून झाला आहे, व त्याचा अर्थ प्राप्ति असा आहे. रोजच्या व्यवहारांत प्रत्येक गोष्ट करतांना, अष्टांग योगांतील सर्व आठ क्रिया, नकळत सतत होतच असतात. आसन याचा अर्थ केवळ मांडी ठोकून बसणें असा नसून, विविक्षित क्रियेंकरतां लाग-

णारी शरीराची विवक्षित स्थिति, असा आहे. विहिरींतून पाणी काढतांना किंवा लाकडें फोडतांना वाकावें लागतें, तर खेळतांना व पळतांना शरीर सारखें गतिमान ठेवावें लागतें; भांडीं घासतांना किंवा स्वयंपाक करतांना निराळीच बैठक घ्यावी लागते. कोणत्याही क्रियेकरतां बैठक लागते, मन, एकाग्र करावें लागते, व त्याकरतां यम नियमांची जरूर असते व त्यांतच प्रत्याहाराचा समावेश होतो; प्राणायामानें सगुण व निर्गुणबुद्धि एकाग्रतेनें मुख्य कामाकडे लागते व ध्यान धारणा सुरू होतात; व अभ्यासानें, म्हणजे सतत ध्यानानें, समाधी प्राप्त होऊन कार्य पूर्ण होतें. या आठ बाजू प्रत्येक क्रियेंत चालू असतात व त्या सहजधर्मानें होत असतात. परंतु, अतिपरिचयात् अवज्ञा, या न्यायानें तिकडे कोणी लक्ष्य देत नाहीं. परमार्थाचा अभ्यास सुरू झाला म्हणजे, अष्टांग योग, हे शब्द कानांवर येऊं लागतात. वेदांती लोकांच्या, सर्वच गोष्टींत, नसता भारदस्तपणा आणण्याच्या संवयीमुळें. व मोठेपणा दाखवून क्लिष्टता निर्माण करण्याच्या प्रवृत्तिमुळें, सहज नामस्मरण करुन, रामेश्वराचा आनंद उपभोगतांनाहि, अष्टांगयोगसाधन, हा आगडबंब शब्द वापरण्याची वहिवाट पडली आहे. नामस्मरण करतांना डावी उजवी नाकपुडी बंद करावी लागत नाहीं, किंवा मुद्दाम श्वास कोंडूनही धरावा लागत नाहीं; डोक्यावर उलटें उभे रहावें लागत नाहीं किंवा गळयांत तंगडया अडकून घ्याव्या लागत नाहींत सहज, कोठेंही, आपल्याला बरे वाटेल त्याप्रमाणे बसून, श्वासोच्छवासाबरोबर म्हणजे मनांत नामस्मरण केलें म्हणजे काम भागतें नामस्मरणाकडें लक्ष लागणें हा अष्टांग योगाचा हेतु आहें, व तो हेतु लक्षांत घेऊन आपल्या सोयी प्रमाणें व प्रकृतिमानाप्रमाणें, आळस उत्पन्न होणार नाहीं अशी शरीराची बैठक ठेवण्यास हरकत नाही. आजारी असल्यास निजून, आडवें होऊन नामस्मरण करावें; मुद्दाम होऊन त्रास होईल, असें कधीं करु नये; नाहीं तर नामस्मरणाकडील लक्ष्य शरीराला होणाऱ्या त्रासाकडे ओढलें जाऊन, मुळ मुद्दा बाजूला होईल ! नामस्मरण महत्वाचें आहे; बैठक गौण आहे !

मनांत नामस्मरणाला सुरवात झाली, म्हणजे सगुण व निर्गुण दोनी बुद्धितत्वें नामाशींच संलग्न होतात व आपोआपच इंद्रियें व विज्ञान

मय मन यांतून सुटतात हें मागें आपण पाहिलेंच आहे. हातांत आंबा घेतल्यावर ज्या प्रमाणें पांचीं ज्ञानेंद्रियांनीं त्याचें ज्ञान होऊं शकतें, त्याचप्रमाणें आंबा आरशा समोर धरला म्हणजे आरशांतील आंब्याच्या प्रतिबिंबानेंही आंब्याचें ज्ञान निर्गुणबुद्धीला होऊं शकते. हातांतील आंबा हा सगुण आहे व आरशांतील आंबा दृष्टांतापुरता निर्गुण म्हणतां येईल. दृष्टांतापुरता आरसा हा निर्गुण आहे व त्यांत कोणत्याही वस्तूचें दिसणारें प्रतिबिंबही दृष्टांतापुरतें निर्गुणच आहे. व्यवहारांत एकाच निर्गुणबुद्धीला सगुण व निर्गुण असें दोनी अनुभव घेतां येतात. त्याचप्रमाणें मनुष्याला परमार्थांतहीं अनुभव येत असतो. नामस्मरणाला सुरवात झाल्यावर प्रथम, निर्गुणशक्तीपासूनच उत्पन्न झालेल्या पंचभूतात्मक शक्तीचे निर्गुण, म्हणजे विज्ञानमयच परंतु इंद्रिय विरहित, असे, आत्मिक अनुभव निर्गुणबुद्धीला येऊं लागतात, हे अनुभव स्वप्नांतील निर्गुण अनुभवाप्रमाणेंच निर्गुण विज्ञान असते; परंतु स्वप्नांत पूर्णत्वांतून अपूर्णत्व उत्पन्न होत असते व नामस्मरणांत प्रथम सगुणत्वाच्या अपूर्णत्वांतून निर्गुण अपूर्णत्व – म्हणजे निर्गुणविज्ञान-उत्पन्न होते व शेवटीं हें निर्गुण अपूर्णत्व ही पूर्ण निर्गुणत्वांत विलीन होऊन जाते, म्हणजे देहबुद्धि पूर्ण आत्मबुद्धि होते. यालाच "योगाश्चित्तवृत्ति निरोध:" असें पतंजली योगसूत्रात म्हटलेलें आहे व चित्तवृत्ति निरोधाचा श्वासाबरोबर नामस्मरण हाच मार्ग आहे नामांतील निर्गुणशक्तीशीं निर्गुणबुद्धीची संलग्नता व त्यामुळें होणारा ज्ञानारंभ यालाच कुंडलिनी जागृत होणें असें म्हणतात. जागृति, स्वप्न व सुषुप्ति, व अर्थमात्रात्मक तुर्या या साडेतीन वेटाळ्यांत बसलेली कुंडलिनी नागीण म्हणजे निर्गुणशक्ति नामानें जागी होऊन पूर्णत्वात येते, म्हणजे उन्मनी अवस्था प्राप्त होते. हें सर्व नामांतील निर्गुणशक्तीमुळें होत असतें. अहंकारांत म्हणजे श्वासांत अव्यक्त असलेले चित्त सगुणबुद्धींत व्यक्त झाल्यावर नामांतील निर्गुणशक्तीशीं संलग्न झालें म्हणजे इंद्रियें व मन यांतून बाजूला होते, याचाच अर्थ चित्ताचा वृत्तिनिरोध होतो व देहबुद्धीचा आत्मबुद्धीशीं योग म्हणजे एकरूपता निर्माण होते. पण ही पूर्ण एकरुपता होईपर्यंत प्रथमावस्थेंत, नामस्मरण करतांना, कांहीं स्वसवेद्य असें अनुभव येत असतात निरनिराळे अनाहतध्वनि, - घंटा, टाळ, झांजा, मृदग, मुरली, सिंहनाद, भेरी वगैरे नामस्मरण चालू असतां आपले आपल्यालाच ऐकूं येतात व

मन त्यांत रंगून जातें. नाना तऱ्हेचें तेज व प्रकाश दिसूं लागतात; देहाचा पूर्ण विसर पडून आपण जलमय झाल्याचा अनुभव येतो; चंद्र, तारा, वगैरे डोळयापुढें डोळें मिटल्यावरही दिसूं लागतात. हे सर्व अनुभव निरनिराळे येतात किंवा एकाच वेळीं दोनीं तिनींही येत असतात. यांत प्रथम हा अनुभव व नंतर तो अनुभव असा अनुभवांचा अनुक्रम नसतो. कारण नामांतील निर्गुणशक्तीला स्थळकाळाचें बंधन नसते; परमेश्वराचेंच पूर्णत्व तिच्यांत असतें. मनाचा पूर्ण लय झाला म्हणजे हें सर्व विश्व आपणच आहोंत हा अनुभव येतो. यावेळीं शक्तींतील पांचीं तत्वांचा एकदम निर्गुण अनुभव येत असतो: या वेळी मानवी निर्गुणबुद्धीला आपल्या आत्मिक सगुणबुद्धीचा पूर्ण अनुभव येतो व सगुणनिर्गुण दोनीं बुद्धि एकरूप होतात. हीच तुर्यावस्थेची पराकाष्ठा; यालाच बुद्धिग्राह्यं अतिंद्रियं सुख असे म्हणतात; आणि हाच उन्मनीचा उंबरठा असतो ! ' अवघे विश्वचि माझे घर,' किंबहूना चराचर आपणचि जाहला," याचाच हा अनुभव ! यालाच जागृत समाधी असेही म्हणतात. अशा तऱ्हेचा मनाचा लय पुनः पुनः होऊं लागला, म्हणजे हुकमी जागृत समाधी करतां येते. मग देह वृत्तीवरही राहतां येते व एक क्षणांत पूर्ण विश्वांतही फिरतां येते. नंतर अभ्यासानें विश्वातअसूनही; आपण विश्वाहून वेगळे आहों, हा अनुभव येतो; पूर्ण उन्मनी अवस्था प्राप्त होऊन विदेहि जनक राजा प्रमाणें जीवन्मुक्ती भोगतां येते. अंगात दैवी संचार होणें हे क्षणिक उन्मनीचे उदाहरण, म्हणुन दाखवितां येईल, ' उन्मनी हीच खरी सायूज्यतामुक्तीं आहे; हिलाच स्थितप्रज्ञता, हें सार्थ नांव दिलेलें आहे. या अवस्थेचें वर्णन श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं फारच बहारीचें केलें आहे; तेव्हां त्यांच्यांच शब्दांत, ही स्थितप्रज्ञता सांगून ' अभ्यास पुरा करुं या ! श्री ज्ञानेश्वर म्हणतात:--

**तैसें संकल्पोंनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें ।**
**तेणें एक देशिये परी व्यापिले । लोकत्रय ॥**
**कां शस्त्रेवरी तोडिलिया । देह अग्नि माजीं पडलिया ।**
**चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोंचि नये ॥**

जेथ पुढील वैस पारूखें। मागील स्मरावें तें ठाकें।
ऐसिये सरसीये भूमिके। समाधि राहे ॥
कल्पना निमे। प्रवृत्ति शमे।
आंग मन विरमें। साविंयाचि ॥
क्षुधा काय जहाली। निद्रा केउनां गेली ॥
हे आठवणही हारपली। न दिसे वेगां ॥
जें शुन्य लिंगाची पिंडी। जे परमात्मया शिवाची करंडी ॥
जे प्रणवाची उघडी। जन्मभूमी ॥

अशा तऱ्हेनें जी निराकार ब्रम्हाची साकारमूर्ती, जी परमात्म्या शिवाची संबळी, व जी ओंकाराची केवळ जन्म भूमी, अशी स्थिति, म्हणजें पूर्णावस्था, शेंवटीं प्राप्त होतें. मग:--

तो मनुष्या सारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे
जैसें जळा माजी न बुडे। भानु बिंब ॥
जो हा विज्ञानात्मकु भावो। तया विवरितां जाहला वावो।
मग लागला जंव पाहों। तंव ज्ञान तें तोचि ॥
तें ब्रम्ह भाव योग्यता। पुरूष ग तो पंडु सुता।
आत्म बोध हा सन्नता। पदीं बैसे।
जेणें निपजे रससोय। तो तापुही जैं जाय।
तैं ते क होय। प्रसन्न जैसी ॥
तैसा आत्मबोधीं उद्यमु। करितां होय जो श्रमु।
तोही तेथें समु। होऊनि जाय ॥
मग देखिजे ना न देखिजे। ऐसी जे दशा निपज।
तें तें दर्शन माझें। साचो कारें ॥

म्हणोनि सर्व मी झालें पणें । ठेलें तया येणें जाणें ।
तेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥
कर्म करितचि आहे । जें करावें हे भाष जाये ॥
तें न करणेंचि होये । तयाचें केलें ।
क्रियाज्ञान मी जाले पणें । घडे कांहींचि न करणें ।
तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ॥
म्हणौनि करी तयाही बोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा ॥
निपजे तिया महापूजा । पूजीतो माते ।
एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन ।
अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥
तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा ।
तो असे तेचि कपिध्वजा । समाधि माझी ॥
तेथ बुद्धि जे बोधु बोधे । आनंदु घेपे आनंदें ।
सुखवरी नुसधें । सुखचि भोगिजे ॥
शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांति आला ।
अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें ॥
मग अभिन्ना इयासेवा । चित्त मियांचि सरेल जेव्हां ।
माझा प्रसादु जाण तेव्हां । संपूर्ण जाहला ॥

हीच तुर्यावस्थेची परिणती व हेंच उन्मनीचें ऐश्वर्य ! म्हणून श्रीगुरुचरित्रांत " जो जाहला अंतर - मनोन्मनी । तोचिश्रेष्ठ सकळिकां ।" असें म्हणून पूर्णावस्थेचें वर्णन केलें आहे. याच ऐश्वर्याचें " प्रातिभाद्वा सर्वं " असें पतंजलीनीं वर्णन करून, अखेर पूर्ण उन्मनी मध्यें शिवशक्ति एकरूप होऊन दृश्यद्रष्टा एकमेकांत विलीन होतात हें " तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् " यासूत्रांत सांगून अनुभवातीत स्थिति वज्रलेप करून

ठेवली आहे ! हाच श्री ज्ञानेश्वरांचा स्वानुभव व हीच त्यांची जिवंत समाधी ! हाच आपला आत्मसाक्षात्कार श्री समर्थांनी एकाच ओवींत सांगून, "सद्रूप चिद्रुप स्वस्वरूप । स्वस्वरूप म्हणजे आपुलें रूप । आपुलें रूप म्हणीजे अरूप । तत्वनिरसना उपरी ।। यांमध्यें सर्व दासबोधांतील निजबोध सांठवून ठेवलेला आहे ! श्री तुकारामांनींही "देव पाहायाला गेलों । देव होऊनिया ठेलों ।।" असे सांगून आपली आत्मप्रचीती व्यक्त केली व याच अभंगवाणींत "याजसाठीं केला होता अट्टाहास । शेंवटींचा दिस गोड व्हावा ।" हें आपल्या जन्मसार्थकतेचें समाधानही दिग्दर्शित करून ठेवलें आहे. श्री कृष्णांनींहीं "यस्मात्क्षरमतीतोऽह मक्षरादपिचोत्तम: । अतोऽस्मि लोके वेदेच प्रथित: पुरुषोत्तम: ।।" असें म्हणून आपलें व अव्यय परमात्म्याचें तादात्म्य दाखवून आत्मसाक्षात्काराचा कस शास्त्राच्या स्वाधीन केला आहे ! आणि "गुरुचरण प्रतापें पुण्यमार्पें जळालीं । त्रिभूवन समतीर्थें ज्ञान-गंगे मिळालीं । शूभ अशुभ पहातां भावना राम झाली । निशिदिनिं गुरुरायां उन्मनीं झोंप आली ।।" अशी सर्व संतमहंतांनीं वरील कसोटीला उतरल्याची साक्ष देऊनच ब्रम्हानंदांत समाधी घेतलेली आहे ! अशा तऱ्हेनें आत्मा प्रथम निर्गुणत्वांतून निर्गुणबुद्धितत्व बनतो, नंतर सगुणबुद्धि निर्माण होते, या सगुणत्वातून मानवी सगुणबुद्धि तयार होते व या मानवी सगुणबुद्धीच्या आधारावर विज्ञानमय झालेला आत्मा पुन: त्याच आधारानें पंच ज्ञानेंद्रियें व मन या षट्चक्रांतून सुटून नामस्मरणानें ज्ञान मय बनतो !



# नाम महिमा

**नामा परतें साधन नाहीं । जें तूं आणिक करिसी कांहीं ॥**

(श्री तुकाराम)

श्री समर्थांनीं दासबोधांत " चंचळ नदी गुप्त गंगा । स्मरणें पावन करी जगा ॥ " असें सांगून श्वासोच्छवास ही चंचळ नदी आहे, हिच्याबरोबर वहात जाऊन अधोगतीला जाऊं नका, असा उपदेश केला आहे नामस्मरणाच्या आधारानेंच या नदींतून वहात न जातां उलट पोहत जाऊन उगमापलीकडे पार होतां येईल. श्वासाने नामाला सतत घट्ट धरून ठेवलें, तरच ही सद्‌गुरूची निशाणी, कालांतरानें सद्‌गुरुरूप, म्हणजे आत्मरूप, दाखवूं शकेल. हीच नामाची निशाणी श्रीकृष्णांचें विश्वरूप अर्जुनालाही त्याचें हृदयांत विश्वरूप दाखवील, व कृष्णस्वरूप करून त्याला आत्मसाक्षात्कारी बनवील; ज्या श्वासानें त्याला परमेश्वरापासून वियोगी बनविलें, विभक्त केलें व अज्ञानामुळें कर्माच्या चंचळ चक्रांत टाकलें, तोच श्वास भगवत्‌नामाबरोबर अर्जुनाला योगी करील, भक्ताची पदवी देईल, व विश्वाभास मावळून टाकून प्रचंड ज्ञानसूर्य बनवून त्या प्रकाशांत भगवंतानींच सांगितल्या प्रमाणें, सर्व विश्व बगलेंत मारून, नामस्मरण करीत करीत आत्मरूप बनून " स याति परमां गतिम्, " या निर्वाणीच्या परम गतीला नेऊन, अर्जुनाला जगांत धन्य करुन सोडील ! म्हणून श्री गुरूचरित्रांत, " सहज नदी संगमांत । प्रयाग समान असें ख्यांत । अमरेश्वर परब्रह्म वस्तु । तया स्थानीं वास असे ॥ " या ओवींत श्वासाचें मार्मिक वर्णन करून त्याचें महत्व दाखविलें आहे. इडा पिंगलेचा सुषुम्तेंत संगम यालाच सहज संगम म्हणून त्यांतच परब्रह्म वस्तूचा वास असतो, हें सांगून " अमरेश्वर सन्निधानीं । आहेति चौसष्ट योगिनी । शक्तितिर्थ निर्गुणी । प्रख्यात असें परियेसा ॥ " या ओवींत श्वासांतील परब्रह्माचा निर्गुण महिमाही सूचित केला आहे.

नामस्मरणानें अशा तऱ्हेनें साक्षात्कार झाल्यावर सर्व विश्व ब्रम्हरुप होतें. सद्वस्तु झालेले संत शब्दाला परमेश्वर रूप पाहतात. अखिल नामरुप भगवंताचेंच आहे हा अनुभव आल्यावर ते म्हणतात, " परमेश्वराला

कोणत्याही नांवानें पण अहर्निश हांक मारीत रहा ! " अखंड नामस्मरण श्वासानेंच होऊं शकतें व याच नामाच्या संगाला सत्संग म्हणतात. नुसतें गांजा ओढीत साधू जवळ बसणें हा सत्संग नव्हे. नाममहिमा व नाममार्ग तो हाच. संत कबीर म्हणतात,-" जिस नामसे ध्रुव प्रल्हाद तरे। वो रामनाम कुच और; " कारण प्रत्येकजण रामराम म्हणतच असतो पण त्या रामनामानें वैखरीमुळें आत्मसाक्षात्कार होणार नाहीं. रामनाम श्वासाबरोबर चालूं असेल, तरच, तें परमेश्वराची भेट करवूं शकेल ! नुसत्या वैखरी वाणींतलें रामनाम, श्रद्धेच्या जोरावर, ससारिक कामें करूं शकेल, व त्या कार्यांनीं वासना पूर्ण होऊं शकतील; परंतु रामनामाचीं, ती सर्व मर्यादित स्वरूपाची, ओळख होईल श्वासात अडकवल्याखेरीज, व नामाला ओंकारांत पावन केल्याखेरीज, पूर्णत्वाची प्राप्ति होऊ शकणार नाहीं. 'आठवतेंचि ब्रह्म । नाठव तेंचि माया ।। ' ही स्थिति, श्वासाखेरीज येणार नाहीं; व हुकमी शांति माणसाला मिळणार नाहीं. नामस्मरणाच्या अभ्यासानें, ही हुकमी शांति, पैदा करून घ्यावी व मग खुषाल देहपातापर्यंत, संसाराचें दळण दळीत बसावें, असें श्री तुकाराम महाराजांनीं सांगितलें आहे. ते म्हणतात, " हालवूनी खुंट आधीं करावा बळकट । मग तयाचे आधारें अ घवेचि करणें वरे ! " दळण्याचें अगोदर, बायका जात्याचा खुंटा हालवून पक्का करुन घेतात, व मग, वाटेल तेवढें दळण त्या जात्यावर दळून काढतात. त्या प्रमाणें, श्वासोच्छवासांतून हा रामनामाचा खुंटा हालवून बळकट करुन घ्यावा व मग संसार करावा, म्हणजें मनुष्य करून अकर्ता होऊं शकेल, व 'चाल केलासी मोकळा ' ही निर्भय अवस्था प्राप्त होईल!

माणसाचीं सर्व धडपड सुखांकरतां चालूं असते; 'आत्यंतिक सुख हें इंद्रियांतीत पण बुद्धिगम्य असतें, ' असें श्रीकृष्ण सांगतात. हें आत्यंतिक सुख, म्हणजे आत्मिक सुख श्वासांतील नामस्मरणा खेरीज, अन्य मार्गानें मिळूं शकणार नाहीं; व तें प्राप्त झाल्या खेरीज, इंद्रियांनीं मिळणाऱ्या विषय सुखांचा, विराग निर्माण होणार नाहीं, किंवा अत्यंत आवश्यक, अशा विवेकालाही प्रारंभ होणार नाहीं. आत्मिक भारी सुख मिळूं लागले, म्हणजे इंद्रियांच्या विषयीं सुखाकडे, मनुष्याचा कानाडोळा होऊं लागतो; म्हणूनच

त्याचा विराग उत्पन्न होऊन, वैराग्य निर्माण होतें. नुसतें बुद्धीच्या जोरावर विषयसुख नाशवंत आहे, हे समजून मनुष्य विरागी होणार नाहीं, व जबरदस्तीनें झाल्यास तें वैराग्य कायम टिकणार नाहीं. विषय विरहित, आत्मिकसुखांत मन रंगून, विषयसुखाची आठवणच होत नाहीं, अशी सहज-स्थिति झाली, तरच तें वैराग्य टिकेल व त्याच विरागाला खरी किंमत आहे. नाहींतर, तो ' मिथ्याचार:स उच्यते ' असें श्रीकृष्णानीं गीतेंत म्हटलें आहे; त्याप्रमाणें मिथ्याचार ठरेल ! ते म्हणतात " कर्मेंद्रियाणि सयम्य य आस्ते मनसा स्मरन् ' इंद्रियार्थात्विमूढात्मा मिथ्याचार:स उच्यते ।। "

नामस्मरणानें भारी सुख व हलकें सुख यांची तुलनात्मक परिक्षा करतां येऊं लागते; व त्या बरोबरच सर्व पदार्थांची व कर्मांचीही योग्य किंमत ठरवतां येते याला च विवेक, असें म्हणतात. विवेक सुरु झाला, म्हणजे मनुष्य नसत्या गोष्टींना, नसतें महत्व देत नाहीं. खरा विवेक, व खरें वैराग्य अंगवळणीं पडल्या खेरीज; इंद्रियवृत्ति नुसत्या शाब्दिक बुद्धिवादाने बदलूं शकणार नाही; सतत नामस्मरणाचा, अहर्निश श्वासाबरोबर, अभ्यास असेल तरच माणसाची भरंगळत जाणारी वृत्ति, पालटू शकेल, व पुराणांतली वांगी पुराणांत न राहतां, " बोले तैसा चाले " हा सहजधर्म निर्माण होउन, मनुष्याला जगवंद्य होतां येईल. नामस्मरणानें ' अंतरीं गेलिया अमृत ' बाह्य काया लखलखित ' असें होईल म्हणजे, सबाह्य अभ्यंतरीं जिकडं तिकडे आत्म-रुप पाहून, आनंद मय होऊन मग वृत्ति बंद पडेल !

या सच्चितानंद पदावर, अखंड नामस्मरणाखेरीज अखंड उभें राहतां येणार नाहीं. ' नामस्मरण करणें, ' म्हणजेच जर, सच्चितानंद असणें, असें आहे, तर नुसतें बुद्धीनें ' मी सच्चितानंद आहे, ' असें समजून,-त्याचा सतत अभ्यास न करतां–आम्हाला सर्व समजलें, आतां साधनाची, अखंड नामस्मरणाची; कांहीं जरुर नाहीं, आम्ही सदा ब्रह्मांतच साक्षीभूत असतों, असें, सिद्धत्वाच्या संभ्रमांत राहणारे. व आत्मवंचना करून घेतलेलें, केवळ पोपट आहेत, असें समजून शहाण्यांनीं वेळींच, त्यांचे पासून दोन पावलें दूर राहणेंच, इष्ट ठरेल. देहपातापर्यंत, अखंड नामस्मरणाविरहित, आम्हांत नुसते निराधार राहतां येत नाहीं, हा ठाम सिद्धांत आहे. म्हणून, थोडासा दुरभिमान बाजला

सारुन, आत्मकल्याणाकरतां, आपली चूक सुधारणें, वरील विचारांच्या लोकांना श्रेयस्कर ठरेल. विवेक व वैराग्य यांचा मगच खरा अनुभव येईल!

विवेक करुन, व वैराग्य घेऊन, नंतर परमार्थाच्या वाटेला लागावयाचे, असा उलटा क्रम नसून, जिज्ञासाबुद्धीने, अगोदर परमेश्वराच्या किंवा परमार्थाच्या मार्गाला श्वासांतील नामस्मरणानें सुरवात करावयाची व त्यांत बुद्धीची वाढ होऊं लागली, म्हणजे, त्या पासून विवेक उत्पन्न व्हावयाचा व विवेकानें बुद्धिला आत्मसुखाची गोडी लागूं लागली म्हणजे बिषय सुखाबद्दल वैराग्य उत्पन्न व्हावयाचें, असा सरळ तर्कशुद्ध क्रम परमार्थांत चालू असतो. शाळेंत जायला लागून, तेथील अभ्यासाची गोडी लागूं लागली, म्हणजे आपोआप गोटया खेळण्याचा नाद सुटतो; गोटयांची मग आठवणही नाहिंशी होते त्याच प्रमाणें, विवेक व वैराग्य, हा परमार्थाच्या अभ्यासाचा परिणाम आहे; हीं दोनी परमार्थाची साधनें नाहींत, श्वासांतील नामस्मरण, हें एकच परमार्थाचें साधन आहे व त्याला एका पाऊलाची वाट,' असे म्हणून, श्री तुकारामानीं दुजोरा दिलेला आहे. विवेक व वैराग्या प्रमाणेंच, "अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्। दया भूतेष्वलोलुपवं मार्दवं हीरमा पलम् । तेजःक्षमा धृतिः शौचमदाहोनाति मानिता।" या तत्वांचीही स्थिति आहे; हे सर्व आत्मज्ञानाचें परिणाम आहेत. हीं ज्ञानाचीं साधनें नाहींत. सर्व विश्व आपणच आहोत, हा अनुभव आल्यावर, मुद्दाम होऊन कोण कोणाची हिंसा करणार. शिवाय हा अनुभवही देह असे पर्यंत निवृती पुरताच, तात्कालिक असतो; म्हणून सगुण रक्षणाकरतां सगुणाचे नियम पाळावेच लागतात; आणि आपल्या लीलेकरतां, विधात्यानें उत्पन्न केलेल्या विश्वाचे नियम मोडण्याचा तरी मानवाला काय अधिकार आहे? आत्मसाक्षात्कार झाल्यावर, चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तथा ॥" असें सांगणारे श्री तुकाराम महाराजच उन्मनी अवस्थेला पोंचेपर्यंत, "सर्प विंचू नारायण । परी नमस्कार दुरून ॥" हा अभंग इषारा देतात व द्वैताद्वैताची भेसळ करूं नका, असेच स्पष्टपणें सांगतात, या धोक्याच्या सूचनेला न जुमानतां आततायी पणानें हट्टी बनून दिवांध झालेल्यानां आपल्या

अविचाराचे अनिष्ट परिणाम भोगावे लागले आहेत व पुढेही तसेच अनुभव येतील हाचवरील अभंगाचा भावार्थ आहे. या विषयीं जास्त चिकित्सा करण्याचें हें स्थळ नव्हें.

कांहीं लोक कामक्रोधादि षड्रिपू जिकण्याच्याच मागें लागतात. षड्रिपू जिकल्याखेरीज परमेश्वर भेटणार नाहीं असा ठाम ग्रह उराशीं बाळगून व षड्रिपू जिंकणें अशक्य आहे, हें समजून आल्यावर, हताश होऊन, ते निष्क्रिय होऊन बसतात. परमेश्वरानें कामक्रोधादि गोष्टी कांहीं कार्याकरतां निर्माण केल्या आहेत, व तेवढया पुरतां त्यांचा उपयोगही माणसाला होऊं शकतो; या निर्माण झालेल्या गोष्टींवर मानवाची सत्ता नसते; तो प्रकृतीचा सहज धर्म असतो. व संकल्पित शक्ती विधात्यानें त्यांत ठेवलेली असते. त्यांचा सशास्त्र योग्य उपयोग केला, म्हणजे त्या बाधक होऊ शकत नाहींत हा नियम काम क्रोधादिकांनाच लागूं नसून, प्रत्येक वस्तूला, हाच नियम लागू असतो. चाकूनें आंबा कापतां येतो व गळाही कापून घेतां येतो; म्हणून चाकू जगांतून नाहिसे करावेत, असें म्हणण्याप्रमाणेंच वरील तऱ्हेच्या लोकांची विचारसरणी असते. वस्तूच्या उपयोगाच्या योग्य ज्ञानाच्या अभावीं, ही विचार सरणी उत्पन्न होत असते, व त्यांत काठिण्य दाखवून, परमार्थाचे कष्ट चुकविण्याचाही अंगचुकारपणा भरलेला असतो, लढाईला निघालेल्या शिपायाला घोडयावर बसविलें, हातांत ढाल तरवार दिलीं, व अशी लढाईची योग्य साधनानीं तयारी करून दिली, तर रडत रडत म्हणतो, “ माझे हात ढाल तरवारीत गुन्तले, पाय रिकिबींत गुंतले, घोडा मांडचांत अडकला, आतां मी लढूं काय, कपाळ ? ' ही गोष्ट “ ढाल तरवारे । गुतले हे कर ' या अभंगांत तुकारामांनीं सांगून, मनुष्य, उपायालाच अपाय, कसा ठरवितो हें दिग्दर्शित केलें ।हे कामक्रोधादिकांची पूर्ण उपयुक्तता आहे. हे विसरून चालणार नाहीं; त्यांचा उपयोग चांगल्या तऱ्हेनें करून घेण्याकरतांच परमार्थाच्या अभ्यासाची आवश्यकता आहे, व हीच परमार्थाची शिकवण आहे, काम क्रोधादि सर्व नाहिसें झाल्यावर, निर्गूण निर्विकार माणसाला परमेश्वराची तरी काय जरूरी आहे ?

मनुष्य उच्च गोष्टींचा विचार करूं लागला म्हणजे खालच्या गोष्टींत तो फार लक्ष घालीत नाहीं; वाजवी पेक्षां फाजील महत्व, तो क्षुल्लक गोष्टीला देत नाहीं इतकेंच ! त्याला विश्वांतील प्रत्येक वस्तूचा उपयोग, व त्या मानानें त्यांची योग्य किंमत यांची पूर्ण जाणीव असते, व तो विश्वाला कमी लेखतही नाहीं. परमेश्वराशीं तुलनात्मक दृष्टीनें, विश्वाची किंमत तो कमी मानत असतो. जीवनाला अन्नाची जरूर आहे, म्हणून दिवसभर सारखें खातच बसावयाचें नसतें, किंवा माणसाला करमणूक आवश्यक आहे, म्हणून रात्रं-दिवस रेडिओच ऐकत काळ घालवावयाचा नसतो; कांहीं विशिष्ट हेतु साध्य करण्याकरतां देहाची आवश्यकता आहे व देहाकरतां अन्नाची व करमणुकीची जरूर आहे. त्याचप्रमाणें आत्म प्राप्तिकरतां,–आत्मसाक्षात्काराकरतां,–व नंतर भक्ति वाढविण्याकरतां म्हणजे अज्ञानी लोकांना ज्ञानी करून, त्यांचे बरोबर आपला आत्मानंद द्विगुणित भोगण्याकरतां, देहाची व जगांतील पदार्थांची जरूरी आहे; व तेवढी योग्य किंमत खरा ज्ञानी पुरुष, विश्वकर्माला देतही असतो. पूर्ण ज्ञानाबरोबर विश्वाकडे पाहण्याचि त्याचि दृष्टीही पूर्णच झालेली असते !

अशा तऱ्हेनें, आत्मसाक्षात्काराचें निश्चित स्वरूप, व त्याचा निश्चित मार्ग, समजून, नंतर मनुष्य त्याचे अभ्यासाला लागला, म्हणजे मग मध्येंच त्याची कुचंबणा होत नाहीं. " भेटों जाता राजद्वारीं । बळेच धरिला बेगारी,।" अशी समर्थांनीं वर्णन केल्या प्रमाणें, त्यांची स्थिति होणार नाहीं. कांहीं तरी अलौकिक चमत्कार दाखवून, त्याला कोणी योग्य मार्गापासून च्यूत करूं शकणार नाहीं. नामस्मरणाला बसलों असतां कल्पना मनांत येतात, ही नेहमींची ठराविक तक्रार मग कोणी करणार नाहीं; कारण, वृत्तीच्या म्हणजे श्वासाच्या उदयाबरोबरच कल्पना उत्पन्न होत असते, व तो वृत्तीचा सहजधर्मच आहे, हें समजल्यामुळें, नामस्मरणानेंच, कल्पनेची तीव्रता कमी करत करत, तिला असून नसल्यासारख्या स्थितींत ठेवावयाची असते, व हें सर्व अभ्यासानेंच साधावयाचें असतें, हें आपणाला निश्चित समजलेलें व बुद्धीला पटलेलें असतें. संसारांत उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांची व विचारांची लहानमोठी वर्गवारी करून, त्याचें निकालाची झटकन कल्पना येऊन, सर्वांची नीट वासलात या नामस्मरणाचें अभ्यासानेंच लावतां येतें.

असा नामस्मरणाचा अभ्यास करतां करतां, आपले गुणदोष आपल्याला कळावयाला लागून, खोटया देहबुद्धीच्या अभिमानाला सोडून, न्यायी बनून, आत्मपरीक्षणानें, मनुष्य आपल्याला सुधारूं शकतो. श्री तुकारामांनीं सांगितल्या प्रमाणें, “ रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य मन आणि जग ।। ” अशी सतत मनाची स्थिति चिमटयांत सांपडलेंली असते, एकाग्रतेचें तत्व कळल्यामुळें, कल्पनेंत किंवा निर्विकल्पांत म्हणजे संसारी विचारांत किंवा नामस्मरणांत, कांहीं मर्यादित काळच, आपण एका स्थितींत टिकूं शकतों व त्या काळाची मर्यादा, वृत्तीच्या म्हणजे श्वासाच्या उदयास्ता इतकींच असूं शकते, या अनुभवानें, सतत निर्विकल्प होऊन राहण्याचा काल्पनीक अट्टाहास सोडतां येतो, देह आहे तो पर्यंत श्वास म्हणजे वृत्ति आहे, व वृत्ति बरोबर कल्पना उत्पन्न होणारच, म्हणून देह पातापर्यंत कल्पना निवृत्ती संपूर्णत्वानें होऊं शकत नाहीं, हा सिद्धांत ठरल्यानंतर, आहे या देहस्थितींतच, नामस्मरणानें वृत्तीकडे, म्हणजे कल्पनेकडे, दुर्लक्ष करण्यास शिकावयाचे असतें व त्या करतांच नामस्मरणाची आवश्यकना असते.

गवताच्या गंजीत निखारा टाकल्यावर, प्रथम कांही वेळ धूर सुरू होतो, मग जाळ दिसू लागतो, जाळाचा भडका होतो व अखेर पुर्ण गवत जळून गेले म्हणजे जाळ नष्ट होऊन, गंजही नष्ट होते. त्याचप्रमाणें नामस्मरणाला सुरवात केल्यावर विवेकाला सुरवात होते. मग वैराग्य निर्माण होते, कल्पना ओहोटीला लागून, दिवसेंदिवस मन नामस्मरणांत रंगून जाऊन, देहबुद्धि फिकी पडते, व शेंवटीं आत्मबुद्धी वाढत वाढत, आपण नामस्मरण करीत आहोंत ही जाणीवही कमी होऊन, नकळत नामस्मरण चालू राहते, देहबृद्धीची पूर्ण आत्मबुद्धि बनतें, व साधक उन्मनीच्या ऊंबरठयांत पाउल टाकतो, सर्व विश्व मीच आहे हें कळून, परमेश्वराप्रमाणें, आत्मसाक्षात्कारी श्रीकृष्णां प्रमाणें, आपणांत विश्व दिसून आपल्या विश्वव्यापकत्वाची स्थलकालातीतत्वाची अविनाशीत्वाची, अव्यक्तत्वाची, चराचरत्वाची व निर्गुणत्वाची साक्ष, तो याच वेळीं देऊं शकतो.

पायाला मुन्गी चावल्याबरोबर जसा हात सहजासहजी तेथें जाऊन मुन्गी बाजूला सारतो, व हात व पाय दोनी आपणच, व आपलेच आहेत, अशी

साक्ष आपणाला मिळते, देह ज्या ज्या ठिकाणीं जन्मल्यापासून हिंडला त्यासर्व ठिकाणांची व काळांची जशी साक्ष आपल्याला देतां येते, त्याचप्रमाणें म्हणजे या देहबुद्धीच्या माणसाप्रमाणें, आत्मबुद्धीच्या पुरुषाला, संत बनलेल्या सत्पुरुषाला किंवा पुरुषोत्तमाला, विश्वांतल्या सर्व स्थळकाळांतील सर्व कर्मांची साक्ष देतां येते, व ती देतां आलीच पाहिजे! श्रीकृष्णांनीं अशी साक्ष दिलेली आहे; सर्व सिद्ध पुरुषांनींही अशीच साक्ष दिलेली आहे, म्हणूनच हा सिद्धांत ठरलेला आहे. आत्म्याचे यथार्थत्व यांत अनुभवाला येते, व म्हणूनच याला आत्मसाक्षात्कार असें म्हणतात.

या प्रमाणें शास्त्र प्रचीतीचा पडताळा आत्मप्रचीतींत दिसल्यावरच तो पुरूष, आप्तवाक्य प्रमाण, म्हणून जगाला मार्गदर्शक मानतां येईल. अशी साक्ष घेतल्या खेरीज, कोणी कोणाचे नादीं लागूं नये. ज्ञानाच्या भ्रमांत व घमेंडींत, गाद्या मांडून बसलेले अर्धवट लोक, आपल्या शिष्यांची न कळत दिशाभूल करून, ' अशी वरील प्रमाणें, साक्ष देतां येणें हा एक सिद्धीचा प्रकार आहे ' असें सांगून आपण शिकवत असलेल्या ज्ञानाच्या भ्रमांत त्यांना ठेवतात, व शिष्य वर्गही गुरूपदाच्या खोटया अभिमानांत, खऱ्या ज्ञानाला पारखा होऊन, ' आंधळयाच्या मागें लागले आंधळे । घात एक वेळ मागें पुढें। या श्री तुकारामांच्या ऊक्ती प्रमाणें, आपण होऊन खड्डयांत पडतो !

कारण, सिद्धी सिद्धी म्हणून ज्याला आपण नांवें ठेवतो, ती स्थिति वास्तविक काय असतें याचा कोणी विचारच करीत नाहीं, प्रकृति, ही, पृथ्वी आप तेज वायू आकाश व मनबुद्धि व अहंकार, अशी आठ प्रकारची बनलेली आहे, व या तत्वांवर पूर्ण सत्ता मिळविणें याचेंच नांव सिद्धि ! अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशला व वशिला अशा सिद्धीही आठ प्रकारच्याच आहेत अष्टधा प्रकृतीवर संपूर्ण ताबा मिळविणें, म्हणजेच या अष्ट महासिद्धिप्राप्त करून घेणें, असा तात्विक अर्थ आहे. कोठल्याही एका तत्वावर पूर्ण ताबा मिळवता आला, म्हणजे आपोआपच, सर्व तत्वें ताब्यात येऊं शकतात, पूर्णत्व प्राप्त झाल्या खेरीज, एकाही तत्वावर ताबा मिळवता येत नाहीं व आत्म साक्षातकारी होऊन परमेश्वर बनल्या ।

खेरीज, पूर्णत्व येऊं शकत नाहीं. म्हणून परमेश्वर बनणें म्हणजेच सिद्ध होणें, हा सिद्धांत आहे, मग ही सिद्धीची भीति कशाकरतां व कोणाकरतां ? आणि परमेश्वर प्राप्ती खेरीज या सिद्धिकोठून मिळाल्या व कोणी मिळवल्या ? परमेश्वर प्राप्ति, ही एकच खरी सिद्धि आहे. व ही तिजोरीची किल्ली मिळविली म्हणजे तिजोरींतील सर्व लहान मोठीं नाणीं प्राप्त होऊं शकतात. परमेश्वराची योग्यता प्राप्त झाल्यावर, मग सिद्धींना भिण्याचें तरी काय कारण आहे ? सिद्धि पूर्ण ताब्यांत ठेवण्याला, परमेश्वर समर्थ नसतो काय ? असो.

कांहीं जण नामस्मरणाची वगैरे कांहीं जरूर नसून नुसत्या तर्कानें तुम्ही ज्ञानी होऊं शकाल, असें सांगून स्वतः भ्रमांत राहून 'नेति नेति' चा मार्ग सुचवीत असतात व विश्वाचा निरास केल्यावर, उरलेली वस्तु, ती 'तू' असें सांगून शिष्याला शून्यत्वांत टाकून, फक्त विज्ञानाला विसरून जाण्याचा मार्ग दाखवीत असतात. " इकडे विश्व तिकडे ब्रम्ह । मध्यें शून्यत्वाचा ठाव ।। " असें सांगून, नेति नेति म्हणून शून्यत्वांत पडूं नका असा श्रीसमर्थांनीं इषारा दिलेला आहे. ''नभावें शून्यत्व गिळून गुणत्रयातें नुरवून । तें शून्यतें महाशून्य । श्रुतिवचन संमत" असें श्रीज्ञानेश्वरांनींही स्वच्छ सांगितलें आहे. " सद्रुप चिद्रुप सस्वरूप । आपुलें रूप म्हणिंजे अरूप । तत्वनिरसनाउपरी । " यांतील अरूपाला म्हणजे निर्गुणत्वाला न पोचतांच लोक शून्यत्वांत घोटाळतात व "माप आणि गोणी । तुका म्हणे रिती दोनी ।। " या न्यायानें शिष्यवर्गही विठ्ठल विठ्ठलच करीत बसतो.

कांहीं लोक, देहकष्टाला कंटाळून, " पुनर्जन्म चुकविण्या करतां रामनाम घेऊन मुक्ति व्हा, चौऱ्यांशीच्या फेऱ्यांत सांपडूं नका, " असें टाहो फोडून सांगत असतात. परंतु पुनर्जन्म टाळण्याकरतां केवळ परमार्थ नको आहे. परमेश्वर स्वतः जर विश्वकर्माला कंटाळून, विश्वाचा प्रलय करीत नाहीं किंबहुना आपल्या लीलेकरतां विश्व निर्माण करीत असतो, तर माणसाला तरी कंटाळून पुनर्जन्माला भिण्याचें काय कारण आहे ? शिवाय सायुज्यता मुक्ति मिळवणें, म्हणजे, जर स्वतः परमेश्वर बनणें, असें आहे, तर स्वतः परमेश्वर झाल्यावर विश्वकर्म सुटणार कसें ? परमेश्वराचें कार्य, पुढे चालू ठेवावयास नको काय ? आणखी जो पर्यंत माणसाला मागल्या जन्माची पूर्ण

विस्मृति आहे, तोंपर्यंत, प्रत्येक जन्म हा अगदीं नवीन जन्म आहे, कां मागच्या जन्माचाअनुक्रम आहें हे कळणार कसें ? व हें जो पर्यंत कळत नाहीं तो पर्यंत, प्रथमच जन्माला आलेला प्राणी व पुनर्जन्मानें जन्माला आलेला प्राणी, यांत फरक काय ? सांगण्याचा हेतु येवढाच, कीं, मुक्तीची घाई व धडपड नको ! याच देहीं याच डोळां आत्मसुखाचा सोहळा पाहतां यावा व आत्यंतिक सुख माणसाला लाभावें, तीनी लोक आनंदानें भरून जावे, हाच परमार्थाचा उपयोग आहे ।

या आनंदा करतांच, ॐ काराच्या उगम बिंदूवर उभे राहून विश्वाकडे व ब्रम्हाकडे डुलत राहतां येण्याला श्वासोश्वासा बरोबर नामस्मरणाचीच जरूर आहे; त्या करतां नामाचा सतत ध्यास केल्या खेरीज, व त्या करता कष्ट उचलल्या खेरीज नुसत्या शब्दज्ञानानें वा तर्कानें काम भागणार नाहीं. कुशलतेनें कर्म करण्याला लागणारा योग, म्हणजेच श्वासांतील नामस्मरण व तेंच कर्माची व अकर्माची एकत्रीत सांगड बांधू शकेल, जागृत समाधी त्यानेंच प्राप्त होईल, श्वासाबरोबर अहर्निश वारी करून श्री तुकारामानी, याचमार्गानें देह पंढरीत, पंढरीराव आत्म्याची भेट घेऊन त्याला विवेकाच्या विटेवर सतत खडा करून ठेवला आहे. समाधि मंदिराचा एकमेव मार्ग, अखड नामस्मरण हाच आहे, असें सर्व संतांनीं कंठरवानें आज पर्यंत सांगून, श्वासाला त्या मार्गाचा वारकरी करून ठेवला आहे ! श्री मद्भगवद्गीतेनें, याच आत्मसाक्षात्कारी विश्वधर्माची पताका, मानवतेच्या हातांत देऊन, भारताला जगांत अजरामर करून ठेवलें आहे !



# गीतेचा अंत:प्रवाह

श्रीमद्भगवदगीता, हा स्वानुभवाच्या पायावर रचलेला व अखिल मानवतेला आत्मोन्नतीच्या शिखरावर तर्कशुध्द मार्गानें पोंचविणारा, असा, विश्वतत्वज्ञानाचा अनमोल ग्रंथ आहे. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिलेला असल्या मुळे, सर्व साधारण जनतेला फार दुर्बोध आहे. मूळ ग्रंथावर केलेल्या श्री शंकराचार्यादिकांची संस्कृत भाष्यें व टीका, तर त्याहून कठीण आहेत. म्हणून ज्ञानेश्वरी ही मराठी टीका लिहून श्रीज्ञानेश्वर महाराजांनी गीतेंतील तत्वज्ञान सर्वांनी समजण्याची सोय करून ठेवली, गीता हा प्रश्नोत्तर रूप असल्या मुळें, त्यांत विषयांची धरसोड झालेली आहे व ती अपरिहार्यही आहे. श्रीकृष्णांनीं एक विषय सांगण्यास सुरवात करावी, तों मध्येंच अर्जुनाने शंका घेऊन दुसराच प्रश्न विचारावा, मग मूळ विषय बाजूला सारून त्याच्या प्रश्नाचें उत्तर दिल्यावर, पुन: पहिल्या विषयावर यावें असा प्रकार एकंदर ग्रंथांत होत राहिलेला आहे, व तीच संगति ज्ञानेश्वरींतही ठेवावी लागली आहे. परंतु त्या योगाने धरसोड होऊन, सर्व ग्रंथ वाचूनही, वाचणाराला ग्रंथाची यथार्थ ज्ञान संगतवार सांगता येत नाहीं, जन्मभर गीताज्ञानेश्वरीची पारायणें करूनहीं पुष्कळांनां परमार्थाची खिरापत इतरे जनांच्या हातांवर ठेवतां येत नाहीं ते मोठया सौजन्यानें म्हणतात, ' अहो, जन्माला येऊन, एकतरी ओवी अनुभवावी अशी त्या ग्रंथाची थोरवी, त्याचा निष्कर्ष, आम्ही पामर काय वर्णन करणार

लोकांना अशावें सिध्दपण पहावयाचें नसते, फक्त ग्रंथांविषयची रूपरेषा थोडक्यांत कळून घेण्याची त्यांची इच्छा असते, कारण ही रूपरेषा समजली तर हा विषय आपल्या आवाक्यातला आहे किंवा नाहीं हे कळून, त्याप्रमाणे आपल्या आयुष्यांची आंखणी करण्यास, जिज्ञासूला सोयं होतें. या दृष्टीनें गीतेंतील प्रव. कसा वाहतो आहे हे आतां पाहू या. त्या योगानें जिज्ञासूची सोय होईल व मागील प्रकरणांतून जो विषय आलेला आहे, त्याचाही गीतेंतील विषयाशी मेळ घालता येईल; अणि, अजून गीतेला पत्ताच नाहीं, हें वाचकांचें आश्चर्य दूर होईल. आतांपर्यंतच्या प्रकरणांतून गीतेंतीलच सर्व विषय आलेला आहे, परंतु त्या ठिकाणांतून गीतेंतील संदर्भ श्लोक दिले असते तर वाचकांनां अडखळ अडखळत चालावें लागले असते, म्हणून सर्व विषयांची साद्यंत कल्पना देऊन शेवटीं गीतेंतील एकवाक्यता दाखविली आहे. असो.

भगवान श्रीकृष्णांनीं, अर्जुनाला आपलें यथार्थ रूप सांगतांना, अप्रत्यक्ष पणें परमेश्वराचेंच वर्णन केलें आहे व येथून, गीतेंतील आत्मज्ञानाला सुरवात झाली आहे. परमेश्वर सर्व स्थळकाळ व्यापक आहे, सर्वज्ञ आहे, सर्व कर्ता आहे व निर्गुण असून, तो अव्यक्त आहे, हें पुढील श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. आत्मसामर्थ्य तें हेंच !

## परमेश्वर

**(१) अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**
**अहमादिश्चा मध्यं च भूतानामन्तएव च ॥**२०/१०.

सर्व भूतांच्या अंतरीं असणारा आत्मा, हे गुडाकेशा, मी, व भूतांचा आदि, मध्य व अंतरीं मीच.

**(२) वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥** २६/७ अ

वर्तमान, भूत, भविष्य, काळांतील सर्व प्राणी मी जाणतो; पण हे अर्जुना, मला कोणीही जाणत नाहीं.

**(३) नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥** २५/७अ

योग मायेनें अच्छादित असल्यामुळें मी सर्वांना दिसत नाहीं. मी जन्म रहित व अविनाशी आहे, हें अज्ञानी लोक जाणत नाहींत.

**(४) अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ।** १७/२ अ

हें सर्व ज्यानें विस्तारलें आहे, ते अविनाशी आहे, हें लक्षांत ठेव. या अव्यय तत्वाचा नाश कोणीही करूं शकत नाहीं.

**(५) न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यःशाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥**

२०/२अ

हा आत्मा, कधीं जन्मत नाहीं; कीं मरत नाहीं; हा एकदा होऊन, पुनः होणार नाहीं, असाही नाहीं; हा अज, नित्य, शाश्वत व पुरातन आहे; शरीराच्या वधाबरोबर याचा वध होत नाहीं.

या प्रमाणें परमेश्वराचें निर्गुण स्वरूप, देहधारी सगुण, श्रीकृष्णांचें ठिकाणीं जर दिसून येतें तर इतर सगुण मानवी देहांतही तेच निर्गुणत्व दिसून आलें पाहिजे, व मानवाला श्रीकृष्णांप्रमाणें परमेश्वराच्या या निर्गुणत्वाचा अनुभव स्वतःच्या ठिकाणींही घेतां आला पाहिजें असें ओघानेंच पुढें म्हणतां येतें असा अनुभव प्रत्येकाला घेतां येतो, असें श्रीकृष्णाचें वचन आहे, व गीता मंदिराची उभारणी याच तत्वसिद्धांतावर झालेली आहे.

परमेश्वर एकच आहें. व त्यानें एकटयानेंच हे सर्व विश्वनिर्माण केलें आहे. स्वप्नांतील प्रतिसृष्टीप्रमाणें, परमेश्वर आपल्या निर्गुणत्वांतून सगुणत्व निर्माण करतो, व त्यातही सजीव निर्जिव आपणच बनून आपणच आपल्या सुखदुःखांचा अनुभव घेंत असतो. स्वप्न हा एकटयाच्याच संकल्पाचा खेळ असल्यामुळें स्वप्नांत भ्यालेल्या माणसाला जागें करून त्या काल्पनिक भीती पासून मुक्त करतां येतें. त्याच प्रमाणें एकटयाच्याच संकल्पानें सगुण मनुष्य व विश्व बनलेल्या परमेश्वराला निर्गुणत्वांत विलीन होऊन पूर्णत्व प्राप्त करून घेतां येतें. कांहीं वेळां स्वप्नांत असूनही, आपल्याला हें स्वप्न पडलें आहे अशी अर्धवट जाणीव माणसाला असते म्हणजे अर्धवट जागृति व अर्धवट स्वप्न- अशी स्थिति असते. याचा अर्थ एकाच वेळीं या दोनी स्थिती असतात असा नव्हे; तर वेगातिशयामुळें, जागृतींतून स्वप्नांत व स्वप्नांतून जागृतींत जी ये जा चालू असते ती एकाच वेळीं आपण अनुभवीत आहोंत असा मनुष्याला भास होत असतो; त्याच प्रमाणें निर्गुणत्वांत व सगुणत्वांत मनुष्याला राहतां येतें. लाकडाचा हत्ती बघितल्यावर, त्या वस्तूकडे लाकूड म्हणून ही पाहतां येतें व हत्ती म्हणूनही पाहतां येतें, परंतु हत्ती म्हणून पहातांना लाकूड या कल्पनेचा पूर्णलय झालेला असतो, व लाकूड म्हणून पाहतांना, हत्ती या कल्पनेचा पूर्ण लय झालेला असतो.

एकाचवेळीं हत्ती अगर लाकुड या पैकीं एकच कल्पनेचें अस्तित्व असते व दुसरी कल्पना तात्पुरती लय पावलेली असते. आयुष्यांत अनुभविलेल्या गोष्टी, जशा मनाच्या पेटींत ठेऊन, मनुष्य गरजेप्रमाणें त्यांचा वेळेला उपयोग करूं शकतो, व येरवी त्या सुप्त स्थितींत राहूं शकतात, त्याच प्रमाणें मनुष्य पूर्ण आत्मानुभवी झाला म्हणजे तो कारणापुरतां सगुणत्वांत किंवा संकल्पीत्वांत येतो व तें कार्य झाल्यावर पुनः पूर्णत्वांत किंवा निर्गुणत्वांत जाऊं शकतो. सांगण्याचा मुद्दा येवढाच कीं एकटा परमेश्वरच निर्गुण व सगुण स्थितींत वास करून राहिलेला आहे व म्हणून अज्ञानी मनुष्याला ज्ञानी बनून मानवी सगुणता व आत्मिक निर्गुणता याचा अनुभव घेण्याची पूर्ण शक्यता आहे. मायोद्भवाचे वर्णणांत श्रीकृष्ण म्हणतात; —

**(६) द्वाविमौ पुरूषौ लोंके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षर : सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यतें ॥ १६।१५अ**

जगांत क्षर व अक्षर असे दोन पुरूष आहेत; क्षर म्हणजे सर्व नाशवंत भूतमात्र ( आत्म्याचें सगुण बुद्धीत्व ) व या सर्वांच्या मुळाशीं असणारें अव्यक्त तत्व ( आत्म्याचें निर्गुण बुद्धितत्व ) तो अक्षर पुरूष.

**(७) उत्तमः पुरूषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य विभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७।१५अ**

या दोनीहून भिन्न असा जो उत्तम पुरूष त्याला परमात्मा असें म्हणतात. तोच अविनाशी ईश्वर त्रैलोक्य व्यापून त्याचें धारण पोषण करतो.

**(८) अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोभ्द्वकरो विसर्गः कर्मं संज्ञितः ॥ ३ । ८ अ**

अक्षर म्हणजे अविनाशी परमतत्व तें ब्रह्म; प्रत्येक वस्तुचा मुळ भाव, स्वभाव त्यास अध्यात्म म्हणतात, चराचराची उत्पत्ति करणारा विसर्ग म्हणजे कर्म होय.

(९) आधिभूतं क्षरो भावः पुरूषश्चाधि दैवतम् ।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतांबर ॥ ४ । ८ अ

नाम रूपात्मक नाशवंत स्थिति तें अधिभूत; यास जो सचेतन अधिष्ठाता तो अधिदैवत ; सर्व यज्ञांचा अधिपति तो अधियज्ञ तो मीच हे देहश्रेष्ठा, या देहांत आहे.

(१०) मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम ।
हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० । ९ अ

मी अध्यक्ष होऊन प्रकृतीकडून सर्व चराचर सृष्टि उत्पन्न करतो ; हे कौंतेया, या कारणामुळें जगाची घडामोड चालू आहे.

(११) प्रकृतिं पुरूषं चैव विध्दयनादि उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृति संभवान् ॥ १९।१३ अ

प्रकृति व पुरूष हीं दोनीही अनादि, असें समज,. विकार व गुण हें प्रकृतिपासून उद्‌भवतात असें जाण.

(१२) कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृति रूच्यते ।
पुरूषः सुखदुखा:नां भोक्तृत्वे हेतुरूच्यते ॥ २०।१३ अ

कार्य म्हणजे देह, करण म्हणजे इंद्रिये, याच्या कर्तृत्वास प्रकृति कारण आहे,. आणि सुख दुःखांचा उपभोग घेण्यास पुरुष कारण आहे, असें म्हणतात.

## प्रकृति वर्णन.

(१३) भूमिरापो ऽनलो वायुः स्वं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४/७

( सगुण बुद्धितत्वानें उत्पन्न केलेली ) पृथ्वी, पाणी, वायु, आकाश, मन, बुद्धि, व अहंकार अशीं आठ प्रकारची ही माझी प्रकृति आहे.

(१४) अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे परां ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५/७ अ.

ही खालच्या प्रतीची प्रकृति, हे महाबाहो, या शिवाय, जगाचें धारण करणारी श्रेष्ठ तिची जीव स्वरूपी माझी दुसरी प्रकृति आहे, असें जाण ( हेंच निर्गुणबुद्धि तत्व )

(१५) नहिकश्चीत्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यतेह्यवशःकर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५/३ अ.

कोणीही कर्मकेल्यावांचून, केव्हांही क्षणभर सुद्धां रहात नाहीं; प्रकृतिचे गुणांमुळें, परतंत्र होऊन प्रत्येक माणूस प्रकृति धर्मानें कर्म करीतच असतो.

(१६) प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९/१३अ.

केवळ प्रकृतिकडूनच सर्व प्रकारें कर्में केलीं जातात, आत्मा हा अकर्ता असतो, हें ज्यानें जाणलें तोच ज्ञानी ! या प्रमाणें, निर्गुण परमेश्वरच सगुण बनलेला आहे. परंतु चैतन्य आत्म्याचा निर्गुण बुद्धितत्वांत व सगुण बुद्धितत्वांत साक्षित्वापलीकडे कांहीं संबंध नाहीं, हा सिद्धांत वरील श्लोकांतून स्पष्टपणें दिसून येतो. आत्मा अकर्ता असून प्रकृति कर्म करित असते. हा विषय देहधारी व्यक्तीच्या ठिकाणीं ही असाच लागू पडतो, हें पुढील श्लोकांवरून दिसून येईल:-

## देह वर्णन

(१७) ईदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयतें ।
एतद्यो वेत्ती तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १/१३ अ

हें कौंतेया या शरीराला क्षेत्र असें म्हणतात. ज्ञानी लोक, हें शरीर जो जाणतो, त्याला क्षेत्रज्ञ असें म्हणतात.

(१८) महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेवच ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रिय गोचराः ॥ ५ / १३ अ

स्थूल पंच महाभूतें, अहंकार, बुद्धि, आणि अव्यक्त ( प्रकृति ) तसेंच दहा इंद्रियें, एक मन आणि पांच इंद्रियांचें पांच विषय ( शब्द स्पर्श, रूप, रस, गंध).

(१९) इच्छाद्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासन सविकार मुदाहृतम् ॥ ६/१३ अ

इच्छा द्वेष, सुखदुःख, संधान, चेतना, धैर्य, या सात व वरील चोवीस या एकतीस तत्वांच्या समुदायाला विकारवंत क्षेत्र, असें म्हटलें जातें.

(२०) क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्व क्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतंमम ॥ २/१३ अ

हें भरता, सर्व क्षेत्रामध्यें, क्षेत्रज्ञ सुद्धां मीच, असे समज; क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच माझे, ( परमेश्वराचें ) ज्ञान असे समजलें जातें.

(२१) उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरूषः परः ॥ ४२/१३अ

( प्रकृतिच्या गुणांचा ) उपद्रष्टा – जवळ राहून पहाणारा अनुमोदन देणारा, भर्ता – भर घालणारा – व भोक्ता – उपभोग घेणारा – यांसच या देहातील पर पुरूष, महेश्वर परमात्मा असें म्हणतात, ( मानवी निर्गुण बुद्धितत्वांतही चेतना आत्मा आपल्या निर्गुणत्वाचा साक्षीच असतो.

**(२२) अनादित्वान्निर्गुणत्वा परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१/१३ अ**

अनादि व निर्गुण असल्यामुळें हा अव्यय परमतत्व हे कौंतेया शरीरांत असूनही कांहीं करत नाहीं व कर्मबंधापासून अलिप्त राहतो.

**(२३) सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृति संभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५/१४ अ.**

हे महाभाहो, प्रकृतिपासून उत्पन्न झालेलें सत्व, रज व तम, हे गुण, देहांत राहाणाऱ्या अव्ययास, निर्विकार आत्म्यास, बांधून टाकतात.

**(२४) सत्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।**
**ज्ञानमावृत्त तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९/१४ अ**

सत्वगुण सुखाची, व रजोगुण कर्माची आसक्ति निर्माण करतो; परंतु हे भारता, तमोगुण ज्ञानाला झांकून; प्रमाद म्हणजे कर्तव्याचा विसर उत्पन्न करतो.

**(२५) त्रिभिर्गुणमवैभिरेभिःसर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३/७अ**

तीन गुणात्मक पदार्थांनीं मोहित होऊन हें सर्व जग, यांच्या पलीकडील जो मी, ( निर्गुण ) अव्यय त्या मला जाणत नाहींत.

(२६) नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानु पश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९/१४ अ

गुणां खेरीज दुसरा कोणी कर्ता नाहीं, असें जेव्हां द्रष्टा जाणतो, व तीन गुणांच्या पलीकडचें तत्व ओळखतो, तेव्हां तो माझे स्वरूपाला पोचतो.

पाण्यपासून तयार झालेला बर्फाचा खडा, पाण्यांतच वेगळया गुणधर्मानें व रूपानें तरंगत राहतो. त्याचप्रमाणें निर्गुण परमेश्वरापासून उत्पन्न झालेली सगुण प्रकृती भिन्न गुणधर्मांनीं व आकारानीं निर्गुणांतच समाविष्ट होऊन राहिलेली आहे. व त्यामुळेंच आत्म्याला संकोचित्व प्राप्त झाले आहें या संकोचित्वांतून सुटण्याची धडपड करणारे, जगांत चार तऱ्हेचें लोक सांपडतात आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी. निरनिराळया देवतांना भजून कामनिक लोक आपल्या वासना पूर्ण करून घेतात. परंतु सर्व देवता परमेश्वरापासून च निर्गुण बुद्धितत्त्वानें उत्पन्न झालेल्या आहेत. हें न समजल्यामुळें पूर्ण आत्मोन्नति न होतां ते मध्येंच घोटाळांत पडतात. फक्त ज्ञानी पुरुषच परमेश्वराशीं एकरूप होऊन, भक्त या नांवाला योग्य ठरतो श्रीकृष्ण म्हणतात:-

## परमेश्वराकडे वळणारे लोक.

(२७) चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६/७ अ

हें भारत श्रेष्ट अर्जुना, चार प्रकारचे पुण्यवान लोक माझी भक्ति करतात, आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी.

**(२८) तेषां ज्ञानी नित्ययुक्त एक भक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियोहि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७/७अ**

यां पैकीं नित्ययुक्त–माझें सतत स्मरण ठेवणारा–व एक भक्ति अनन्य भक्ति असणारा – असा जो ज्ञानी त्याची योग्यता विशेष होय ! ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय व मला ज्ञानी प्रिय असतो.

**(२९) कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या:नियता: स्वया ॥२०/७अ**

आपापल्या प्रकृति नियमा प्रमाणें, ज्या त्या कामतेनें मूढ झालेले लोक तो तो नियम पाळून अन्य देवतांच्या भजनी लागतात.

**(३०) कांक्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२/४अ**

कर्म फलाच्या प्राप्तीची इच्छा करणारे लोक, मनुष्य लोकांत कर्मफल लवकर प्राप्त होतें म्हणून इहलोकीं, देवतांची पूजा करीत असतात.

**(३१) यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्यतस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१/७ अ**

जो भक्त ज्या रूपाची श्रद्धेनें उपासना करूं इच्छितो, त्याची त्या देवतेवरील अचल श्रद्धाही मीच स्थिर करतो.

**(३२) स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभतेच ततः कामान्मयैव विहितान् हितान् ॥२२/७ अ**

ती श्रद्धा ठेऊन तो त्या देवतेची आराधना करतो; मग त्या पासून मीच निर्मिलेलीं तीं कामफळें त्याला मिळतात.

(३३) **येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधि पूर्वकम् ॥** २३/९ अ

श्रद्धायुक्त होऊन, जे दुसऱ्या देवतांचे भक्त बनून यजन करतात ते हि, कौंतेया, विधि पूर्वक नसलें तरीं माझेंच यजन करतात.

(३४) **अहं हि सर्व यज्ञानां भोक्ता च प्रभुरेवच ।**
**न तु मामभिजानन्ति तत्वेनातश्च्यवन्ति ते ॥** २४/९ अ

कारण, सर्व यज्ञांचा भोक्ता व स्वामी मीच आहे. परंतु माझे तत्वशुद्ध ज्ञान त्यांना नसल्यांमुळें, ते फसतात.

(३५) **उदाराः सर्व एवैते ज्ञानीत्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥**
१८/७ अ

हे सर्व भक्त चांगलेच आहेत, पण त्यांत ज्ञानीभक्त म्हणजे मीच असें मला वाटतें; कारण, आत्मप्राप्ति होऊन सर्वोत्तम गतींत माझ्यांतच तो स्वस्थ असतो.

ज्या वस्तूचें ज्ञान करून घ्यावयाचें त्या ज्ञेयाचे ( निर्गुण बुद्धीतत्वाचें ) वर्णन करतांनांही पुनः अप्रत्यक्षपणें परमेश्वराचें वर्णन केलें आहे, व परमेश्वर, श्रीकृष्ण, व ज्ञेय एकच आहेत असें दाखवून दिलें आहे.

## ज्ञेय वस्तु-निर्गुण बुद्धितत्व.

(३६) **ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥** १२/१३ अ

जे जाणल्यानें ( अमृत ) म्हणजे मोक्ष मिळतो तें ज्ञेय सांगतो अनादि, सर्व श्रेष्ट ( असे तें ) ब्रम्ह होय, त्याला सत् वा असत् कांहींच म्हणतां येत नाहीं.

(३७) अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च यज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६/१३ अ

अविभक्त, म्हणजे एक असून, सर्व भूतांत विभागून राहिलेलें, भूतांना धारण करणारें, ग्रासणारें, व उत्पन्न करणारेंही तेंच समजलें पाहिजे.

(३८) बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥१५/१३अ

तें सर्व भूतांच्या आंत व बाहेर, अचर व चर, सूक्ष्म असल्यामुळें अविज्ञेय व दूर असून हि जवळ असें आहे.

(३९) सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३/१३ अ

त्याला सर्वत्र हातपाय, सर्वत्र डोळे, डोकीं व तोंडे, व सर्वत्र कान असून ते सर्व विश्व व्यापून राहिले आहे,

(४०) सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रिय विवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४/१३ अ

त्यांत सर्व इंद्रियाच्या गुणांचा आभास होत असून तें सर्व इंद्रियाविरहित आहे. असक्त असून सर्वाचें धारण करणारें आहे. व निर्गुण असून हा गुणांचा उपभोग घेणारें आहे,

(४१) ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्यधिष्ठितम् ॥१७/१३ अ

त्याकाय तेजाचेंही तेज, व अंधारा पलीकडचें म्हणतात; ज्ञान, ज्ञेय–जें जाणावयाचे तें व ज्ञानगम्य–ज्ञानानेंच कळणारें असें, असून सर्वांच्या हृदयांत तेंच अधिष्ठित असतें. अशा तऱ्हेचें ज्ञेयाचे म्हणजें निर्गुण बुद्धि तत्वाचें वर्णन करून यालाच परब्रम्ह म्हणतात, असें सांगून, परं ब्रम्हाची व परमेश्वराची एक वाक्यता दाखविली आहे.

(४२) यदाभूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ॥
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३०/१३अ

जेव्हां सर्व भूतांतील नानात्व – भिन्नत्व – एकत्वानें दिसेल व एकत्वापासून सर्व विस्तार – अनेकत्व आहे, असें समजून येईल तेव्हां ब्रम्ह प्राप्त होतें.

(४३) ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्म समाधिना ॥ २४/४ अ

हवन करण्याची क्रिया, हवन करण्याचें द्रव्य, व अग्नि. हीं सर्व ब्रम्ह असून ब्रम्हानेंच ब्रम्हांत ब्रम्हाचें हवन केलें; सर्वकर्म ब्रम्हरूप अशा समबुद्धीनेंच ब्रम्हांतच जावयाचें.

(४४) ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यःप्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३/८अ

ॐ या एकाक्षर ब्रम्हाचा लय करीत, माझें स्मरण करीत जो देह सोडून जातो तो परम गतीला पोंचतो या ॐ कार ब्रम्हालांच अश्वत्थ वृक्ष म्हणून ब्रह्मांचेंच वर्णन पुढें श्रीकृष्णांनीं चालू ठेंवलें आहे. श्रीगुरुचरित्रांत थोडक्यांत त्याचें पुढील प्रमाणें सुन्दर वर्णन केलें आहे. तें प्रथम देऊन नंतर गीतेंतील वर्णन दिलें म्हणजे भावार्थ नीट लक्षांत येईल.

अकार शब्द मुळस्थान । स्कंध शाखा उकार जाण ।
फळपुष्प मकार पर्ण । अश्वत्थ ऐसा ओंकाररूपी ॥
ब्रह्मा सांगे आम्हांसी । अश्वत्थ मुळीं आपणासी ।
मध्यें वास हृषीकेशी । अग्रीं रूद्र वसतसे ॥
कल्पवृक्ष याचि कारण । ब्रह्मा म्हणे नारदासी ।
अश्वत्थ नाम नारायण । आमुचा वास तेथें असे ॥

अशा तऱ्हेनें सद्‌गुरूचा वास अश्वत्थ वृक्षांत म्हणजे ब्रह्मांत असतो व तेंच श्रीकृष्णांनीहीं सांगून ठेवलें आहे. व आत्म्याच्या संकोचीत अपूर्णत्वांत म्हणजे आत्म्याच्या मूळ सगुणबुद्धीतत्वांत, यांचे बीज असल्यामुळें या अश्वत्थाला कल्पवृक्ष असें यथार्थ नांव वरील वर्णनांत दिलेलें आहें असो.

(४५) ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १/१५ अ

वर मूळ व खालीं शाखा, कधींही नाश न होणारा, अव्यय, व छंदासि म्हणजे वेद हीं ज्याचीं पानें, असा वर्णिलेला, अश्वत्थ वृक्ष ज्यानें जाणला तो वेदवेत्ता होय.

(४६) अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धाविषयप्रवालाः।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीति मनुष्यलोके ॥
२/१५ अ.

त्रिगुणांनीं पोसलेल्या, व विषयांचें अंकुर फुटलेल्या त्याच्या शाखा खालीं व वर पसरलेल्या आहेत; आणि कर्मरूप होणाऱ्या त्याच्या मुळया खालींही मनुष्य लोकांत वाढत वाढत लांब गेल्या आहेंत.

**(४७) न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तोन चादिर्नच संप्रतिष्ठा ।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेनछित्वा ॥**

९/१५ अ

परंतु वर प्रमाणें, इह लोकीं, यांचें स्वरूप उपलब्ध होत नाहीं; किंवा अंत, आदि व आधारस्थानही मिळत नाहीं. खोल मुळांचा हा अश्वत्थवृक्ष असंगरूप शास्त्रानें तोडून,-

**(४८) ततःपदंतत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिःप्रसृता पुराणी ॥**

४/१५ अ,

नंतर, पुरातन प्रवृत्ति ज्या पासून निघाली त्याच आद्य पुरूषाकडे मी जातों, ( अशा संकल्पानें ) जेथें पोंचल्यावर माघारे येत नाहींत, तें स्थान शोधून काढावे.

**(४९) निर्मान मोहा जितसंगदोषा अध्यात्म नित्याविनिवृत्तकामाः।**
**द्वंन्द्वैर्विमुक्ताः सुख दुःख सज्ञैर्गच्छान्त्यंमूढाः पदमव्ययंतत्ः ॥**

५/१५ अ

मान मोह रहित, संग दोष जिंकलेले, अध्यात्मांत मग्न, निष्काम आणि सुखदुःख संज्ञक बंधापासून मुक्त, असें ज्ञाते पुरूष या अव्यय पदाला पोंचतात.

**(५०) यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतन्तोप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११/१५ अ**

प्रयत्नवान योगी, याला आत्मसात् करून आपलें ठिकाणीं स्थित असलेल्या आत्म्यामध्यें पाहतातः परंतु जे त्याला आत्मसात् करींत नाहींत तें अज्ञ लोक प्रयत्न करूनही याला ओळखूं शकत नाहींत. आतांपर्यंत श्रीकृष्णांनीं, आत्मा, परमेश्वर, क्षरपुरुष, अक्षर पुरुष, क्षेत्र

व क्षेत्रज्ञ, निरनिराळचा देवता, ज्ञेय वस्तु ब्रम्ह, ॐकाररूपी सगुण व निर्गुण ब्रम्ह म्हणजें अश्वत्थ वृक्ष व योगी पुरूष म्हणजें स्वतः आपण, यांची एक वाक्यता दाखविली. व ज्ञानीपुरूष याच परम गतीला जातात, असें आश्वासन दिलें. यानंतर सतत नामस्मरणानें या गतीला कसे जातां येतें हें आतां पुढें सांगितलें आहे.

## आत्मप्राप्तीचा अभ्यास.

**(५१) उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५/६ अ**

आत्म्याच्या साहृचार्यैच जीवात्म्याचा उद्धार करावा; आपण आपला नाश करून घेऊं नये आत्माच आपला बंधु असतो; आत्माच स्वतःचा शत्रुही होतो.

**(५२) योगी युंजीत सततमात्मानं रहसिस्थितः ।**
**एकाकी यत चित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १०/६ अ**

योग्यानें एकांतांत एकटें राहून, चित्त व आत्मा आवरून, काम्यवासना सोडून, पाश न ठेवतां, सतत योगाचा – परमेश्वराशीं भेटण्याचा – अभ्यास करावा.

**(५३) शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैला जिनकुशोत्तरम् ॥ ११/६अ**

दर्भावर हरणाचें कातडें घालून त्यावर वस्त्र घातलेलें, फार ऊंच किंवा सखल नाहीं, असें आपलें आसन शुद्ध जागीं स्थिर मांडून,

(५४) तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियाः ।
उपविश्यासने युंजाद्योगमात्मविशुद्धये ॥ १२/६ अ

तेथें त्रिच व इंद्रियें, यांचे व्यापार आवरून धरून, मन एकाग्र करून आत्मशुद्धीकरतां आसनावर बसून, योगाचा अभ्यास करावा.

(५५) समंकायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३/६ अ

पाठ, डोके व मान सरळ ठेऊन – ताठ बसून – स्थिर होऊन सभोंवार न बघतां, आपल्या नाकाच्या शेंड्यावर नजर ठेऊन, –

(५६) स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौकृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७/५ अ

बाह्य पदार्थांशीं संयोग बाहेरच्या बाहेर ठेऊन, दृष्टी दोन भुवयांच्या मध्यें ठेऊन व श्वास उच्छवास सम करून ( कोणी नासिकाग्र दृष्ठी ठेवतात व कोणी भुवयां मध्यें–भ्रूमध्यावर–ठेंवतात; व ज्याला जी सोयीची वाटेल ती पत्करावी. )

(५७) संकल्प प्रभवान्कामांस्त्यक्त्वासर्वानशेषतः ।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४/६ अ.

संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या वासनांचा निःशेष त्याग करून व मनानेंच सर्व इंद्रियांचें चोहोंकडून नियमन करून.

**(५८) प्रशांतात्मा विगतभीर्ब्रम्हचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४/६ अ**

भीति सोडून, शांत अंतःकरणानें, ब्रम्हस्थितींत, मनसंयम करून चित्त माझें ठिकाणीं ठेऊन, आत्म्यांत स्थिर व्हावें,

**(५९) शनैः शनैरुपरमेद्बुद्धया धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनःकृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५/६अ**

धैर्य बुद्धीनें हळू हळू शांत होत जावें, मन आत्म्याचें ठिकाणीं स्थिर करुन कल्पना मनांत येऊं देऊं नयेत.

**(६०) यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६/६ अ**

अस्थिर, चंचल मन जिकडें जिकडें धांव घेईल तिकडून निरोध करून तें आत्म्याच्याच ताब्यांत आणावें.

**(६१) यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथोनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६०/२ अ**

हे कौंतेया हीं दांडगीं इंद्रियें प्रयत्नशील ज्ञान्याचें देखील मन बलात्कारानें भलतीकडे ओढून नेतात.

**(६२) इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनु विधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७/२ अ**

इंद्रिय प्रवृत्ती बरोबर जें मन इंद्रियांचें मागें जातें तें पाण्यांतील नावेला हेलकावणाऱ्या वाऱ्या प्रमाणें, पुरुषाची बुद्धी हरण करीत असते.

(६३) रागद्वेष वियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४/२ अ

परंतु, आपल्या आत्मवश झालेल्या, प्रीति व द्वेष यांतून सुटलेल्या इद्रियांनीं, विषयांत राहूनही, आत्मनिवृत्ती झालेंला माणूस प्रसन्न चित्त होतो.

(६४) प्रसादे सर्व दुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्न चेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५/२ अ

चित्त प्रसन्न असलें म्हणजे सर्व दुःखांचा नाश होतो; कारण, ज्याचें चित्त प्रसन्न, त्याची बुद्धि तात्काल स्थिर होते.

(६५) यदा विनियतं चित्तं आत्मन्येवावतिष्ठते ।
निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्तइत्युच्यतें तदा ॥ १८/६ अ

आंवरून धरलेंले मन जेव्हां आत्म्यांतच स्थिर होतें व कोणत्याही उपभोगाची इच्छा होत नाही तेव्हां तो युक्त झाला असें म्हणतात – त्यांला युक्त म्हणतात.

## आत्यंतिक सुख – आत्मिक सुख.

(६६) यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनाऽत्मानं पश्यन्नात्मनितुष्यति ॥ २०/६ अ

योगानुष्ठानानें निरोध होऊन चित्त ज्या ठीकाणीं रममाण होतें, आणि आत्म्याला पाहून आत्म्यातच संतुष्ट होऊन राहतें– ( मानवी निर्गुण बुद्धितत्व नामस्मरणानें नामांतील निर्गुण शक्तीचा अनुभव घेते. )

(६७) सुखमात्यतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्वतः ॥ २१।६ अ.

जेथें बुद्धिगम्य व इंद्रियरहित अशा अत्यंत सुखाचा लाभ होतो; व जेथें ( योगी ) स्थिरावला म्हणजे केव्हांही तत्वापासून – आत्म्यापासून – दूर होत नाहीं. ( मानवी सगुण बुद्धी निर्गूण बनते. )

(६८) यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥३७।१८ अ

जें आरंभीं विषासारखें पण परिणामीं अमृततुल्य, तें आत्मनिष्ठ बुद्धीच्या प्रसन्नतेपासून होणारें सुख, आत्मसुख, सात्विक ठरलें आहे.

(६९) यंलब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितोन दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२।३ अ

तसेंच, जं प्राप्त झालें असतां दुसरा कोणताही लाभ अधिकवाटत नाहीं, आणि जेथें स्थिरावल्यावर कितीही मोठें दुःख असलें तरी त्याला चाळवूं शकत नाहीं.

(७०) विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९।२ अ

निराहारी पुरुषाचे विषय सुटले तरी रस – गोडी – सुटत नाही पण परब्रम्हाचा अनुभव आल्यावर ती गोडीही नाहिंशी होते.

## आत्मप्राप्ति – स्थितप्राज्ञता – शांति.

(७१) आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामायंप्रविशंति सर्वे स शान्तिमाप्नोतिनकामकामी ॥
७० । २ अ

चोहोंकडून पाण्यानें भरत असतांही ज्याची मर्यादा चलत नाहीं. अशा समुद्रांत सर्व पाणि जसें शिरत असतें; तसें सर्व विषय ज्या पुरुषांत, त्यांची शांति न मोडता शिरतात, तोच खरी शांति मिळवतो; विषयाची इच्छा असणाऱ्यांला ती मिळत नाहीं.

(७२) विहाय कमान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।
निर्ममोनिरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१।२ अ

सर्व आसक्ति सोडून, जो पुरुष निस्पृह होऊन वावरतो, व ममत्व व अहंकार रहित असतो, त्यालाच शांति मिळते.

[७३] प्रजहातियदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५।२ अ

हे पार्था, मनांतील वासना जेव्हां सर्व सोडतो व आत्म सुखांतच संतुष्ट राहतो तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ, म्हणतात.

(७४) यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।
आत्मन्येवच संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७।३ अ

परंतु, जो मनुष्य केवळ आत्म्यांतच रत, आत्म्यातच तृप्त व आत्म्याचें ठिकाणीं संतुष्ट झाला, त्याला स्वतःचें असें कांहीं उरत नाहीं.

**(७५) असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९।१८ अ**

कोठेंही आसक्ति न राहतां, मन ताब्यांत ठेऊन निरिच्छ होऊन व संकल्पन्यास होऊन, श्रेष्ठ अशी नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते.

**(७६) सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५०।१८ अ**

अशी सिद्धी प्राप्त झाल्यावर, ज्ञानाची परमावधिची निष्ठा जें ब्रम्ह ते, कौंतेया, प्राप्त होतें. तें थोडक्यांत ऐक.

**(७७) ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ॥**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४।१८ अ**

ब्रम्हभूत झाला, म्हणजे प्रसन्न चित्त होऊन तो कशाची आकांक्षा धरत नाहीं; व कशाचा द्वेषही करत नाहीं; सर्वा भूतीं सम होऊन माझी परम भक्ति प्राप्त होते.

**(७८) सर्वभूतस्थमात्मानं सर्वं भूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योग युक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९।६ अ**

योगयुक्त आत्मा झाला - म्हणजे त्याची दृष्टि सर्वत्र सम होऊन सर्व भूतांचें ठायीं आपण व आपल्या ठिकाणीं सर्व भूतें त्याला दिसूं लागतात.

**(७९) यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३०।६अ.**

जो मला सर्व ठिकाणीं पाहतो, व माझ्या ठिकाणीं सर्वांला पाहतो, याला मी कधीं अंतरत नाहीं व तोहि मला कधीं अंतरत नाहीं.

**(८०) भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५/१८अ**

भक्तीनें मी केवढा व कोण आहे याचें त्याला तात्विक ज्ञान होतें; मग तात्विक ओळख झाल्यावर तो माझें ठायींच प्रवेश करतो.

**(८१) अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२/९ अ**

एक निष्ठ होऊन जे लोक माझें चिंतन करून मला भजतात, त्या नित्य योगयुक्त पुरूषांचा योगक्षेम मी चालवित असतो.

अशा तऱ्हेनें योग मार्गाचा म्हणजे नामस्मरणाचा अभ्यास कसा करावा, हा अभ्यास करतांना मनाला इंद्रिय वृत्तीचा कसा त्रास होतो, परंतु पुढें अभ्यासानें तोही त्रास कमी होत जाऊन, मन आत्मस्वरूपांत कसें रंगून जातें, वगैरे सर्व यथोचित वर्णन करून, अखेर देहबुद्धीची आत्मबुद्धि बनल्यावर प्राप्त होणाऱ्या स्थितप्रज्ञतेंचीहीं लक्षणें श्रीकृष्णांनीं मार्गदर्शना करतां साधकांना सांगून ठेवलेली आहेत. कारण अभ्यास करतां करतां निर्विकल्प स्थितीचा अनुभव येऊं लागतो. परंतु कांहीं काल निर्विकल्प स्थिति उत्पन्न झाली तरी ती कायम टिकूं शकत नाहीं. प्राचीन देहसंस्कारांचें जोरानें पुनः देह स्थितीवर

यावें लागतें. लाकडांत अग्नि असतो पण तें लाकूड दुसऱ्या विस्तवानें पेटवल्याखेरीज त्यांतील अग्नि बाहेर पडूं शकत नाहीं; व एकदां पेट घेतल्यावर त्यांतील संपूर्ण अग्नि बाहेर पडण्याला त्या लाकडाचा जळून संपूर्ण नाश व्हावा लागतो; सर्व लाकूड जळल्यावर लाकडाचा व त्या बरोबर अग्नीचाही पूर्ण नाश होतो; त्याच प्रमाणें आत्मबुद्धीच्या वाढी बरोबर देहबुद्धी कमी होऊन आखेर देह-पाता बरोबर संपूर्ण नाश पावतें. देहपाताबरोबर आत्मबुद्धीचा साक्षी नाहिसा झाल्यामुळें आत्मबुद्धी हें नांवहीं नाहिसें होतें; व ज्ञान अज्ञानासह निर्गुणांत मावळून जातें !

मिठाच्या बाहुलीनें आपलें मूळस्वरूप दाखविण्याचा हट्ट घेतल्यावर तिला रोज समुद्रस्नान करण्याचा मार्ग सुचवावा, त्या प्रमाणें हा नामस्मरणाचा मार्ग श्रीकृष्णांनीं व पुढें सर्व सत्पुरुषांनीं आत्मोन्नति करूं इच्छिणाऱ्या माणसाला दाखविलेला आहे. परमार्थांत शिरतांना आपण परमेश्वर प्राप्ति लवकर करून घ्यावी असें प्रत्येक साधकाला वाटत असतें, व त्याप्रमाणें रोज किती तास साधन, म्हणजे नामस्मरण, केलें म्हणजे लवकर पूर्ण प्राप्ति होईल, हा साधकाचा, अज्ञाना वस्थेतील नेहमींचा ठरावीक प्रश्न असतो. एकदां परमेश्वर प्राप्ति झाली म्हणजे आपण नामस्मरणाच्या कचाटयांतून मोकळे होऊं अशीही या प्रश्नाच्या बुडाशीं त्यांची अंधुक कल्पना असते परमेश्वर प्राप्तीची कालमर्यादा देहाच्या कालमर्यादे इतकीच असते, यांची त्या बिचाऱ्यांना कल्पना नसते; व शब्देपरेच निष्णात् — शब्दज्ञान व आत्मज्ञान या दोहींतही पारंगत असा मार्गदर्शक भेटला नाहीं, तर उतावीळपणें भलती कडेच वाहवत जाण्याचा संभव असतो, व त्यांतही साधक अत्यंत भावना प्रधान असेल तर आयुष्याचा खेळखंडोबा होऊन प्रपंचाची धूळधाण ही होऊन जाण्याची भीती असते. आत्मसाक्षात्कार होऊन पूर्णत्वाला पोंचल्यावर, ज्या तुकाराम महाराजांनीं " देव भक्तालागीं करोनेदी संसार । अंगें वारासार करोनि ठेवि " असा अभंग लिहून देवानीं कबीराचे घरीं शेलें विणले, देव सांवत्यामाळयाना खुर्पु लागले, वगैरे गोष्टींचे

गोडवे गाईलें, त्याच तुकारामांनां साधकावस्थेंत अत्यन्त कष्टकारक स्थितींत, "तुझी करूं सेवा । आणिकां मागों खावया ।। धिक् माझें जिणें" झाले पंढरीराया ।। असेंही सात्विक संतापाचें उद्गार काढावें लागले आहेत, हें विसरून चालणार नाहीं; ज्या दासबोधांत एकें ठिकाणीं, "प्रत्यक्ष देवचि ठायीं पडला । मग काय उणें तयाला ।" अशी देवाची महति वर्णन केली आहे, त्याच दासबोधांत दुसऱ्या ठिकाणीं, "प्रपंच सांडून परमार्थ केला, तरी अन्न मिळेना खायाला" अशीही भीति साधकाला घातलेली आहे. एकें ठिकाणीं, "अनन्याश्चीतयन्तो मां ये जना: पर्युपासते तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहं" अशी योगक्षेम वाहण्याची शपथ घेणारे श्रीकृष्णच दुसरीकडे "शरीर यात्रापिचते न प्रसिध्येत् अकर्मणा ।" "कर्म केले नाहींस तर जगांत जगणें हीं तुला कठीण होईल" असें स्वच्छ सांगून अर्जूनाच्या कर्मातला आपला आधार काढून घेऊन त्याला प्रारब्धकर्म भोगण्याला तयार करतात ! हें सर्व सांगण्याचा अट्टाहास येवढया करतां कीं, साधकानें, जरा आस्ते कदम.

ज्याच्या त्याच्या प्रयत्ना प्रमाणें व प्रारब्धा प्रमाणें कोणाला लवकर वा उशीरा अशी आत्मप्राप्ती होऊं शकते. पूर्ण चिरकाल आत्मस्थिति जरी देहपातापर्यंत होऊं शकत नाहीं, तरी त्या आत्मिक स्थितीचा, पूर्णत्वाचा व निर्गुणत्वाचा अनुभव देह असतांनांच घेतां येतो. व त्याचा थोडाजरी अभ्यास केला तरी संसारांत पुष्कळ उपयोग होतो, हें मागें सांगितलेंच आहे. पुष्कळ अभ्यासानेंही जरी लवकर व पूर्ण अनूभव घेतां येऊं लागला, तरी देहावर येऊन प्रकृतिस्वभावा प्रमाणें कर्म करावेंच लागतें; म्हणून फार उतावीळ न होतां व फार चिकित्सा न करतां तूं शरीरानें प्राप्त कर्म कर व सतत मनांत नामस्मरण चालूं ठेव, व ही क्रिया अंगवळणीं पडण्याला थोडातरी स्वस्थ बसून नामस्मरणाचा अभ्यास ठेंव, म्हणजे कालांतराने सर्व कांहीं प्राप्त होईल असा श्रीकृष्णांचा आखेरचा अभिप्राय आहे.

## योगस्थ कर्म.

(८२) नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४०/२ अ

यांत आरंभलेल्याचा नाश होत नाहीं; व तें चालू असतां त्यांत आड कांहीं येत नाहीं; याची थोडीशी सुखातही मोठया भयांतून संरक्षण करते.

(८३) योगस्थः कुरुकर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समोभूत्वा समत्वं योग उच्यते ॥
४८/२ अ.

हे धनंजया, आसक्ति सोडून, कर्म सिद्धि होवो वा निष्फळ होवो, दोनी सारखोच मानून, योगस्थ होऊन कर्मे करीत रहा. सिद्धि व असिद्धि या समतेला योग असें म्हणतात.

(८४) बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥
५०/२ अ

समबुद्धीनें युक्त झालेला, बऱ्या वाईट, दोनी कर्मांतून अलिप्त होतो, म्हणून योगमार्गाला लाग, योग म्हणजेच कर्मकुशलत्व कर्म करून अलिप्त राहणें.

(८५) कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुध्दिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥
१८/४ अ

कर्मांत अकर्म व अकर्मात कर्म जो जाणु शकतो, तो सर्व मनुष्यांत बुद्धिमान व योगी होऊन, सर्व कर्म कर्ताहि तोच.

(८६) पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिध्दये सर्वं कर्मणाम् ॥
१३/१८ अ.

हे महाबाहो, सर्व कर्मे घडून येण्यास सांख्यांच्या सिद्धांतांत सांगितलेलीं पांच कारणें मी सांगतों,. ऐक.

(८७) अधिष्ठानं तथा कर्ता करणंच पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ।
१४/१८ अ.

अधिष्ठान ( जागा ) तसाच कर्ता. निरनिराळीं साधन सामुग्री व इंद्रिय व्यापार आणि त्याबरोबरच पांचवें, दैव, होय.

(८८) कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफल हेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥
४७/२ अ.

कर्म करण्यापुरतांच तुझा अधिकार आहे, फळ तुझ्या हातांत नाहीं फलाची आशा ठेऊन कर्म करणारा होऊं नकोस; कर्मं न करण्याच्या संकल्पातही अडकूं नकोस.

(८९) सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥
३३।३ अ.

ज्ञानी पुरूषसुद्धां आपल्या प्रकृति स्वभावा प्रमाणें वागत असतो, सर्वंच भूतें प्रकृति स्वभावावर जातात तेथें हा ( कर्म करणार नाहीं ) हट्ट काय कामाचा ?

(९०) त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपिनैव किंचित्करोति सः ॥
२०।४ अ.

कर्मफलाची आसक्ति सोडून, सदा (आत्मा) तृप्त राहून त्रिगुंण स्थितींत. कर्मांत गढून गेला ( असा दिसला ) तरी तो कांहींच करत नाहीं (असें समज.)

(९१) योगयुक्तो विशुध्दात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।
सर्व भूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥
७/५ अ.

जो योगयुक्त झाला, आत्मबुद्धियुक्त झाला, मन व इंद्रियें ज्यानें ताब्यांत ठेवलीं, आपल्यांत सर्व भूतें असल्याचा आत्मानुभव ज्याला आला, तो कर्म करतानां अलिप्त असतो.

(९२) यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य, सिध्दि विंदति मानवः ॥
४६/१८ अ.

ज्याच्या पासून सर्व भूतांची प्रवृत्ति झाली, व ज्यानें हे सर्व जग विस्तारलें, त्याची आपल्या प्रकृति धर्मानें होणाऱ्या कर्मानीं पूजा करून ( प्रकृति कर्म हीच पूजा ) मनुष्याला सिध्दि प्राप्त होत असते.

(९३) सर्व कर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रय ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥
५६।१८ अ.

माझ्या आश्रयानें ( नामस्मरणानें ) सर्व कर्मं नेंहमीं करीत असतांही , माझ्या अनुग्रहानें , शाश्वत व अव्यय पद त्याला प्राप्त होतें.

(९४) सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥

३१।६ अ.

एकत्व बुद्धीनें – म्हणजे आत्मस्थित होऊन – सर्व भूतांत असणाऱ्या मला जो भजतो ( कर्मांत अकर्माला – आत्म्याला पाहतो ) तो योगी कर्मानें सर्व प्रकारें वावरत असतांही माझ्या मध्येंच वावरत असतो.

अशा तऱ्हेनें योगस्थ कर्माची रूपरेषा व त्याचें महत्व सांगतांना श्रीकृष्णांनीं स्वतःचेंच वर्णन केलेलें आहे व यालाच ज्ञान म्हणतात, असें सांगून " ज्ञानी पुरुष माझ्याच योग्यतेचा असतो " हें मागें सांगितलेलें विधान, या रीतीनें सिद्ध करून दाखविलें आहे, व पुढें त्याबरोबरच, ज्ञानालाच परमेश्वर म्हणतात, असें सांगून ज्ञान प्राप्ती खेरीज – परमेश्वर प्राप्ती खेरीज – माया मोह दूर होणें अशक्य आहे, हेंही स्पष्ट सांगितलें आहे. मायेंत असतांनाच, पूर्ण ज्ञानी होण्याची शक्यता यांत दिसून येतें, नाहींतर, श्रीकृष्णाप्रमाणें देहानें मर्यादित व आत्म्यानें व्यापक अशा स्थितीचा संभव नाहींसा झाला असता व नराचा नारायण, किंवा ज्ञानेश्वर, हा केवळ काल्पनिक कविसंकेत ठरला असता.

## ज्ञानप्राप्ति.

(९५) समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥

२७।१३ अ.

सर्व भूतांचें ठायीं सारखाच राहणारा, व भूतें नाश पावल्यावर नाश न होणारा, असा आत्मा – परमेश्वर, ज्यानें ओळखला त्यालाच ज्ञान झालें ( असें समजावें ).

(१६) न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योग संसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥
३८/४अ.

ज्ञाना सारखें पवित्र, या लोकीं खरोखर दुसरें कांहीं नाहीं; तें ज्ञान कालान्तरानें, योग मार्गीनें सिद्ध झालेला, आपल्या ठिकाणीं प्राप्त करून घेतो.

(१७) सर्व भूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥
२०/१८ अ.

निरनिराळ्या सर्व भूतांत, एकच अविभक्त व अव्यय तत्व आहे असें ज्या ज्ञानानें कळतें, तें सात्विक ज्ञान असें समज.

(१८) यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥
३५/४ अ.

जें ज्ञान प्राप्त झाल्यावर, हे पांडवा, पुन: तुला असा मोह होणार नाहीं; आणि ज्या ज्ञानानें यच्चयावत सर्व भूतें तुझ्या स्वत:चें ठिकाणीं व माझ्याहीं ठिकाणीं असलेली तुला दिसतील.

(१९) सर्वस्यचाहं हृदिसंनिविष्टो मत्त:स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥
१५।१५ अ.

तसेंच सर्वांच्याच हृदयांत मी अधिष्ठित असून, स्मृति, ज्ञान व अज्ञान नाश, मजपासूनच होतात. सर्व वेदाचे जें ज्ञेय तेंहि मीच; वेद करणारा व वेद जाणणाराही मीच.

आतांपर्यंत परमार्थाचें तात्विक विवेचन झालें. अर्जुनाच्या बुद्धीला तें समजलें व पटलेंही; त्याबरोबरच, श्रीकृष्णांच्या या स्थित-प्रज्ञतेचें प्रात्यक्षित, – म्हणजे श्रीकृष्णांचा अनुभव आपल्याला थोडा फार पहावयास मिळाला तर आपण त्या अभ्यासास सुरवात केल्यावर पडताळयाकरतां गुरुप्रचिति म्हणून उपयोगी पडेल, असें वाटून अर्जूनानें श्रीकृष्णांना आपले विश्वरूप दाखविण्याची विनंती केली. " अस्थिच्या देही आसांचा डोळा । म्हणणे मी पाहेन ब्रम्हीचा सोहळा । तो झाला नव्हे आंधळा केवळ मूर्ख ,, " या समर्थ वचना प्रमाणें जड दृष्टीला विश्वरूप दिसणें अशक्य होते; म्हणून श्रीकृष्णांनीं अर्जूनांला तात्पुरती दिव्य दृष्टी दिली व आपल्या ठिकाणीं विश्वरूप दर्शन दिलें; शिष्याचें समाधान करण्या करतां उन्मनी स्थितींत त्या सदगुरूंना असा अनुभव देतां येतो, हें, स्वामी विवेकानंदाना, श्रीरामकृष्ण परमहंस यांनीं दिलेल्या अनुभवावरून सर्वत्रांना पटूं शकेल. " महाराज, आपण देव पाहिला आहे काय ? असे विवेकानंदांनीं विचारल्या बरोबर " होय, मी पाहिला आहे आणि तुलाही मी तो दाखवतो " असें म्हणून श्रीराम कृष्णांनीं विवेकानंदाच्या डोक्यावर हात ठेवून त्यानीं समाधी लावली हे सर्वांना माहीतच आहें. असो, श्रीकृष्ण म्हणतातः–

**(१००) न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योग मैश्वरम् ॥**

८।११ अ.

परंतु, तुझ्या याच दृष्टिनें तूं मला पाहूं शकणार नाहींस, तला मी दिव्य दष्टी देतो, ( तिने तूं ) माझा हा ईश्वरी योग पहा.

(१०२) अनादिमध्यांतमनन्तवीर्यं मनन्त बाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामित्वांदीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्॥
१९।११ अ.

आदि, मध्य व अंत नसून, अनंत शक्तिमान्, अनंतबाहु चन्द्र सूर्य हे ज्याचे डोळे, पेटलेला अग्नि हें ज्याचें तोंड, असें तुम्हींच या सर्व विश्वाला आपल्या तेजाने तापवित आहांत, असें मला दिसत आहे.

(१०३) द्यावा पृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।
दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥
२०।११ अ.

आकाश व पृथ्वी यांतील सर्व अंतर व सर्व दिशा, तुम्हीं एकटयांनेंच व्यापल्या आहेत; तुमचें हें अद्भुत व उग्ररूप पाहून, हे महात्मन्, त्रैलोक्याची भीतीनें गाळण उडाली आहे.

(१०४) त्वमादिदेवः पुरूषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परंनिधानम्।
वेत्तासिवेद्यंच परंच धाम त्वया ततं विश्वमनंतरूपम् ॥
३८।११ अ

तुम्ही आदिदेव, पुरातन पुरूष; तुम्हीच जगाचे परम आधार; तुम्ही ज्ञाते व ज्ञेय; तुम्ही श्रेष्ठ धाम, तुम्हीच हे अनंतरूपा, सर्व विश्व विस्तारलें आहे.

(१०५) नमःपुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवियामित बिक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषिततोऽसि सर्वः।
४०।११ अ.

हे सर्वात्मका तुम्हांला, समोरून, पाठीमागून आणि सर्व बाजूंनीं नमस्कार असो. तुमचा पराक्रम अगणित व वीर्य अनंत असून तुम्ही सर्वांना व्यापून राहिलेले आहां व त्यामुळें सर्वरूप आहां !

येथें गीतेचा विषय संपला, श्रीकृष्णांचें आत्मसाक्षात्कार रहस्य अर्जूनाला सप्रयोग समजून आलें व त्या प्रमाणें अभ्यास करण्यास तो मोकळा झाला.

अशा रीतीनें गीतेमध्यें आत्मज्ञान हाच एक विषय आहे, व आत्मज्ञान म्हणजे काय व तें कसे प्राप्त करून घ्यावयाचें याचें विश्वरूप दर्शनांत प्रात्यक्षिक दाखवून पूर्ण विवरण केलेलें आहे. हाच गीतेचा अंत:प्रवाह आहे. हा अंत:प्रवाह सपूर्ण अठरा अध्यायांत कसा विस्तार पावलेला आहे हें आंता दाखविलें म्हणजें वरील विधानाची सत्यता पटून येईल. ही विषय वर्गवारी करतांनां सर्व श्लोकांचा अनुक्रम व अध्यायांचीं नांवेंही बदलावी लागणार आहेत. अभ्यासूंकरतां ही मांडणी सोईची होईल, व गीता पाठ करण्याच्या दृष्टीनेंही विषयांच्या एक सूत्रीपणा मुळें सुलभता निर्माण होईल, म्हणून हिला " सुबोध – गीता " असें नांव दिलें आहे. पहिला अध्याय व विश्वरूप दर्शनाचा अध्याय तसेंच ठेवले आहेत.



# सुबोध-गीता.

## अध्याय १ ला.

## अर्जुन-विषाद योग.

हा गीतेचा प्रास्ताविक अध्याय आहे. यांत एकच मुख्य प्रश्न उद्भवतो कीं, आतांपर्यंत बरोबर अशाच प्रकारचें युद्ध प्रसंग आले असतां त्यांत युद्ध करून विजयी होत गेलेला अर्जुन, या कुरूक्षेत्रांवर होणाऱ्या भारतीय युद्धाच्या प्रसंगींच येवढा कां कचरला ? गोकृण युद्ध-प्रसंगीं हेंच आप्तबांधव त्यांचे समोर उभें नव्हतें काय ? मग कुलक्षयादि दोषांचा वेदांत आजच अर्जुनाला कां आठवला ?

तर याचें एकच उत्तर आहे आणि ते "धर्मक्षेत्रे कुरूक्षेत्रे" यांतील धर्मक्षेत्र या एकाच शब्दांत श्री व्यासमहाराजांनीं सूचित करून ठेवलें आहे. या युद्ध प्रसंगाच्या पूर्वी कुरूक्षेत्र ही यज्ञभूमी म्हणून गाजलेली होती व इंद्रादिकांपासून तेथें एकवीस वेळेला अतिमहान यज्ञविधि झालेले होते, व पुण्यक्षेत्रांत त्याची गणना झालेली होती. अशा क्षेत्रांत येऊन वास्तविक आपल्यासारख्या महापुरुषांनीं राजसूयादिमोठमोठे यज्ञ करून पुण्यभूमीचा महिमा वाढविण्याचें सोडून उलट स्वबांधवादिकांचे हत्याकांड सुरू करावें, या विषयीं अर्जुनाला खंति उत्पन्न झाली तर त्यांत नवल काय ? अर्जुनाची क्षात्रवृत्ति मावळून सात्विक ब्राम्हवृत्ति उत्पन्न होण्याचें कारण "स्थल महिमा" हें आहे. देवालयांत गेल्यावर ज्या प्रमाणें क्षणभर कां होईना पण सात्विक भाव निर्माण होतो व मनुष्य शुद्धचित्त तात्पुरता बनतो, त्याच प्रमाणें अर्जूनाची स्थिति झाली. आणि त्यां बरोबरच विवेकाचाहा उदय झाला. या तऱ्हेनें ज्ञानबीज पेरण्याला अर्जुनाची भूमिका तयार झाली ; हाच ग्रंथारंभ होय !

# सुबोध भगवद्गीता.

धृतराष्ट्र उवाच ) अध्याय १ ला. (अर्जुन विषाद योग.

१ धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥

संजय उवाचः-

२ दृष्टवा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥

३ पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपद पुत्रेण तव शिष्येण धीमता ॥

४ अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमायुधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥

---

१ **धृतराष्ट्र म्हणाला:–** संजया, कुरुक्षेत्राच्या पुण्यभूमींत युद्धाला जमलेल्या माझ्या पुत्रांनीं व पांडवांनीं काय केलें ?

२ **संजय म्हणाला:–** त्यावेळीं व्यूह रचून तयार असलेलें पांडव सैन्य पाहून राजा दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ जाऊन म्हणाला

३ हे आचार्य, तुमचा बुद्धिमान शिष्य द्रुपदपुत्र यानें व्यूह रचलेली ही विस्तीर्ण पांडवसेना अवलोकन करा.

४ या पांडवसेनेंत भीमार्जुनासारखे शूर, महा धनुर्धर, युयुधान आणि विराट व महारथी द्रुपद,

५ धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुँगवः ॥

६ युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्वं एव महारथाः ॥

७ अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥

८ भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥

९ अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥

१० अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥

---

५ धृष्टकेतु, चेकितान, वीर्यवान् कल्किराजा, पुरूजित्, कुंतिभोज, नरश्रेष्ठ शैव्य,

६ अतिपराक्रमी युधामन्यु, वीर्यवान उत्तमौजा, सुभद्रापुत्र ( अभिमन्यु ) आणि द्रौपदीचे ( पांच ) पुत्र हे सर्वच महारथी आहेत.

७ हे द्विजश्रेष्टा, आतां आमच्यासैन्यांतील प्रमुख अधिकाऱ्यांचीं नांवे दिग्दर्शनार्थभी आपणांला सांगतो तीं ऐकून घ्या.

८ आपण स्वतः, भीष्म, कर्ण, जयशाली कृपाचार्य अश्वत्थामा, विकर्ण आणि सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा,

९ ह्या शिवाय माझ्याकरतां जिवावर उदार झालेले, नानाप्रकारच्या सस्त्रांनीं सज्ज व युद्धकुशल वीर असे आणखीही पुष्कळ योद्धे आहेत.

१० भीष्मांच्या छत्राखालीं असलेले असें आमचे सैन्य अफाट आहे पण भीमानें संभाळलेलें त्यांचे सैन्य हे येवढेसेंच आहे.

११ अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥

१२ तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ॥
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥

१३ ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥

१४ ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महतिस्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥

१५ पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥

१६ अनंत विजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥

---

११ तरी, तुम्हीं सर्वांनीं आपापल्या नेमून दिलेल्या ठिकाणीं व्युहच्या प्रवेशद्वारांत राहून भीष्माचें संरक्षण करावें.

१२ कुरूवृद्ध प्रतापी पितामह ( भिष्माचार्य ) यांनीं दुर्योधनाला हर्षोत्तेजित करण्यासाठीं मोठी सिंहगर्जना करून आपला शंख फुंकला.

१३ त्याबरोबर शंख, भेरी, पणव, आनक आणि गोमुख ह्या रणवाद्यांचा एकदम धूमधडाका सुरू झाला आणि त्या बरोबर प्रचंड नाद दुमदुमूं लागला.

१४ नंतर पांढरे शुभ्र घोडे जोडलेल्या मोठया रथांत बसलेले श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांनीं आपापलें दिव्य शंख फुंकलें,

१५ श्रीकृष्णाने पांचजन्य नांवाचा शंख, अजुनानें देवदत्त व अचाटकृत्यें करणाऱ्या भीमानें पौंड्र नांवाचा शंख फुंकला

१६ कुन्तीपुत्र धर्मराजानें "अनंत विजय," आणि नकुल व सहदेव यांनीं "सुघोष" व "मणिपुष्पक" नांवाचे.

१७ काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥
१८ द्रुपदो द्रौणदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्‌ पृथक्‌ ॥
१९ स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयेन् ॥
२० अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥
२१ हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।
अर्जुन उवाच-सेन योरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥
२२ याव देतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥

---

१७ तसेंच महा धनुर्धर काशिराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अजिक्य सात्यकी,

१८ द्रुपद, द्रौपदीचे पांच पुत्र, महाबाहु अभिमन्यु, ह्या सर्वांनीं हे राजा, चोहोंकडून आपापले शंख फुंकले,

१९ आकाश आणि पृथ्वी दणाणून सोडणाऱ्या त्या तुंबळ नादानें दुर्योधनादि कौरवांचीं हृदयें विदीर्ण झाली.

२० हे राजा, मग, कौरव व्यवस्थेनें उभें आहेत आणि शस्त्रवर्षाव होण्याची वेळ आली आहे, असें पाहून, ज्याच्या ध्वजावर मारुति आहे, असा अर्जुन आपले धनुष्य उचलून श्रीकृष्णांस म्हणाला:--

२१ हे अच्युता, दोन्ही सैन्यांच्या मधोमध माझा रथ उभा करा, म्हणजे,

२२ येथें युद्धाच्या इच्छेनें उभे रहिलेल्या वीरांना मी पाहून येतो; कारण या रणसंग्रामांत मी कोणावरोबर युद्ध करावें हे मला समजलें पाहिजें.

२३ योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥

संजय उवाचः—

२४ एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥

२५ भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥

२६ तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥

२७ श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥

२८ कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
अर्जुन उवाच—दृष्ट्वेमं स्वजनं कृष्णा युयुत्सुं समुपस्थितम् ॥

---

२३ युद्धांत दुर्बुद्धि दुर्योधनाचें प्रिय करण्याच्या हेतूनें लढणारें कोण येथें जमलेले आहेत त्यांना मी नीट पाहून ठेवतो,

**२४ – २५ संजय म्हणाला:—** हे धृतराष्ट्रा, अर्जुनानें श्रीकृष्णाला असें म्हटल्यावर त्यानें तो उत्तम रथ दोन्ही सेन्या मध्यें भीष्म द्रोणादिकांच्या व सर्व राजांच्या समोर उभा केला आणि सांगितलें कीं, हे पार्था, हे येथें जमलेले कौरव पहा.

२६ – २७ तेथें दोन्ही सैन्यामध्यें चुलते, आजे, गुरु, मामा, भाऊ, पुत्र, नातू, मित्र, सासरे, आप्तेष्ट , वगैरे उभे आहेत. असें अर्जूनाच्या दृष्टीस पडले. सर्व बांधव युद्धास सज्ज होऊन उभे असलेले पाहून.

२८ अर्जून अत्यंत करुणावस्थेत खिन्न होऊन बोलूं लागलां:-

**अर्जुन म्हणाला:—** हे कृष्णा, माझें स्वजन युद्धासाठीं जमलेले पाहून,

२९ सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥

३० गांडीवं स्रंसतें हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥

३१ निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥

३२ न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥

३३ येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवास्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥

३४ आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंन्धिनस्तथा ॥

---

२९ माझीं गात्रें गळून जात आहेत. तोंडाला कोरड पडतें आहे. शरीराला कंप सुटला आहे, अंगावर रोमांच उभे रहिले आहेत.

३० गांडीव धनुष्य हातांतून गळून पडतें आहे. अंगाचा दाह होत आहे, माझ्यानें उभें राहवत नाहीं. माझें मन भ्रमल्यासारखें झालें आहे.

३१ हे केशवा, मला विपरीत चिन्हें दिसत आहेत; शिवाय युद्धांत स्वजनांना मारून हित होईल असेंही मला वाटत नाहीं

३२ कृष्णा, मला विजय, राज्य व सुखें यांची इच्छा नाहीं; राज्य, भोग किंवा जीवीत, हें घेऊन काय करावयाचें आहे ?

३३ ज्यांच्यासाठीं राज्याची, भोगांची सुखांची इच्छा करावयाची, ते हे स्वजन प्राणांची व धनांची आशा सोडून युद्धाला उभे आहेत !

३४ गुरू, वडील, मुलगे, तसेंच आजे, मामे, सासरे, नातू, मेहुणें व त्याच प्रमाणें इतर ही अनेक आप्त येथें आहेत.

३५ एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्य राज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥
३६ निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥
३७ तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥
३८ यद्यप्येते न पश्यंति लोभोपहत चेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥
३९ कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवार्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥
४० कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्यत ॥

---

३५ हे मधुसुदना, हे जरी मला मारूं लागले, तरी मी त्रैलोक्याच्या राज्यासाठीं ही यांना मारूं इच्छित नाहीं, मग पृथ्वीची काय कथा ?

३६ हे जनार्दना, कौरवांना मारून आम्हांला काय सुख होणार ? या दुष्टांना मारल्यानें आम्हांला पापच लागेल.

३७ म्हणून आपले बांधव जे कौरव त्यांना आम्ही मारणें योग्य नव्हे. कारण, हे माधवा, स्वजनांचे प्राण घेऊन आपण सुखी कसें होणार ?

३८ लोभानें बुद्धि नष्ट झालेल्या ह्या लोकांना जरी कुलक्षयामुळें होणारा दोष व मित्र द्रोहाचें पातक दिसत नसलें, तरी

३९ कुल क्षयाचा दोष आम्ही स्पष्टपणें जाणत असतां, ह्या पापापासून निवृत्त होण्याचें आम्हांस कळुं नये काय ?

४० कुल क्षया बरोबर सनातन कुलधर्म नष्ट होतात; कुलधर्म नाहिसे झाले म्हणजे सर्व कुलावर अधर्माचा पगडा बसतो.

४१ अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥
४२ संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥
४३ दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥
४४ उत्सन्न कुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥
४५ अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥
४६ यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥

---

४१ अधर्म माजला म्हणजे, हे कृष्णा, कुलस्त्रिया बिघडतात; कुलस्त्रिया बिघडल्या कीं, वार्ष्णेया, वर्ण संकर होतो

४२ वर्णसंकराबरोबर कुळाचा घात करणांऱ्या सहित सर्व कुळ नरकाप्रत जातें, आणि पिंडतर्पणांतहि क्रिया लुप्त झाल्या मुळें त्यांचे पितरही पतन पावतांत.

४३ कुलघातकाच्या ह्या वर्णसंकरकारक दोषांनी सनातन ज्ञातिधर्म व कुलधर्म बुडून जातात.

४४ हे जनार्दना, ज्या मनुष्यांचे कुलधर्म नष्ट झाले त्यांना निश्चीत नरकवास प्राप्त होतो, असें आम्ही ऐकत आलों आहों.

४५ आम्ही राज्यसुख लोभानें स्वजनांना मारण्यास उठलों, हें एक महान पातक करण्यास तयार झालों हे केवढें आश्चर्य ?

४६ यापेक्षां मी निःशस्त्र राहून प्रतिकार न करतांहीं हे शस्त्रधारी कौरव मला रणांत ठार मारतील, तर त्यांत माझें अधिक कल्याण होईल.

**संजय उवाचः—**

४७ एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥

---

४७ संजय म्हणाला:—या प्रमाणें भाषण करून अर्जुन शोकानें विव्हळ मानस होऊन हातचें धनुष्य व बाण खालीं टाकून रथांत आपल्या जागीं स्तब्ध बसला.



# अध्याय २ रा.

## आत्म-सामर्थ्य योग.

या अध्यायांत आत्मज्ञानाची सुरवात झाली आहे. आत्मा ( अतति इति आत्मा - जो व्यापक आहें तो आत्मा - असा आत्म्याचा मूळ अर्थ आहें ) व्यापक, निर्गुण, निराकार. जन्ममरण रहित, वगैरे वर्णनाला यांत प्रारंभ झालेला आहे. तदनुषंगाने थोडा युक्ती वादही आलेला आहे. छात्रधर्माला अनुसरून पण जयापजयाची क्षिति न बाळगतां युद्धाला तयार हो, कारण पांच कारणें अनुकूल असली तरच कर्म सिद्धीला जाऊं शकतें, व कर्मसिद्धि कोणाच्या हातांत नसते, हें तत्व सांगून ठेवलें आहे. परमेश्वर म्हणजेच आत्मा, सर्वत्र भरलेला आहे. व त्यानींच सर्व निर्माण केलें असल्यामुळें, परमेश्वरानें मनुष्याला दिलेल्या प्रकृति धर्माप्रमाणें कर्तव्य करावें हे सांगून, हा प्रकृति धर्माचार शास्त्र विहित पद्धतीनें करणें, हीच परमेश्वराची महापूजा होऊन कार्यसिद्धि होत असतें. असा निर्णय घेतलेला आहे. शेवटीं, अशा तऱ्हेची स्वकर्म पूजा करून, आत्मार्पण होऊन, आत्मसाक्षात्कारी झालास तरच आत्म प्रसादानें तुला शांति लाभेल असें सागून अध्यां पुरा केला आहे.

या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, यांत ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा उल्लेख प्रकृति धर्मानुरूप आहे. गीता ही अखिल मानवतेकरतां आहे व मानवतेंमध्यें हे चार तऱ्हेचे प्रकृतिधर्म दिसून येतात. वर्णाश्रमपूर्वक ठरविलेल्या हिंदुंच्या चारी वर्णांपैकीं प्रत्येक वर्णांत या चारी प्रवृत्तीचे लोक आढळून येतात, म्हणून श्री एकनाथ महाराजांनींहीं भागवतांत यांचा उल्लेख करून ब्राम्हणांतहीं क्षत्रिय, वैश्य, शूद्र, वृत्तीचे लोक आहेत. असें सांगून प्रकृति धर्माचाच पुरस्कार केलेला आहे. आत्मज्ञानाचा प्रसार अखिल जगतावर व्हावा या हेतूनें ज्या योगेश्वर श्रीकृष्णांनीं गीतेंतील आत्मज्ञान प्रकट केलें त्या महात्म्यावर, जातीयता नष्ट करूं इच्छिणाऱ्या महाभागांनीं, जातीयतें संबंधीं बिनाकारण शितोडे उडवूं नयेत. श्रीकृष्ण हे प्रकति धर्माचे पुरस्कर्ते होत व प्रकृति धर्माप्रमाणें कर्म करीत असतानांच मनुष्याला आत्मोन्नति कशी करून घेतां येईल हें शिकवण्या करतांच सगळया गीतेंचा खटाटोप आहे.

# अध्याय २ रा.

## आत्म सामर्थ्य योग

संजय उवाच

१ तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥

श्रीभगवानुवाच

२ कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥
३ क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदय दौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥

अर्जुन उवाचः—

४ कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रति योत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥

---

**संजय उवाचः—** १ त्या प्रमाणें करुणाव्याप्त होऊन अश्रुनीं डोळे भरून आलेल्या व खिन्न होऊन बसलेल्या अर्जुनाला श्रीकृष्ण असें म्हणाले.

**श्रीभगवान म्हणालेः—** २ हे अर्जुना, आर्यांना न शोभणारा, स्वर्गप्राप्तीच्या आड येणारा आणि अपकीर्ति करणारा असा ह्या मोह या आणीबाणीच्या प्रसंगीं तुला कोठून उत्पन्न झाला बरें ?
३ पार्था, असा नामर्द होऊं नको, तुला हें शोभत नाहीं; शत्रूनां सताऊन सोडणाऱ्या अर्जुना, हें क्षुद्र मनोदौर्बल्य सोडून युद्धाला तयार हो.

**अर्जुन म्हणालाः—** हे मधुसूदना, परमपूज्य अशा भीष्मद्रोणावर उलटून युद्धांत बाण कसें धरूं ?

५ गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीहलोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान्रूधिरप्रदिग्धान् ॥
६ न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥
७ कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥
८ नहि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमूच्छोषणमिंद्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥
संजय उवाचः ९ एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविंद मुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥
१० तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥

---

५ ह्या महानुभाव गुरूंना मारण्या पेक्षां या जगांत भिक्षा मागून उदरनिर्वाह करणें जास्त श्रेयस्कर ठरेल ! कारण या अर्थलोभी गुरूजनांना मारल्यावर त्यांच्या रक्तानें मांखलेले उपभोगच मला भोगावे लागणार ?

६ आम्ही त्यांना जींकू का ते आम्हांला जिंकतील, व या दोंहोंपैकीं कोणती गोष्ट चांगली होईल हें हि आम्हाला कळत नाहीं. ज्यांना मारून जगण्याची इच्छा नाहीं, ते हे कौरव आमचे समोर उभे आहेत.

७ मनोदौर्बल्य दोषामुळें माझी स्वाभाविक ( क्षत्रिय ) वृत्ति नष्ट होऊन, माझ्या मनाला धर्माधर्माचा निर्णय होत नसल्यानें मी तुम्हांला विचारीत आहे, जें निश्चित श्रेयस्कर असेल ते मला सांगा; मी तुमचा शिष्य आहे; मला शरणांगताला उपदेश करा.

८ पृथ्वीचें निष्कंटक व संपन्न राज्य, किंवा देवांचेंहीं अधिपत्य, मिळालें, तरी माझ्या इंद्रियांना शोषून टाकणारा हा शोक कसा नाहींसा होईल तें मलां कळत नाहीं.

**संजय म्हणालाः—** ९ शत्रूस सताऊन सोडणाऱ्या अर्जुनानें या प्रमाणें श्रीकृष्णाला सांगितल्यावर " मी आतां लढणार नाहीं " असें म्हणून तो स्तब्ध राहिला.

१० तेव्हां हे धृतराष्ट्रा, दोनां सैन्याच्या मध्यभागीं खेद करीत बसलेल्या, अर्जूनाला श्रीकृष्ण किंचित हंसल्या सारखें करून ( मिष्किलपणें ) म्हणाले.

श्री भगवानुवाचः-

११ अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ॥
१२ नत्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥
१३ देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥
१४ वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानिगृह्णातिनरोपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यांनि संयातिनवानि देहि ॥
२२/२ अ.
१५ न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥
२०/२ अ.

---

**श्रीभगवान म्हणाले:--** ११ ज्यांचा शोक करूं नये त्यांचा शोक करतोस आणि वर पांडित्याच्या गोष्टी सांगतोस; खरे ज्ञानी मेल्या – जित्या जिवांचा शोक करीत नाहींत.

१२ मी, "तु" व हे राजे या पूर्वी नव्हतों असे नाहीं. असेहीं; तसेंच आपण यापुढें असणार नाहीं. असेंही नाहीं.

१३ या देहांत जीवात्म्याला ज्या प्रमाणें बालपण, तारूण्य व वार्धक्य प्राप्त होतें, त्याच प्रमाणें त्याला दुसरा देह प्राप्त होत असतो; म्हणून त्याबद्दल विचारी पुरूष मोह पावत नाहीं.

१४ ज्या प्रमाणें मनुष्य जीर्ण झालेलीं वस्त्रें टाकून नवीं वस्त्रें परिधान करतो, त्या प्रमाणें देही म्हणजे देह धारण करणारा आत्मा – जीवात्मा जुनीं शरीरें टाकून नवीं धारण करतो.

१५ हा जन्मत नाहीं किंवा मरतही नाहीं. हा जन्मला होता किंवा पुढे जन्मेल असेंही नाहीं. हा अज, नित्य, शाश्वत, व पुरातन असा आहे. शरीराचा नाश झाला तरी याचा नाश होत नाहीं.

१६ नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥
२३/२ अ.

१७ अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥
२४/२ अ.

१८ अव्यक्तोऽमचिन्त्योयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥
२५/२ अ.

१९ आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्यर्यवद्वदति तथैव चान्यः।
आश्चयंवच्चैनमन्यः श्रृणोति श्रृत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्॥
२९/२ अ.

२० अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चीत्कर्तुमर्हति ॥
१७/२ अ.

---

१६ याला ( आत्म्याला ) शस्त्रें तोडूं शकत नाहींत, अग्नि जाळूं शकत नाहीं, पाणी भिजवूं शकत नाहीं अगर वायु सुकवुं शकत नाहीं.

१७ न तुटणारा, न जळणारा, न भिजणारा, व न सुकणारा असा हा आत्मा नित्य, सर्वव्यापि, स्थिर, अचल व सनातन आहे.

१८ हा अव्यक्त ( इंद्रियांना अगोचर ) अचिंत्य ( मनाला अगोचर ) व अविकार्य आहे. असें ( ज्ञानी ) म्हणतात. म्हणून आत्मा अशा प्रकारचा आहे हें जाणल्यानंतर त्या विषयीं शोक करणें तुला उचित नाहीं.

१९ याला कोणी आश्चर्यवत् ( अद्भुत वस्तू प्रमाणें ) पहातात, कोणी आश्चर्यवत् त्याचें वर्णन करतात, कोणी आश्चर्यवत् ऐकतात, तर कोणी ऐकूनही त्याला जाणू शकत नाहींत.

२० हे सर्व जग ज्यानें व्यापिलें आहे ते ( आत्मतत्व ) अविनाशी आहे, असें समज या अव्यय तत्वाचा नाश करण्यास कोणीहीं समर्थ नाहीं.

२१ नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥
१६/२ अ.

२२ वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ॥
कथं स पुरुषःपार्थ कंघातयति हंतिकम् ॥
२१/२ अ.

२३ य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यतै हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥
१९/२ अ

२४ देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणो भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥
३०/२ अ,

२५ अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥
१८/२ अ,

---

२१ जें नश्वर आहे तें चिरकाल टिकुं शकत नाहीं, व जें शाश्वत आहे त्याचा नाश होऊं शकत नाहीं, असा ह्या दोहोंचाहीं निर्णय तत्वज्ञान्यांनीं केला आहे.

२२ पार्था, हा आत्मा अविनाशी, नित्य, अज ( जन्मरहित ) व अव्यय ( विकार न पावणारा ) आहे, असें जो जाणतो तो पुरुष कोणाला कसा मारविणार अगर मारणार.

२३ हा ( आत्मा ) मारणारा आहें असें जो मानतो, किंवा हा मारला जातो असें जो समजतो, या दोघानांही खरें समजत नाहीं. कारण हा कोणाला मारीतही नाहीं किंवा कोणाकडून मारलाही जात नाहीं.

२४ हे भारता, सर्वांच्या देहांत असणारा देही (आत्मा) हा शास्वत असल्यामुळें मारतां येण्याजोगा नाहीं; म्हणून प्राणिमात्राबद्दल शोक करणें तुला उचित नाहीं.

२५ नित्य, अविनाशि व अतर्क्य असा जो शरीराचा मालक आत्मा, त्यानें धारण केलेलें हे देह नाशवंत आहेत. म्हणून हे अर्जुना तू युद्ध कर.

२६ अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ॥
२/२६ अ.

२७ जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥
२।२७ अ.

२८ अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥
२८।२ अ.

२९ स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥
३१।२ अ.

३० यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ।
३२।२ अ.

---

२६ हे अर्जुना, हा आत्मा नेहमीं जन्म घेतो व नेहमीं मृत्यु पावतो, असें तुला वाटत असलें तरीही त्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं

२७ जो जन्मला त्याला मृत्यु निश्चित आहे, व जो मेला त्याला जन्म निश्चित आहे; म्हणून या अपरिहार्य गोष्टीचा शोक करणें तुला केव्हांही उचित नाहीं.

२८ हीं भूतें आरंभीं, जन्मापूर्वी अव्यक्त स्थितींत असतात, मध्यें व्यक्त दिसतात व शेवटीं अव्यक्तांतच लय पावतात, मग शोकाचे काय कारण ?

२९ क्षात्रधर्माच्या दृष्टीनें हीं, कचरणें हें तुला योग्य नाहीं, कारण क्षत्रियांना धर्मयुद्धाहून अधिक श्रेयस्कर असें दुसरें कांहीं नाहीं,

३० हे पार्था, सहज दैवगत्या उवडलेलें स्वर्गाचें द्वारच असें हें युद्ध भाग्यवान् क्षत्रियांनाच लाभत असतें.

३१ अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्ति च हित्वा पापमवाप्स्यसि ॥
३३/२ अ.

३२ अकीर्ति चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥
३४।२ अ.

३३ भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥
३५।२ अ.

३४ अवाच्यवादांश्च बहून्वादिष्यंति तवाहिताः ।
निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥
३६।२ अ,

३५ हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥
३७।२ अ.

---

३१ जर हें धर्मयुद्ध तूं करणार नाहींस तर स्वधर्म व कीर्ति दवडून पापाचा धनी होशील.

३२ सर्व लोक तुझी अपकीर्ति निरंतर गात बसतील, संभाविताला अपकीर्ति ही मरणाहून अधिक ( दुःख दायक ) असते.

३३ रणांतून तू भिऊन पळालास असें महारथी मानतील आणि ज्यांना तूं थोर वाटत होतास ते तुला तुच्छ लेखूं लागतील.

३४ तुझे शत्रु तुझ्या सामर्थ्याची निंदा करून भलभलते शब्द बोलतील याहून अधिक दुःख कारक काय आहे ?

३५ युद्धांत मेलास तर स्वर्ग मिळेल, वांचून जिकलेस तर पृथ्वीचा उपभोग घेशील. म्हणून हे अर्जुना, युद्धाचा निश्चय करून ऊठ.

३६ सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥
३८।२ अ.

३७ पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥
१३।१८ अ.

३८ अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥
१४।१८ अ

३९ शरीरवांङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥
१५।१८ अ.

४० तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥
१६।१८ अ.

---

३६ सुखदुःख. लाभालाभ, जयापजय समान मानून युद्धाला तयार हो; मग तुला पाप लागणार नाहीं.

३७ हे महाबाहो, सर्व कामें घडून येण्यास सांख्यांच्या सिद्धांतांत सांगितलेलीं पांच कारणें मी सांगतों; एक

३८ अधिष्ठान ( जागा ) तसाच कर्ता निरनिराळीं साधन सामुग्री व इंद्रियव्यापार, आणि त्या बरोबरच पांचवे, दैव. होय.

३९ मनुष्य प्राणि जें कोणतेही कायिक. वाचिक वा मानसिक बरे वाईट कर्म आरंभतो त्या कार्याची प्रेरणा होण्याला हीं पांच कारणें असतात.

४० अशी स्थिति असतां, जो मनुष्य बुद्धी सुसंस्कृत न झाल्या मुळें असंग अशा आत्म्याला कर्ता समजतो, त्या दुर्बुद्धी माणसाला कांहींच समजत नसते.

४१ कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥
२७/२ अ.

४२ सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥
४८/१८ अ.

४३ ब्राह्मण क्षत्रिय विशां शूद्राणां च परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभाव प्रभवैर्गुणैः ॥
१४/१८ अ.

४४ शमोदमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥
४२/१८ अ.

४५ शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥
४३/१८ अ.

---

४१ कर्म करण्या पुरतांच तुझा अधिकार आहे. फल तुझ्या हातांत नाहीं. फलाची आशा ठेऊन कर्म करणारा होऊं नकोस; कर्मे न करण्याच्या संकल्पांतही अडकूं नकोस.

४२ हे कौन्तेया, स्वभावसिद्ध कर्म सदोष दिसलें तरी टाकूं नये. कारण जसा धुराने अग्नि, तशी सर्व कर्मे ही दोषानें व्यापलेली असतातच.

४३ ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचीं कर्मे त्यांच्या स्वभावजन्य गुणा प्रमाणें निरनिराळीं वाटलेली आहेत.

४४ शम मनोनिग्रह, दम ( इंद्रियनिग्रह ) तप, अंतर्बाह्य शुचिर्भूतत्व क्षमा, सरलता, ज्ञान, विज्ञान, व आस्तिक्य बुद्धि, हे ब्राम्हणाचें स्वभावकर्म

४५ शोर्य, तेंजस्विता, धैर्य, दक्षता, युद्धांत पाठ न फिरवणें, दातृत्व आणि सामर्थ्य हें क्षत्रियांचें स्वभावसिद्ध कर्म होय.

४६ कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्य कर्म स्वभावजम् ।
परिचयत्मिकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥
४४/१८ अ.

४७ श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्विषम् ॥
४७/१८अ.

४८ स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धि लभते नरः ।
स्नकर्मनिरतः सिद्धि यथा विंदति तच्छृणु ॥
४५।१८ अ.

४९ यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धि विंदति मानवः ॥
४६।१८ अ.

५० ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारुढानि मायया ॥
६१।१८ अ.

---

४६ शेती. गुरेढोरे बाळगणे, व व्यापार करणें हे वैश्याचें, आणि सेवा करणें हे शूद्राचे स्वभावसिद्ध कर्म होय.

४७ स्वभावकर्म हें वेगुण्यात्मक दिसलें तरी उत्तम प्रकारे आचारलेल्या परकर्मापेक्षा श्रेष्ट असते कारण स्वभावसिद्ध नियत कर्म करणाऱ्यास पाप लागत नाही.

४८ आपल्या स्वाभाविक कर्मांत रत होऊन जो पुरुष वागतो, त्याला भगवत्प्राप्तिरूप सिद्धि मिळते. अशा स्वकर्मरत मनुष्याला ती सिद्धि कशी प्राप्त होते तें ऐक.

४९ ज्याच्या पासून सर्व भूताची प्रकृति ( उत्पत्ति ) झाली आहे व ज्यानें हें सर्व जग व्यापलें आहे. त्या परमात्म्याचो पूजा आपल्या स्वभाविक कर्मानें केली असता, मनुष्याला परम सिद्ध मिळतें.

५० हे अर्जुना, ईश्वर सर्व प्रणिमात्रांच्या हृदयांत राहून यंत्रावर घातल्या प्रमाणे सर्व प्राण्यांना आपल्या मायेनें फिरवीत असतो.

५१ तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ।

६२।१८ अ.

५२ समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यतिसपश्यति ॥

२७।१३ अ.

---

५१ हे भारता, त्याच ईश्वराला सर्वतोपरी शरण जा; त्याच्याच कृपाप्रसादानें तुला परम शांति व शाश्वत पद प्राप्त होईल.

५२ परमेश्वर सर्व भूतांच्या अंतरीं सारखा राहणारा व भूतें नाश पावली तरी नाश न पावणारा असा आहे, असे जो पाहतो, तो खरा पाहणारा ( ज्ञानी ) होय.



# अध्याय ३ रा.

## आत्म-साक्षात्कार योग.



या अध्यायांत भगवान् श्रीकृष्णांनीं, आपण मानवा प्रमाणें देहधारी दिसत असलों तरी आपली देहबुद्धि नसून आपली आत्मबुद्धि झालेली आहे व त्यामुळें स्वतः आत्मरूप बनल्यामुळें कारणानें, परमेश्वराशीं आपलें तादात्म्य. सूचित केलेलें आहे. त्याच अनुरोधानें, ज्याप्रमाणें मागच्या अध्यायांत अर्जूनाला शांति प्राप्ती करतां ईश्वराला शरण जाण्याचा उपदेश केला, त्याचप्रमाणें, ईश्वर व मी एकच असल्यामुळें माझ्या सांगण्या प्रमाणें वाग, मी तुला पापबंधनांतून मुक्त करतो. शोक करूं नकोस. मलाच शरण ये म्हणजे मी सर्व कांहीं पाहून घेतो, असा शेवटीं श्रीकृष्णांनीं हवाला घेतलेला आहे.



# अध्याय ३ रा.

## आत्मसाक्षात्कार योगः



भगवानुवाच—

१ सर्वं गुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥

६४।१८ अ.

२ अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥

२६।१० अ.

३ वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥

२६।७ अ,

४ नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥

२५।७ अ.

---

श्रीभगवानम्हणाले:- १ सर्व गुह्यांतील गूह्य असे माझे सर्वोत्कृष्ट वचन पुनः ऐक. तू माझा फार आवडता' म्हणून तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगतों-

२ हे गुडाकेशा, सर्व भूतांच्या अंतरी असणारा आत्मा मी आहे. सर्व भूतांचा आदि, मध्य व अंतही मीच

३ हे अर्जुना, वर्तमान, भूत व भविष्य कांळींतील सर्व प्राणी मात्र मी जाणतो, पण मला कोणी जाणत नाहीं.

४ मी योगमायेने झांकलो असल्यामुळे सर्वांना प्रकट दिसत नाहीं. मी जन्मरहित व अविनाशी आहे हें मूढ लोक जाणत नाहींत.

५ अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।
परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥
२४/७ अ.

६ न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥
२/१० अ.

७ ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्यच ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥
२७/१४ अ.

८ मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
संभवः सर्व भूतानां ततो भवति भारत ॥
३/१४ अ,

९ सर्व योनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥
४/१४ अ,

---

५ अविवेकी लोक माझें श्रेष्ट उत्कृष्ट आणि अव्यक्तरूप न जाणतां मला मनुष्या प्रमाणें व्यक्ति भावाला प्राप्त झालेला मानतात !

६ माझी उत्पत्ति देवांना व महर्षीनाही माहीत नाहीं; कारण, मी देवांचा व महर्षींचाही आदिकारण आहे.

७ कारण, अविकार्य व अविनाशी अशा ब्रम्हाचे आणि सनातन धर्माचें व निरतिशय सुखाचे अधिष्ठान मीच आहे.

८ अर्जुना, माझी तत्वतः ब्रम्हरूप असलेली मूळ प्रकृति हेंच सर्व भूतांचें उत्पत्ति स्थान; त्यात मी उत्पत्ति कारक बीज पेरतो तेंव्हां त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति सुरू होते.

९ हे कौतेया, सर्व योनीमध्यें ज्याज्या व्यक्ति उत्पन्न होतात, त्या सर्वांच्या त्रिगुणात्मक प्रकृति हें उत्पत्तिस्थान आणि उत्पादक शक्तिरूप बीज स्थापन करणारा जनक, मीच आहे.

१० एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ।

६।७ अ.

११ गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥

१८।९ अ.

१२ पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥

१७।९ अ.

१३ तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥

१९।९ अ.

१४ यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥

१२/१५ अ.

---

१० सर्व सृष्ट पदार्थ माझ्या परा व अपरा या प्रकृतिपासूनच उत्पन्न होतात ; म्हणून मीच अखिल जगाचा उत्पत्तिकर्ता, व संहारकर्ताही मीच आहे.

११ भक्तांचे प्राप्तव्य, पोषणकर्ता. स्वामी, अध्यक्ष, निवासस्थान, संरक्षक, हितकर्ता, उत्पत्ति व लय यांचे स्थान, गुप्त ठेवा व जगाचे अक्षय बीज मीच आहे.

१२ या जगाचा पिता, माता, धाता, आदिकारण, मीच व ज्ञेय वस्तु, ॐकार, ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद हीं मीच

१३ मी जगाला उष्णता देतो, मीच पर्जन्याचें आकर्षण करतो मीच पुन: पाऊस पाडतो. तसेच हे अर्जुना, अमृत व मृत्यु आणि सत् व असत् ही मीच आहे.

१४ सर्व जगाला प्रकाशविणारे जें तेज सूर्यांत आहे, तसेंच जे तेज चद्रांत व अग्नींत आहें, तें तेज माझेंच आहे असें समज,

१५ रसोऽहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्व वेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ।
८।७ अ.

१६ पुण्योगंधः पृथिव्यांच तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥
९/७ अ.

१७ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्यकर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥
१३/४ अ.

१८ महर्षयः सप्तपूर्वे चत्वारो मनवस्तथा ।
मद्भावा मानसाजाता येषां लोक इमाः प्रजाः ।
६/१० अ.

१९ बीजं मां सर्वं भूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिवतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥
१०/७ अ.

---

१५ हे कौंतेया, पाण्यामधील रस मी, चंद्रसूर्यांमधील प्रभा मी. सर्व वेदांतला प्रणव ( ॐकार ) मी, आकाशांतील शब्द मी व पुरुषांतील पराक्रम मी आहे,

१६ पृथ्वीतील उत्तम सुवास मी, अग्नींतील तेज मी, सर्व भूतांच्या ठिकाणचें जीवन मी व तपस्व्यांमधील तप मीच आहे.

१७ गुणकर्मांच्या भेदाप्रमाणें चहूं वर्णांची व्यवस्था मीच निर्माण केली आहे. मी तिचा कर्ता असून ही, अकर्ता व अविनाशी आहे असें जाण,

१८ प्रारंभीचे सात महर्षि व तसेच चार मनु हे माझे संकल्पानें उत्पन्न केलेले लोक आहेत; त्यांच्या पासूनच ही प्रजा या लोकात निर्माण झाली आहे,

१९ हे पार्था, सर्व भूतांचें सनातन बीज मी आहे असें समज, बुद्धिमंतांची बुद्धि मी व तेजस्व्यांचे तेजहि मी आहे,

२० बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ

११/७ अ.

२१ गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामिचौषधीः सर्वा सोमोभूत्वा रसात्मकः ॥

१३।१५ अ.

२२ अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥

१४।१८ अ.

२३ बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दम शमः ।
सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥

४।१० अ.

२४ अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।
भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥

५।१० अ.

---

२० वासना व आसक्ति यांनीं रहित असें बळवानांचें बल मी, सर्व भुतांच्या टिकाणीं धर्माला अनुकूळ असणारा काम ( इच्छा ) मी आहे,

२१ मी पृथ्वी मध्यें प्रवेश करून तेंजाने पदार्थांस धारण करतो व चंद्राच्या ठिकाणीं मीच रसरूप होऊन वनस्पतींचें पोषण करतों.

२२ सर्व प्राण्यांच्या शरीरांत असलेला जठराग्नि मीच होऊन, व प्राण व अपान यांनीं युक्त होऊन व ( भक्ष्य, चोष्य, लेह्य व पेय ) चार प्रकारचें अन्न पचवतो,

२३–२४ बुद्धि, ज्ञान, निर्भयस्थिति, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, उत्पत्ति, नाश, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश, अपयश, इत्यादि प्राण्यांचे भाव माझ्या पासूनच होत असतात.

२५ मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥
७।७ अ.

२६ यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।
न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥
३९।१० अ.

२७ अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥
४२/१० अ.

२८ सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥
१८/१५ अ.

२९ यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥
३०।६ अ.

---

२५ हे धनंजया, माझ्याहून श्रेष्ठ अथवा वेगळे असें दुसरें कांहीं नाहीं दोऱ्यांत ओविलेल्या मण्यांप्रमाणें माझ्या ठायीं हे सर्व जग ओविलेलें आहे,

२६ तसेंच, हे अर्जुना, सर्व पदार्थांचें जें बीज तें मीच आहे; मी नाहीं अशी वस्तूच चराचर सृष्टींत अस्तित्वांत नाहीं.

२७ अथवा हे अर्जुना, हा एवढा पाल्हाळ समजून तुला काय करावयाचे आहे, मी हें संपूर्ण विश्व एकाच अंशानें व्यापून धारण करून राहिलों आहे.

२८ मी सर्वांच्या हृदयांत अंतर्यामि रूपानें राहणारा आहे, स्मृति ज्ञान तर्क, हा मजपासून होतात. सर्व वेदांनीं जाणण्यास योग्य मीच, वेदांतांचा कर्ता व वेदांचा ज्ञाता हो मीच आहे.

२९ जो पुरुष सर्वत्र मला पाहतो व माझ्यांत सर्व पाहतो, त्याना, मी नाहींसा होत नाहीं व मला तो नाहींसा होत नाहीं.

३० योमामजनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढाः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥
३।१० अ.

३१ सर्वं धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥
६६।१८ अ.

---

३० जो मला जन्म रहित, अनादि व सर्व लोकांचा महेश्वर असें जाणतो तो मनुष्यांमध्ये मोह रहित सर्व पापांतून मुक्त होतो.

३१ इतर सर्व धर्म सोडून तूं मलाच एकटयाला शरण ये, मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन. शोक करूं नको.



# अध्याय ४ था.

## पुरुषोत्तम योग.



या अध्यायांत ज्ञेय वस्तु, परंब्रम्ह, अश्वत्थ वृक्ष हीं सर्व आत्मरूप एकच आहेंत असें सांगून त्याचें ज्ञान प्राप्त करून घेण्याचा उपदेश अर्जुनाला केलेला आहे. हे ज्ञान प्राप्त करून घेतल्यावरच तुला स्वतःच्या ठिकाणीं विश्वरूप दर्शन होईल व मगच तुझा मोह जाईल, हें आत्मसाक्षात्काराचें रहस्य स्पष्ट करून दाखविले आहे.



# अध्याय ४ था.

## पुरुषोत्तम योगः



**श्रीभगवानुवाच**

१ परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥
१।१४ अ.

२ ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥
१२।१३ अ.

३ सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥
१३/१३ अ.

४ सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृच ॥
१४।१३ अ

---

**श्रीभगवान म्हणाले:-** १ सर्व ज्ञानांतील उत्तम ज्ञान पुनः तुला सांगतो; हें ज्ञान जाणून सर्व मुनि या संसारांतून सुटून परम सिद्धि पावले आहेत.

२ आतां जें जाणल्यानें मोक्ष मिळतो तें ज्ञेय तुला सांगतों तें अनादि श्रेष्ठ ब्रम्ह होय. त्याला सत् किंवा असत् ही म्हणतां येत नाहीं.

३ त्याला सर्वत्र हात व पाय आहेत; सर्व बाजूनीं डोळे, डोकीं व मुखें आहेत: सर्वत्र कान आहेत आणि तें सर्वांना व्यापून राहिलें आहे.

४ सर्व इंद्रियांच्या विषयांचे ते प्रकाशक असून वस्तुत ज्याला कोणतेच इंद्रिय नाहीं, तें अनासक्त असून सर्व भूतांचे धारणपोषण करणारे आहे ते निर्गुण आहे व गुणभोक्तेंही आहे.

५ बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चातिके च तत् ॥
१५।१३ अ.

६ अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥
१६।१३ अ.

७ ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥
१७।१३ अ.

८ यदा भतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥
३०।१३ अ.

९ तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥
१७।५ अ.

---

५ तें सर्व भूतांच्या आंत व बाहेर ही आहे; चर व अचरही आहे. सूक्ष्म असल्यामुळं जाणण्यास अशक्य आहे; तसेच दूर असूनही तें जवळ आहे.

६ तें अविभक्त असून सर्व भूतांत विभागलेले दिसतें; भूतांचें धारण पोषण करणारे, व संहार करणारे व सर्वांना उत्पन्न करणारें असें तें आहे,

७ तें तेजाचें ही तेज असून अंधाराच्या–मायेच्या–अत्यंत पलीकडले असें म्हटलें जाते' तें ज्ञानरूप, व ज्ञानानें कळणारें असून सर्वाच्या हृदयांत अधिष्ठित आहे

८ जेव्हां सर्व भूतांचा भिन्नपणा एका आत्म्यामध्यें स्थिर आहे. आणि आत्म्या पासूनच हा सर्व विस्तार झाला आहे, असे पाहतां येते तेंव्हा ब्रम्हाची प्राप्ति होते.

९ ज्यांची बुद्धी तद्रूप झाली, जें आत्मस्वरूपी स्थिर झाले, व जें ईश्वर परायण झाले त्यांचे पाप आत्मज्ञानाने निःशेष धवून जाऊन ते पुनः जन्माला येत नाहींत.

१० विद्याविनयसंपन्ने ब्राम्हणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाकेच्च पंडिताः समदर्शिनः ॥
१८/५ अ.

११ इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रम्ह तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥
१९/५ अ.

१२ एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥
७२/२ अ.

१३ यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥
११/८ अ.

१४ ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥
१/१५ अ.

---

१० असें ज्ञानी लोक हे विद्या विनय युक्त ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा व चांडळ या सर्वांना समदृष्टीनें पाहतात.

११ ज्यांच्या **मनांमध्यें समभाव** स्थिर झाला, त्यांनीं संसारांत राहूनच पुनर्जन्म जिंकला; कारण ब्रम्ह हें निर्दोष व सम आहे, म्हणून ते ब्रम्हांतच स्थिर झाले.

१२ हे पार्था ब्राम्ही स्थिति ती हीच. ही प्राप्त झाल्यावर योगी मोह पावत नाहीं, अंतकालींही या ब्राम्ही स्थितींत राहून ब्रम्हनिर्वाणाला पोंचतो,

१३ वेदवेत्ते ज्याला अक्षर--अविनाशी- म्हणतात, विरक्त व यत्नशील यति ज्यांत प्रवेश करतात, व ज्याची इच्छा करून ब्रम्हचर्य व्रताचें आचरण करतात, . तें पद तुला थोडक्यांत सांगतो.

१४ ज्याचें मूळ वर व शाखा खालीं, कधींही नाश न होणारा, अव्यय व छंदांसि म्हणजे वेद हीं ज्याचीं पानें, असा वर्णिलेला अश्वत्थवृक्ष ज्याने जाणला तो वेदवेत्ता होय.

१५ अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥
२।१५

१६ न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्नच संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरुढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥
३।१५

१७ ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूय
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥
४।१५

१८ निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्याविनिवृत्तकामा
द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥
५।१५

१९ न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥
६।१५

---

१५ त्रिगुणांनीं पोसलेल्या व विषयांचे अंकुर फुटलेल्या त्याच्या शाखा खालीं व वर पसरलेल्या आहेत; आणि कर्मरूप होणाऱ्या त्याच्या मुळया खालींही मनुष्य लोकांत वाढत वाढत लांब गेल्या आहेत.

१६ परंतु वर प्रमाणें इकलोकीं याचें स्वरूप उपलब्ध होत नाहीं, किंवा, अंत, आदि व आधारस्थानही, मिळत नाहीं खोल मुळयाचा हा अश्वत्थवृक्ष असंगरूप शस्त्राने तोडून,

१७ नंतर पुरातन प्रवृत्ति ज्यापासून निघाली त्याच आद्य पुरूषाकडे मी जातो, ( अशा संकल्पानें ) जेथें पोंचल्यावर माघारे येत नाहींत तें स्थान शोधून काढावें.

१८ मान मोह रहित, संगदोष जिंकलेले, अध्यात्मांत मग्न, निष्काम आणि सुखदुःख संज्ञक द्वंद्वापासून मुक्त, असे ज्ञातें पुरूष या अव्यय पदाला पोंचतात.

१९ त्या पदाला सूर्य, चन्द्र, किंवा अग्नि प्रकाशित करूं शकत नाहींत. ज्या पदाला पोंचलें असतां योगी परतून येत नाहींत तेंच माझें परम धाम होय.

२० इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥
२।१४ अ.

२१ न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योग संसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥
३८।४ अ.

२२ तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥
३४/४ अ.

२३ यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥
३५।४ अ.

२४ ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्म संग्रहः ॥
१८।१८ अ.

---

२० या ज्ञानाचा आधार घेऊन माझ्या स्वरुपाला प्राप्त झालेले पुरुष सृष्टीच्या उत्पत्तिकाळी जन्मत नाहींत व प्रलय काळींही नाश पावत नाहींत,

२१ या लोकीं ज्ञानासारखें पवित्र असे दुसरे कांही नाही. तें ज्ञान कालांतरानें, योगमार्गीनें सिद्ध झालेला, आपल्या ठिकाणीं प्राप्त करून घेतो,

२२ तत्ववेत्ते ज्ञानी हे, त्यांना प्रणिपात केल्यानें, नम्रतापूर्वक प्रश्नानें, आणि त्यांची सेवा केल्यानें ते आत्मज्ञान सांगतात, हें लक्षांत ठेव.

२३ जे ज्ञान प्राप्त झाल्यावर, हे पांडवा, पुनः तुला असा मोह होणार नाहीं, आणि ज्या ज्ञानानें यच्चयावत् सर्व भूतें तुझ्या स्वतःचे ठिकाणीं व माझ्याही ठिकाणीं असलेलीं तुला दिसतील.

२४ ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान अशी कर्माच्या प्रेरणेची तीन अंगे आहेत, आणि कर्ता, कर्म, व करण्याचे साधन, अशी त्या कर्माच्या निष्पत्तीची तीन अंगे आहेत.

२५ ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥

१९।१८ अ.

२६ सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥

२०।१८ अ.

२७ पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भूतेषु तऽज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥

२१/१८ अ.

२८ यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्त महेतुकम् ।
अतत्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥

२२/१८ अ.

२९ अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥

७।१३ अ.

---

२५ ज्ञान, कर्म व कर्ता गुणभेदानें तीन प्रकारची आहेत, असें सांख्य शास्त्रांत सांगितलें आहे,, तेही नीटपणें समजून घे.

२६ भिन्न भिन्न सर्व भूतांत एकच अविभक्त व अविनाशी भाव आहे, असें ज्या ज्ञानानें दिसतें तें ज्ञान सात्विक होय, असें जाण,

२७ परंतु ज्या ज्ञानानें सर्व भूतांत नाना भाव भिन्नत्वानें दिसतात ते ज्ञान राजस असें समज.

२८ परंतु तत्वार्थ न समजतां निरर्थक एकाद्या कार्यांत तेंच काय तें सर्वस्व असें समजून गुरफटून राहतें तें अल्प ज्ञान, तामस असें म्हणतात.

२९, ३०, ३१, ३२, ३३,– अभीमानाचा अभाव, दंभ नसणे, अहिंसा, क्षमाशीलता, सरलता गुरूसेवा अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा, स्थैर्य,

३० इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥

८।१३ अ.

३१ असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥

९।१३ अ.

३२ मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥

१०।१३ अ.

३३ अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम् ।
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥

११।१३ अ.

३४ अपिचेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥

३६।४ अ.

---

आत्मसंचय, इंद्रियोपभोगाविषयीं विरक्ति, निरहंकार वृत्ति, जन्म, मरण, वार्धक्यता व रोग यांचे ठिकाणीं वारंवार दोष दृष्टीनें पाहणें, अनासक्ति, स्त्री पुत्र गृह इत्यादिकांत लंपट नसणें, इष्टानिष्ट प्राप्त झाले असतां नेहमीं चित्ताची समता, माझ्याठायीं अनन्य व अढळ भक्ति, एकांतवास, ग्रामलोकससुदायाचा कंटाळा, अध्यात्मज्ञानाचें नित्य अनुशीलन, या सर्व गुणांना ज्ञान म्हणतात, याविरुद्ध तें अज्ञान होय.

३४ जरी तूं सर्व पातक्यांहून अधिक पातकी असलास. तरी या ज्ञान नौकेनें सर्व पापसमुद्र तू सहज तरून जाशील.

३५ यथैधांसि समिद्धोग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वं कर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥

३७।४ अ.

३६ श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥

३९/४ अ.

३७ अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥

४०।४ अ.

३८ ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषा मादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥

१६।५ अ.

३९ ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥

२४।१३ अ.

---

३५ हे अर्जुना, प्रदीप्त अग्नि जसा काष्ठांना भस्म करतो तसा ज्ञानाग्नि सर्व कर्म भस्म करून सोडतो.

३६ जितेंद्रिय, साधन तत्पर व श्रद्धावान पुरुष हे ज्ञान प्राप्त करून घेतो, आणि तें प्राप्त होतांच त्याला परम शांति मिळते,

३७ अज्ञ, अश्रद्धाळू व संशयखोर मनुष्य नाश पावतो; संशयखोराला ना इहपरलोक, ना सुख !

३८ परंतु ज्यांचे ते अनादि अज्ञान आत्मज्ञानानें नाहींसे झाले आहे त्याचे ते सूर्य सदृश ज्ञान परमात्म्याला प्रकाशित करतें.

३९ कोणी आत्म्याला हृदयांत आत्म्यानेंच ध्यानाच्या द्वारें पाहतात; कोणी ज्ञानयोगानें तर कोणी कर्म योगानें त्याला प्राप्त करून घेतात.

४० अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥

२५।१३ अ.

४१ यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।
यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥

११।१५ अ.

४२ उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥

६।५ अ.

४३ बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥

६।६ अ.

---

४० परंतु असे ज्ञान नसलेले दुसरे पुरुष गुरूकडून श्रवण करून त्याची उपासना करतात. श्रवणकरणारेही मृत्युरूप संसारसागर तरून जातात.

४१ यत्न करणारें योगीच आपल्या हृदयांत असलेल्या या आत्म्याला पाहतात. परंतु अजितेंद्रियतेमुळें आत्मसात् न झालेले लोक यत्न करून ही याला ओळखू शकत नाहींत.

४२ आत्म्याच्या साहचानेंच आत्म्याचा (जीवात्म्याचा) उद्धार करावा, आपला नाश आपण करून घेऊं नये. आत्माच आपला बंधु होतो व तोच आपला शत्रूही होतो.

४३ ज्यानें आत्म्याच्य साह्यानें ( आत्म्याला इंद्रियांतून सोडवून ) आत्म्याला जिंकले, त्याचा आत्मा स्वतःचा बंधु बनतो, पण जो आत्मरूप न होता ( इंद्रियाधीन होतो त्याचा आत्मा शत्रु बनून शत्रू प्रमाणें त्याच्याशीं वागतो.

४४ जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥
७।६ अ.

४५ समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥
२८।१३ अ,

४६ आत्मोपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥
३२।६ अ,

४७ तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥
४२।४ अ.

४८ बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥
१९।७ अ,

---

४४ ज्यानें आत्मा जिंकून ( आत्मस्वरूप बनून ) आत्यंतिक शांति मिळविली त्याचा आत्मा, शीत, उष्ण, सुख, दुःख व मानापमान इत्यादि द्वंद्वाविषयीं समबुद्धि झालेला असतो,

४५ कारण तो पुरूष परमात्मा सर्वत्र सारखाच भरलेला आहे असे समबुद्धीने पाहतो, व त्यामुळें तो आत्मघात करीत नाहीं. ( आत्म्याला इंद्रियांत लोटून त्याचा घात करीत नाहीं ) म्हणून उत्तम गतीला जातो,

४६ अर्जुना, जो सुखांत किंवा दुःखांत सर्वत्र आत्माच भरलेला आहे अशा आत्मबुद्धीनें पाहू शकतो तो योगी सर्व श्रेष्ट होय.

४७ या साठीं, हे भारता, अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या या संशयाला ज्ञानखड्गाने छेदून टाकून समत्व उत्पन्न करणाऱ्या योगाचा आश्रय कर आणि ( युद्धाला ) तयार हो.

४८ अनेक जन्मानंतर, हे सर्व जगत् वासुदेवमयच आहे, असें समजलेला ज्ञानी पुरूष मला येऊन मिळतो. असा महात्मा फार दुर्लभ !

४९ इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥

२०।१५ अ.

४९ हे निष्पाप भारता, या प्रमाणें हे अत्यंत गुह्य शास्त्र मी तुला सांगीतलें आहे, हें तत्वतः जाणल्यानें मनुष्य बुद्धिमान आणि कृतकृत्य होऊन जाईल



# अध्याय ५ वा.

## ज्ञान-विज्ञान योग.



परमेश्वर म्हणजे आत्मा निर्गुण व पूर्ण आहे, त्यानें निर्गुणबुद्धितत्व बनून त्यापासून सगुणबुद्धितत्व निर्माण केलें. चैतन्य आत्म्याला पुरुष म्हणतात, निर्गुणबुद्धीला अक्षर पुरुष व पराप्रकृति म्हणतात; सगुणबुद्धीला क्षरपुरुष, व अपराप्रकृति म्हणतात. मानवामध्यें आत्मा आपल्या निर्गुण बुद्धीनें पूर्णच असतो परंतु श्वासातील अपूर्ण शक्तीमुळें मानवी सगुणबुद्धी अपूर्ण असते व त्यामुळें मानवी निर्गुणबुद्धी मानवी सगुणबुद्धीमुळें परतंत्र होतें व ही आत्म्याच्या संकल्पाचा खेळ असतो. म्हणून तो संकल्प सोडून दिल्यावर निर्विकल्प होऊन निगुर्णत्वाचे स्वातंत्र्य मिळविण्याला आत्मा सदैव स्वतंत्रच असतो व हेंच आत्म्याच्या पूर्णत्वाचें द्योतक आहे. म्हणून उपनिषत्कारांनीं आत्म्याचें वर्णन पुढील प्रमाणें करून त्यांत सर्व आत्मज्ञानाचें सार सांठवून ठेवलें आहे.

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।**

हाच सर्व विषय या अध्यायांत सविस्तर आलेला आहे.



# अध्याय ५ वा.

## ज्ञान विज्ञान योग.



अर्जुन उवाच,

१ किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरूषोत्तम ।
अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥
१/८ अ,

२ अधियज्ञः कथं कोऽत्र देहेस्मिन्मधुसूदन ।
प्रयाणकालेच कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥
२/८ अ,

श्रीभगवानुवाच.

३ इदं तुते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।
ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥
१/९ अ.

४ द्वाविमौ पुरूषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥
१६/१५ अ.

---

**अर्जुन म्हणाला:** १ हे पुरूषोत्तमा, तें ब्रम्ह म्हणजे काय ? अध्यात्म म्हणजे काय ? कर्म म्हणजे काय ? अधिभूत म्हणजे काय ? अधिदैव कशाला म्हणतात ?

२ हे मधुसूदना, अधियज्ञ कोण व तो या देहांत कसा आहे ? आणि आत्मसंयमी पुरूषांनी अंतकाळीं तुला कसे जाणावयाचें ?

**श्रीभगवान् म्हणाले:** ३ तूं दोषदृष्टि रहित भक्त आहेस म्हणून गुह्यांतले गुह्य असें ज्ञान विज्ञानासुद्धा तुला सांगतो. ते जाणल्यावर तूं अकल्याणापासून मुक्तच होशील.

४ या लोकीं क्षर व अक्षर असें दोन पुरूष आहेत क्षर म्हणजे सर्व भूते, हा नाशवंत विभाग, व अक्षर म्हणजे सर्व भूतांच्या अंतर्यामी असणारे आत्मतत्व, हा अविनाशी किंवा कूटस्थ भाग.

५ उत्तमः पुरूषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥
१७।१५ अ.

६ अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भवकरो विसर्गःकर्म संज्ञितः ॥
३।८ अ.

७ अधिभूतं क्षरोभावः पुरुषश्चाधिदैवतम् ।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥
४/८ अ.

८ यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतो स्मि लोके वेदेच प्रथितः पुरूषोत्तमः ॥
१८।१५ अ.

९ भूमिरापोनलोवायुः खं मनोबुध्दिरेवच ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥
७।४ अ.

---

५ या दोन्हीहून भिन्न असा जो ' उत्तम पुरूष ' त्याला परमात्मा असें म्हणतात तोच अविनाशी ईश्वर त्रैलोक्य व्यापून त्याचें धारण पोषण करतो,

६ अक्षर म्हणजे कधींही नाश न पावणारे श्रेष्ठ तत्व ते ' ब्रम्ह, ' स्वभाव म्हणजे अक्षर ब्रम्हाचा प्रत्येक देहांतील अंश, जो जीव त्यास ' अध्यात्म ' म्हणतात भूतमात्रांची उत्पत्ति करणारा जो विसर्ग-सृष्टि व्यापार त्याला कर्म असे म्हणतात.

७ भूतांचा नाशवंत भाव ( देहादि पदार्थ ) तें ' अधिभूत ' आणि ( या सर्व पदार्थात ) जो पुरूष म्हणजे सचेतन अधिष्ठाता तो अधिदैवत. हे नरश्रेष्ठ, या देहांत " अधियज्ञ " म्हणजे सर्व यज्ञांचा अधिपति मीच आहे,

८ ज्या अर्थी मी क्षराहून पलीकडचा व अक्षराहूनही उत्तम आहे, त्या अर्थी लोकांमध्यें व वेदांमध्यें मी ' पुरूषोत्तम ' म्हणून प्रसिद्ध आहे

९ पृथ्वी, आप, तेज, वायु आकाश, मन, बुद्धि, व अहंकार अशी माझी प्रकृति आठ प्रकारानीं विभागलेली आहे.

१० अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विध्दि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥
५।७ अ.

११ प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विध्दि प्रकृतिसंभवान् ॥
४९।१३ अ.

१२ कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखाना भोक्तृत्व हेतुरुच्यते ॥
२०।१३ अ.

१३ पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।
कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥
२१।१३ अ.

१४ प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥
८।९ अ.

---

१० ही अपरा म्हणजे गौण अथवा जड प्रकृति होय या शिवाय हे महाबाहो, जिच्या योगाने या जगाचें धारण पोषण होते अशी जीव स्वरूप परा म्हणजे श्रेष्ठ अथवा चेतन प्रकृति आहे असें समज.

११ प्रकृति व पुरूष ही दोन्ही अनादि आहेत असे जाण; आणि राग, द्वेषादि विकार व त्रिगुणात्मक सर्व पदार्थ हे प्रकृतिपासून उत्पन्न होतात असे समज

१२ कार्य म्हणजे देह, करण म्हणजे इंद्रिये, याच्या कर्तृत्वास प्रकृति कारण आहे, आणि सुखदुःखाचा उपभोग घेण्यास पुरूष कारण आहे, असें म्हणतात,

१३ प्रकृतिस्थित असलेला जीवात्मा प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणांचा उपभोग घेतो; आणि हा गुणसंग त्याला बऱ्या वाईट योनींत जन्म घेण्यास कारण होतो

१४ मी माझ्या प्रकृतीचा आधार घेऊन, प्रकृतीच्या आधीन झाल्यामुळें या संपूर्ण परतंत्र भूतवर्गास पुनः पुनः उत्पन्न करतो.

१५ न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्व प्रकृतिजैर्गुणैः ॥
५।३ अ.

१६ न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।
उदासीनवदासीनं असक्त तेषु कर्मसु ॥
९/९ अ.

१७ मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।
हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥
१०/९ अ.

१८ न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥
१४/५ अ.

१९ नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यति जंतवः ॥
१५/४ अ.

---

१५ कारण, कोणीही कर्म केल्यावांचून क्षणभरही स्वस्थ राहूं शकत नाही पराधीनतेमुळें प्रत्येकाकडून प्रकृतीचे गुणधर्म कर्म करवितात.

१६ हे धनंजया मी असक्त व उदासीन असल्यामुळें त्या कर्मात असूनही तीं कर्मे मला बद्ध करीत नाहीत,

१७ माझ्या अध्यक्षतेनें ( आश्रयानें ) प्रकृति सर्व चराचर जग उत्पन्न करते, आणि त्यामुळेंच हे संसारचक्र एकसारखें फिरत राहतें.

१८ परमेश्वर लोकांचे कर्तेपण, किंवा त्यांचीं कर्मे अथवा कर्माच्या बलाची योजना निर्माण करीत नसतें. तर स्वभाव म्हणजे प्रकृति तें सर्व काहीं करते.

१९ सर्व व्यापि परमेश्वर कोणाचें पुण्यही ग्रहण करीत नाहीं किंवा पापही घेत नाही. अज्ञानानें ज्ञान आच्छादित झाल्यामुळे सर्व जीव मोह पावत असतात,

२० न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥
१४।४ अ.

२१ एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥
१९।४ अ.

२२ सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥
३३।३ अ.

२३ स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥
६०।१८ अ.

२४ यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्षति ॥
५९/१८ अ.

---

२० मला कर्मफलाची इच्छा नाहीं म्हणून कर्माची बाधा मला होत नाहीं असें मला जो जाणतो तोही कर्मांनीं बद्ध होत नाहीं,

२१ या प्रमाणें जाणूनच पूर्वकालच्या मुमुक्षुनीही कर्म केले आहे, म्हणून तूंही पूर्वजांनीं सदासर्वदा केलेले कर्म कर,

२२ ज्ञानवान पुरूषही आपल्या प्रकृतिधर्मां प्रमाणें वागत असतो; सर्व प्राणि आपापल्या प्रकृतीच्या वळणावर जातात; तेथें निग्रह काय करणार

२३ कौंतेया, प्रकृतिधर्मकर्मानें बांधल्यामुळें. जें कर्म मोहानें तूं करू इच्छित नाहींस, तेंच तुला प्रकृतीच्या स्वाधीन होऊन करावें लागेल,

२४ जर तूं अहंकार धरून 'मी लढणार नाहीं' असे मानीत असशील तर तुझा हा निश्चय व्यर्थ आहे, कारण प्रकृति म्हणजे तुझा क्षत्रिय स्वभाव तुला जबरीनें युद्ध करावयास लावील,

२५ प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकार विमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥
२७।३ अ,

२६ तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तंते इति मत्वा न सज्जते ॥
२८।३ अ.

२७ प्रकृत्यैवच कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥
२९।१३ अ,

२८ मया ततमिदं सर्वं जगदव्यक्त मूर्तिना ।
मत्स्थानि सर्व भूतानि न चाहं तेष्ववस्थित : ॥
४।९ अ.

२९ नच मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूत भावनः ॥
५।९ अ.

---

२५ सर्व कर्मे प्रकृतीच्या गुणां कडून केलीं जातात; अहंकारानें मूढबुद्धी झालेला पुरूष मी ' कर्मकर्ता आहे " असें मानतो !

२६ परंतु हे महाबाहो, गुणकर्म तत्त्वाला जाणणारा ज्ञानी, सत्वरजतमात्मक गुणच सत्वरजतमात्मक कर्मामध्ये वावरत असतात, असें जाणून त्यांत आसक्त होत नाहीं,

२७ आत्मा अकर्ता आहे, सर्व प्रकारे कर्मे प्रकृती कडून केलीं जातात असें जो पाहतो, जाणतो – तोच खरा पाहणारा – ज्ञानी – होय.

२८ मी आपल्या अव्यक्तरूपानें हें सर्वजग व्यापले आहे, माझ्या ठिकाणी सर्व भूते आहेत, पण मी त्यांच्या ठिकाणीं नाहीं.

२९ वस्तुत: भूतेंही माझ्या ठिकाणीं नाहींत, हाच माझा ऐश्वर्य योग तुं नीट पहा, माझा आत्मा भूतें उत्पन्न करणारा व धारण पोषण करणारा असूनही, त्या भूतांच्या ठिकाणीं असत नाहीं,

३० यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥
६।९ अ.

३१ सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥
७।९ अ,

३२ यो मामेवमसंमूढो जानाति पुरूषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥
१९।१५ अ.

३३ जरामरण मोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।
तेब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥
२९।७ अ.

३४ साधिभूताधिदैवं मां साधियज्ञंच ये विदुः ।
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्त चेतसः ॥
३०।७ अ.

---

३० ज्या प्रमाणें आकाशा पासून उत्पन्न झालेला व सर्वत्र संचार करणारा महान् वायू आकाशांतच नेहमीं असतो त्याप्रमाणें भूतें माझ्यांत असतात असें समज,

३१ हे कौंतेया, कल्पांतीं सर्व भूते माझ्या प्रकृतीस येऊन मिळतात; आणि कल्पारंभी मीच त्यांना पुनः उत्पन्न करतों,

३२ हे भारता, जो ज्ञानी पुरूष याप्रमाणें मला जाणतो, तो सर्वज्ञ होऊन सर्व भावानें मला भजतो,

३३. ३४ जे माझा आश्रय करून जरामरणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करतात, तें त्या परब्रम्हाला, संपूर्ण अध्यात्माला, अखिल कर्माला, त्याच प्रमाणे अधिभूत अधिदैव व अधियज्ञ यांसह मला संपूर्णाला जाणतात ते योगयुक्त पुरूष मरण समयीं तें विसरत नाहींत मला जाणतात.

# अध्याय ६ वा.

## क्षेत्र-क्षेत्रज्ञ योग.



या अध्यमांत आत्म्याच्या संकोचित्वाचा विषय मागील अध्यायावरून पुढें चालू आहे. मागील अध्यायांतील अष्टधा प्रकृतीचें वर्णन मनुष्यांत कसे दिसून येतें हा या अध्यायाचा विषय आहे.



# अध्याय ९ वा.

## क्षेत्रक्षेत्रज्ञ योग.



श्रीभगवानुवाच,

१ ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषत ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥
२।७ अ.

२ इदं शरीरं कौनेय क्षेत्र मित्यभिधीयते ।
एतद्योवेत्ती तं प्राहु क्षेत्रज्ञ इति तद्विद: ॥
१।१३ अ

३ क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वं क्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥
२।१३ अ.

४ तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारियतश्च यत् ।
स च यो थत्पकाशश्च तत्समासेन मे श्रृणु ॥
३।१३ अ,

---

**श्रीभगवान् म्हणाले-** १ मी तुला विज्ञानसहित ज्ञान पूर्णपणें सांगतो तें जाणल्यावर या लोकीं आणखी कांहीं जाणण्याजोगें उरत नाहीं.

२ हे कौतेया. या शरीरास क्षेत्र असें म्हणतात, हे शरीर (माझें आहे) असे जो जाणतो त्याला क्षेत्रज्ञ (जीव) असें तत्वज्ञ म्हणतात.

३ हें भारता. सर्वत्र क्षेत्रज्ञ तो मी आहे, असे समज क्षत्र व क्षेत्रज्ञ यांचे जें ज्ञान तेच (खरे) ज्ञान असे माझे मत आहे,

४ ते क्षेत्र म्हणजे काय, कोणत्या प्रकारचे त्याचें विकार त्यांने कशा पासून काय होतें, तसेंच तो क्षेत्रज्ञ कोण व त्याचा प्रभाव काय हे मी थोडक्यांत सांगतो, ऐक,

५ ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्‌भिर्विनिश्चितैः ॥
४।१३ अ.

६ महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥
५।१३ अ.

७ इच्छाद्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥
६।१३ अ.

८ उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥
२२।१३ अ.

९ यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावरजंगमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥
२६/१३ अ.

---

५ हें अनेक ऋषींनीं वेंद छंदांच्याद्वारें व हेतु पूर्वक निश्चीत केलेल्या ब्रम्हसूत्रांतील पदांनीं अनेक प्रकारांनी गाइले आहे,

६–७, पंचमहाभूतें, अहंकार. बुद्धि, अव्यक्त ( मूळ प्रकृति ) दहा इंद्रियें एक मन, इंद्रियांचें पांच विषय, इच्छा, द्वेष. सुखदुःख, संघांत ( स्थूल देहाचा पिंड ) चेतना आणि धृति ( स्थैर्य ) या इतक्यांनां संक्षेपानें सविकार " क्षेत्र " असें म्हटले आहे,

८ ( प्रकृतींच्या गुणांचा ) उपद्रष्टा - जवळ राहून पाहणारा, – अनुमोदन देणारा, भर्ता भर वाहणारा, – व भोक्ता – उपभोग घेणारा, यांसच या देहांतील परपुरुष, महेश्वर, परमात्मा असें म्हणतात.

९ हे भरत श्रेष्ठा, स्थावरजंगम असो कोणतीही वस्तु उत्पन्न होते तीं क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासूनच होते असें जाण,

१० अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥
३१।१३ अ.

११ यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यतें ।
सर्वत्रावस्थितो देहें तथात्मा नोपलिप्यतें ॥
३२।१३ अ.

१२ यथा प्रकाश यत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥
३३।१३ अ.

१३ क्षेत्रक्षत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।
भूत प्रकृतिमोक्षं च ये विदु र्याति ते परम् ॥
३४/११ अ.

१४ सत्वं रजस्तम इतिगुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नंति महाबाहो देंहे देहिनमव्ययम् ॥
५।१४ अ.

---

१० अनादी व निर्गुण असल्यामुळें हा अव्यय परमात्मा शरीरांत असूनही अकर्ता व अलिप्त असतो.

११ ज्या प्रमाणें सर्वव्यापि आकाश सूक्ष्मपनेमुळे कशातही लिप्त होत नाहीं त्या प्रमाणें शरीरांत सर्वत्र व्यापून असणारा आत्मा देहाच्या गुणांत लिप्त होत नाहीं.

१२ हे भारता, ज्या प्रमाणें एकटां, सूर्य ब्रम्हांडाला प्रकाशित करतो, त्या प्रमाणें एकच क्षेत्रज्ञ ( आत्मा ) सर्व क्षेत्राला ( शरिराला ) प्रकाशित करतो,

१३ या प्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांतील फरक व प्रकृति आणि प्रकृति कार्य यांतून सुटण्याचा उपाय जे ज्ञान दृष्टिने जाणतात ते परमगतीला पोचतात.

१४ हे महाबाहो, प्रकृती पासून उत्पन्न झालेले सत्व, रज, व तम हे गुण निर्विकार अशा जीवात्म्यास या देहांत बांधून टाकतात-

१५ तत्र सत्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेनः बध्नाति ज्ञानसंगेन चानध ॥
६।१४ अ.

१६ रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥
७।१४ अ.

१७ तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्व देहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥
८/१७ अ.

१८ सत्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥
९/१४ अ.

१९ रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत ।
रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥
१०/१४ अ.

---

१५ हे निष्पापा, यापैकीं प्रकाशक व निर्दोष असा सत्वगुण निर्मळ असा त्यामूळें सुखाच्या आसक्तीनें व ज्ञानाच्या अभिमानाने बांधून टाकतो

१६ हे कौंतेया, रजोगुण इच्छात्मक असून विषयतृष्णा व विषयासक्ति यांपासून उत्पन्न होतों हे जाण जीवात्म्याला तो कर्माच्या आसक्ती नें बद्ध करतो.

१७ हे भारता, सर्व लोकांना मोहांत पाडणारा तमोगुण हा अज्ञाना पासून उत्पन्न होणारा आहे असें जाण, जीवात्म्याला तो प्रमाद, आळस व निद्रा यांनीं बद्ध करतो.

१८ हे भारता, सत्वगुण हा सुखांत नियुक्त करतो, रजोगुण हा कर्मांत प्रवृत्त करतो, व तमोगुण हा ज्ञानाला झांकून प्रामादांत संयुक्त करतो.

१९ हे अर्जुना, रज व तम यांना पराभूत करून सत्वगुण प्रगट होतो, सत्व व तम यांचा मोड करून रजोगुण व सत्वरजांना जिंकून तमोगुण वर्चस्व करतो.

२० सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्वमित्युत ॥
११।१४ अ.

२१ लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥
१२/१४ अ,

२२ अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।
तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥
१३।१४ अ

२३ यदा सत्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।
तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥
१४/१४ अ

२४ रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥
१५।१४ अ.

---

२० या देहांत सर्व इंद्रियांत जेव्हां चेतना व विवेक उत्पन्न होतात तेव्हां सत्वगुण वाढला आहे असें समजावें,

२१ हे भारतश्रेष्टा, रजोगुणाची वृद्धि झाली असतां, लोभ, कर्मप्रवृत्ति, सकाम कर्मांचा आरंभ, अशांति व विषयाची लालसा ही उत्पन्न होतात,

२२ हे कुरूनंदना, तमोगुण वाढला म्हणजे अज्ञान, कर्तव्यामध्यें अप्रवृत्ति प्रमाद आणि मोह ही उत्पन्न होतात.

२३ जेव्हां सत्वगुणाच्या वृद्धीमध्यें जीव मरण पावतो, तेव्हां उत्तम कर्में करणाऱ्यांच्या निर्मळ अशा स्वर्गादि लोकाना तो प्राप्त होतो.

२४ रजो गुणाच्या उत्कर्षांत मरण आलें तर कर्मासक्त मनुष्यलोकात त्याचा जन्म होतो, आणि तमोगुणांत मृत्यु आला तर पश्वादि मूढ योनींत जन्म होतो.

२५ कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखं अज्ञानं तमसः फलम् ॥
१६।१४ अ

२६ सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवजोऽज्ञानमेव च ॥
१७।१४ अ.

२७ ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥
१८।१४ अ.

२८ ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥
१२।७ अ,

२९ न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥
४०।१८ अ.

---

२५ पुण्यकर्माचें फळ सत्विक व निर्मळ असें सांगीतलें आहे. तसेच राजस कर्माचें मूळ दुःख व तामस कर्माचें फळ अज्ञान ( सांगितलेलें आहे. )

२६ सत्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होते; रजोगुणापासून लोभ व तमोगुणा पासून प्रमाद, मोह व अज्ञान हीं उत्पन्न होतात

२७ सात्विक पुरुष ऊर्ध्व – स्वर्गादि लोकांस जातात; राजस लोक मनुष्यलोकीं राहतात; निकृष्ट गुणाच्या वृत्तींत राहणारे तामस लोक अधोगतीस जातात.

२८ सात्विक, राजस, तामस. भाव हे सर्व माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत असें समज; ते माझ्यांत आहेत, मी त्यांच्यांत नाहीं.

२९ प्रकृतीच्या या तीन गुणांनी रहित असा पदार्थ किंवा प्राणि या पृथ्वीवर, आकाशांत किंवा देव लोकांतही नांहीं.

३० त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ।

१३।७ अ,

३१ दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरंति ते ॥

१४।७ अ,

३२ नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥

१९।१४ अ.

३३ गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ।

२०।१४ अ.

३४ इच्छाद्वेष समुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वं भूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥

२७।७ अ.

---

३० या त्रिगुणात्मक भावांनीं भुलून गेलेलें हें सर्व जग, त्याच्या पलीकडे असणारा अविनाशी असा जो मी त्याला जाणत नाहीं.

३१ कारण माझी हीं अलौकिक त्रिगुणात्मक माया मोठी दुस्तर आहे, जे मलाच शरण येतात तेच भु माया तरून जातात.

३२ गुणांखेरीज दुसरा कोणी कर्ता नाहीं, असें जेव्हां ज्ञानी समजतो आणि गुणांच्या पलीकडचे तत्व ओळखतो तेव्हां तो माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो.

३३ देहाच्या उत्पत्तीला कारणीभूत अशा या तीन गुणांचें पलीकडे जाऊन जन्म मृत्यु जरा दुःखांपासून मुक्त होऊन जीवात्मा परमानंद उपभोगतो.

३४ हे परंतपा भारता, इच्छा व द्वेश यां पासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांच्या द्वंद्वांच्या मोहानें सर्व भूतें या सृष्टींत भ्रम पावतात,

३५ येषांत्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
तें द्वन्द्व मोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥
२८।७ अ.

३६ ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानिकर्षति ॥
७।१५ अ.

३७ शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥
८।१५ अ.

३८ श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवतें ॥
९।१५ अ,

३९ उत्क्रामन्तं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।
विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥
१०।१५ अ,

---

३५ पण पुण्यकर्मांनीं ज्या लोकांचे पाप संपलेले असतें, ते द्वंद्व मोहांतून मुक्त होऊन दृढ निश्चयानें मला भजतात.

३६ या देहांत जीवात्मा माझाच सनातन अंश आहे. प्रकृतींत असलेली मनादि सहा इंद्रियें ( मन व ज्ञानेंद्रिये ) यांत तो आकर्षण करतो,

३७ जेव्हां जीव शरीर धारण करतो किंवा शरीरांतून निघून जातो. तेव्हां वारा जरा सुगंध घेऊन जातो तसा तो मन व इंद्रियें बरोबर घेऊन जातो.

३८ कान, नेत्र, त्वचा, जीभ व नाक, आणि मन यांचा आश्रय करून हा ( जीव ) विषयांचा उपभोग घेतो,

३९ शरीर सोडून जातांना, किंवा शरीरांत असतांना, गुणांनी युक्त असतां किंवा विषय भोग घेत असतां या जीवाला मूर्ख लोक जाणत नाहींत, ज्ञानीं मात्र यथार्थपणें जाणतात.

४० य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥
२३।१३ अ.

४१ इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥
१८/१३ अ

अर्जुन उवाच –

४२ कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥
२१।१४ अ.

श्रीभगवानुवाच –

४३ प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥
२२/१४ अ,

४४ उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणावर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥
२३।१४ अ.

---

४० या प्रमाणें पुरूषाला व गुणांसह प्रकृतीला जो तत्वतः जाणतो, तो सर्व प्रकारें कर्म करीत असला तरी पुनः जन्माला येत नाही.

४१ या प्रमाणें क्षेत्र, ज्ञान व ज्ञेय म्हणजे काय हें थोडक्यांत सांगितलें, माझा भक्त हें तत्वतः जाणून माझ्या स्वरूपाला पोचतो,

**अर्जुन म्हणाला,** ४२ हे प्रभो, या त्रिगुणांना उल्लंघून गेलेला पुरूष कोणत्या लक्षणांनीं युक्त असतो, ! त्याचें आचरण कसें असते व तो या तीन गुणांचें अतिक्रमण कसेंकरतो,

४३, ४४, ४५, श्रीभगवान म्हणाले– सत्व गुणाचे कार्य प्रकाश, रजोगुणाचे कार्य प्रवृत्ति व तमोगुणाचे कार्य मोह, ही प्राप्त झाली असता जो विषाद मानत नाहीं, व निवृत्त झालीं असतां इच्छा करीत नाही,

४५ समदुःख सुखः स्वस्थः सम लोष्टाश्मकांचनः ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥
२४।१४ अ.

४६ मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।
सर्वारंभ परित्यागी गुणातीतः स उच्यते ॥
२५/१४ अ.

४७ मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्म भूयाय कल्पतें ॥
२६।१४ अ.

---

तसेंच जो उदासीन–साक्षिरूप, राहून गुणामुळें विचलित होत नाहीं. गुणच आपापली कामें करीत आहेत असें मानून परमात्म्याचे ठिकाणीं ऐक्य भावानें स्थिर असतो, व या स्थिती पासून जो चळत नाहीं, तसेंच सुख दुःख ज्याला समान, जो आत्मनिष्ठ, माती, दगड व सोने ही ज्याला सारखी प्रिय व अप्रिल ज्याला समान, धैर्याचा जो पुरा, स्तुति व निंदा ज्याना सारखी वाटतें,

४६ जो मान व अपमान यांत सम, तसाच मित्र व शत्रू यांतही सम राहतो, व सर्व कर्मात जो कतृत्वाभिमानाचा त्याग करतो, त्या पुरुषास " गुणातित " म्हणतात,

४७ तसेंच जो पुरुष एकनिष्ट भक्ती योगानें मला भजतो, तो या तिन्ही गुणांना पूर्णपणें उल्लंघून ब्रम्हाला प्राप्त होण्याला योग्य होतो,



# अध्याय ७ वा.

## दैवासुरसंपद्विभाग योग.



मानवांमध्यें चांगले व वाईट असें दोन प्रकार दिसून येतात, त्याचें वर्णन या अध्यायांत आलेले आहे, हा एक तऱ्हेनें प्रकृति गुणधर्मच आहे. म्हणून मागच्या अध्यायाचाच विषय यांत विस्तारपूर्वक सांगितला आहे.



# अध्याय ७ वा.

## दैवासुरसंपद्विभाग योग.



श्रीभगवानुवाच

१ भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥
१।१० अ.

२ अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥
१।१६ अ.

३ अहिंसासत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दयाभूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं हीर चापलम् ॥
२।१६ अ.

४ तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥
३।१६ अ.

---

**श्रीभगवान् म्हणाले** — १ हे पराक्रमी अर्जूना, पुनः आणखी एक माझें श्रेष्ट वचन ऐक. माझा उपदेश ऐकून संतोष पावणाऱ्या तुला तें मी तुझ्या हितासाठीं सांगत आहे,

२ निर्भयता, सात्विकवृत्ति, आत्मज्ञान, पायांत दृढनिष्टा, दान, इंद्रिय निग्रह, यज्ञ, स्वाध्याय, तप, सरलता,

३ अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांति, निंदा न करणें भूतमात्रावर दया, निर्लोभता, कोमलता, लाज, विमेपणा,

४ तेजस्विता, क्षमा, धैर्य, शुचिर्भूतपणा, दुसऱ्याचा द्वेष न करणें, दुरभिमान नसणें, असे हे सद्गुण, हे अर्जूना, दैवी संपत्तीने जन्मलेल्याच्या अंगीं असत.

५ दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारूष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥
४।१६ अ.

६ दैवीसंपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥
५/१६ अ.

७ द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एवच ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे श्रृणु ॥
६।१६ अ.

८ प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥
७/१६ अ.

९ असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥
८।१६ अ.

---

५ दंभ, घमेंड, अभिमान, क्रोध, निष्ठुरपणा, व अज्ञान हे गुण आसुरी संपत्ति, घेऊन जन्मलेल्यांच्या अंगीं असतात.

६ दैवी संपत्ति ही मोक्षदायक व आसुरी संपत्ति बंधन कारक मानवी आहे. हे पांडवा, तू शोक करू नकोस, तू दैवी संपत्तींत जन्मला आहेस.

७ हे पार्था, या लोकीं दैवी आसुरी असे दोन प्रकारचे प्राणि उत्पन्न होतात. दैवी प्रकार तुला विस्तार पूर्वक मागें सांगितला, आतां आसुरी प्रकार मज कडून ऐक.

८ काय करावें, व काय करू नये, हे आसुरी लोकांना कळत नाहीं त्यांच्या ठिकाणीं पावित्र्य, सदाचार आणि सत्य हीं नसतात.

९ ते म्हणतात, कीं, जग असत्य, निराधार, ईश्वर रहित, कार्य कारण संबंधावाचून निर्माण झालेलें, चैन बाजी करतां उत्पन्न झालेलें आहे दूसरें काय ?

१० एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धय: ।
प्रभवन्त्युग्रकर्माण: क्षयाय जगतोऽहिता: ॥
९।१६ अ.

११ काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विता: ।
मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रता: ॥
१०/१६ अ.

१२ चिंतामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिता: ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिता: ॥
११/१६ अ.

१३ आशापाशशतैर्बद्धा: कामक्रोधपरायणा: ।
ईहन्ते काम भोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥
१२।१६ अ.

१४ इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥
१३।१६ अ.

---

१० या विचारसरणीचा आश्रय करून हे नष्टात्मे, आत्मबुद्धि, क्रूर कर्मी घातकी असे जगाच्या नाशा करतां उत्पन्न होतात.

११ हे लोक अनिवार विषय कामनांचा आश्रय करून, दंभ, अभिमान व मद यांनीं युक्त होऊन, मोहाने मिथ्यासिद्धांतवरून अमंगल व्रतें आचरण्यास प्रवृत्त होतात.

१२ तसेंच, आमरणांत अपरिमित चिंता वाहणारे, कामोपभोगांत दंग झालेले, आणि जगांत हेच इतिकर्त असे निश्चित समजणारे,

१३ शेंकडो आशापाशानों बद्ध झालेले, कामक्रोधाधीन झालेले, असे हे लोक इच्छित भोगासाठीं अन्यायानें द्रव्य संचय करण्याची इच्छा करतात.

१४ आज मी हें मिळविले ( उद्या ) हा माझा मनोरथ पूर्ण होईल, इतके द्रव्य मज जवळ आहे, आणखी दुसरेहीं माझेच होईल.

१५ असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥
१४।१६ अ.

१६ आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योस्ति सदृशोमया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिता: ॥
१५/१६ अ.

१७ अनेकचित्तविभ्रांन्ता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥
१६।१६ अ.

१८ आत्मसंभाविता: स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजंते नाम यज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥
१७।१६ अ.

१९ अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥
१८।१६ अ.

---

१५ हा शत्रू मी मारला. दुसऱ्याही शत्रूंना मी मारीन; मी सत्ताधीश, मी सर्व सुखें भोगणारा, मीच सिद्ध बलाढ्य व सुखी,

१६ मी श्रीमंत व कुलवान आहे. माझ्या सारखा दुसरा कोण आहे ? मी यज्ञ करीन. दान देईन व चैन करीन अशा अज्ञानानें मोहित झालेले,

१७ नाना प्रकारच्या कल्पनानीं भ्रम पावलेले, मोहजाळांत गुरफटलेले, व कामभोगांत आसक्त झालेलें हे लोक अमंगल नरकांत पडतात.

१८ स्वत:ची बढाई मारणारे, गर्वानें तांठरलेले, धन व मान यांनीं मदोन्मत्त झालेलें हे लोक शास्त्र विधि सोडून दांभिकपणें नामधारी यज्ञ करतात.

१९ अहंकार, बल, गर्व, काम व क्रोध यांचा आश्रय करणारे, स्वत: च्या व इतरांच्या देहांत वास करणाऱ्या मला न जाणता सर्वांचा द्वेष व निंदा करणारे असे होतात.

२० तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥
१९।१६ अ.

२१ आसुरीं योनिमापन्ना मूढाजन्मनि जन्मनि ।
मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥
२०।१६ अ.

२२ न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥
१५।७ अ,

२३ अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥
११।९ अ.

२४ मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥
१२/९ अ,

---

२० त्या ईश्वरद्रोही, क्रूर व पापी नराधमांना मी वारंवार आसुरी योनींतच टाकीत असतो

२१ हे कौंतेया, असुरी कोटीला प्राप्त झालेले ते मूर्ख लोक, जन्मोजन्मीं माझी प्राप्ति न झाल्यामुळे नंतर जास्तच अधोगतीला जातात.

२२ मायेनें ज्यांचे ज्ञान नष्ट झाले आहे, आसुरी भावाचा ज्यांनीं आश्रय केला आहे, असें दुष्कर्मी मूढ नराधम लोक मला शरण येत नाहींत.

२३ मी सर्व भूतांचा महेश्वर आहे, असें माझे श्रेष्ट स्वरूप न जाणणारे मूर्ख लोक, मानवी देह धारण करणारा जो मी त्या माझी अवज्ञा करतात,

२४ तें विवेक शून्य पुरूष मोह पाडणाऱ्या राक्षसी व आसुरी प्रकृतीचा आश्रय करून वागतात, म्हणून त्यांच्या सर्व आशा, सर्व कर्में, व ज्ञान, ही सर्व फुकट जातात.

२५ महात्मानस्तु मां पार्थ दैवी प्राकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥
१३।९ अ.

२६ सततं कीर्तयंतो मां यतन्तश्च दृढव्रताः ।
नमस्यन्तंतश्च मां भक्त्या नित्य युक्ता उपासते ॥
१४।९ अ,

---

२५ परंतु हे पार्था, दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले महात्मे लोक मी भूतांचे आदिस्थान व अव्यय आहे असें जाणून अनन्य भावानें मला भजतात,

२६ दृढव्रत व नित्ययुक्त होत्साते माझ्या प्राप्ती साठीं यत्न करणारे असे ते, सर्वकाळ माझे गुणनामकीर्तन व वंदन करीत माझी उपासना करीत असतात.



# अध्याय ८ वा.

## अधर्मवृत्ती योग.



मागील अध्यायांत दैवी व आसुरी अशा दोन तऱ्हेचे लोक सांगितले, तें लोक असें कां होतात, माणसाला पापप्रवृत्ति कां होते असा अर्जुनाला प्रश्न उत्पन्न झाला तेव्हां त्याचें उतर या अध्यायांत दिलेले आहे. मनुष्याला दिलेल्या बुद्धि तत्वांचा जर दुरूपयोग होऊन मनुष्य अशास्त्रविहित मार्गांने इंद्रियांत रमून कर्म करूं लागला तर पापवृत्तीची वाढ होऊं लागते म्हणून नेहमीं शास्त्रविहित मार्गानें आचरण ठेवावे हा या अध्यायांत निर्वाण दिलेला आहे, बुद्धितत्व हे एक प्रकारचें साधन आहे व शस्त्राप्रमाणें त्याचा चांगला किंवा वाईट उपयोग करण्याचें मनुष्याला पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्या स्वातत्र्याचा दुरूपयोग करून आत्मघातकी होऊं नये हा या अध्यायाचा हेतु आहे.



# अध्याय ८ वा.

## अधर्मवृत्ती योग.



अर्जुनउवाच -

१ अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरूषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥
३६।३ अ.

श्रीभगवानुवाच -

२ काम एव क्रोध एष रजोगुण समुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥
३७।३ अ.

३ धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥
३८।३ अ.

४ आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥
३९।३ अ.

---

**अर्जुन म्हणाला** - १ हे श्रीकृष्णा, इच्छा नसतांनाही बलात्कार केल्या प्रमाणें मनुष्य पाप करतो, तें कोणाच्या प्रेरणेंने ?

**श्रीभगवान म्हणाले** - २ रजोगुणापासून उत्पन्न झालेला, जो महाखादाड, जो अत्यंत पापकर्मी असा हा काम व असाच हा क्रोध या लोकीं मोठा वैरी आहे असें समज.

३ ज्याप्रमाणें धुरानें अग्नि व धुळींनें आरसा झांकला जातो, किंवा गर्भवारेनें वेष्टिलेला असतो, त्याप्रमाणे त्या कामानें हें ज्ञान झाकून टाकले आहे,

४ हे कौतेया, सदा अतृप्त अग्निसारखा, व ज्ञान्यांचा नित्य वैरी असा हा काम; यानें ज्ञान झांकून टाकिले आहे.

५ इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यतें ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥
४०।३ अ,

६ ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
संगात्संजायतेकामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥
६२।२ अ.

७ क्रोधाभ्दवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्‌बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥
६३।२ अ,

८ इंद्रियस्येंद्रियस्यार्थें रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेंत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥
३४।३ अ.

९ श्रेयान्स्वधर्मोविगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥
३५।३ अ,

---

५ इंद्रियें, मन व बुद्धि हीं यावें अधिष्टान समजलें जाते; यांच्या द्वारांनीं हा ज्ञानाला झांकून जोवात्म्याला मोहांत पाडतो.

६ विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरूषांच्या ठिकाणीं त्या विषयांविषयीं सग आवड निर्माण होते; त्या आवडीपासून कामइच्छा अथवा वासना उत्पन्न होते. कामापासून ( प्रतिबंध झाला असतां ) क्रोध उत्पन्न होतो,

७ क्रोधापासून संमोह अविवेक, समोहापासून स्मृतिभ्रम, स्मृतिभ्रमापासून बुद्धिनाश व बुद्धिनाश झाला म्हणजे सर्वनाश होतो.

८ इंद्रियांचो विषयांविषयीं आवड निवड हो निसर्ग सिद्ध असते; त्या दोह्वोच्या आधिन होऊं नये; कारण रागद्वेष हे त्यांच्या कल्याण मार्गातील मोठें शत्रु आहेत.

९ उत्तमरीतीनें आचरतां येणाऱ्या इद्रिय धर्मापेक्षां न्यूनतेनेंही आत्म धर्मच अधिक श्रेयस्कर असतो ( देहबुद्धीपेक्षा आत्मबुद्धी श्रेयस्कर ) आत्मबुद्धीनें वागतांना मरणही कल्याणकारक असते, पण देंहबुद्धि भयावह होतें,

१० ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव तें ।
आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥
२२।५ अ.

११ मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्ण सुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥
१४।२ अ.

१२ यं हि न व्यथयन्त्येते पुरूषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥
१५।२ अ.

१३ या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रती भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥
६९।२ अ.

१४ आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांन्तिमाप्नोति न कामकामी ॥
७०।२ अ.

---

१० विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून उत्पन्न होणारे भोग दुःख मूल च होत. हे कौंतेया, त्यांना उत्पत्ति व नाश असल्यामुळें ज्ञानी त्यांत रमत नाही.

११ हे कौंतेया, शीत–उष्ण व सुख दुःख देणारे, इंद्रिय व विषय यांचें संयोग यांना उत्पति व नाश हीं आहेत, म्हणून ते अनित्य आहेत, भारता, ते सहन कर.

१२ हे पुरूष श्रेष्ठा, सुख दुःख समान मानणाऱ्या ज्या ज्ञानी पुरूषाला हे ( संयोग ) पीडा देत नाहींत, तोच मोक्षाला योग्य होतो,

१३ सर्व लोकांनां जी रात्र वाटते, तेथें ( आत्मरूयांत ) संयमी पुरूष जागत असतो; आणि जेथे ( संसारात ) प्राणिमात्र जागृत असतो तेथें ज्ञान्याला रात्र भासते.

१४ त्या निसर्गतः जलपूर्ण असलेल्या समुद्रांत सर्वत्र नद्या पाणी आणून ओततांना हीं ज्या प्रमाणें तो मर्यादा न सोडतां अचल राहतो त्या प्रमाणें सर्व भोगांचा प्रवेश होत असतां जो विकार पावत नाहीं, त्यालाच शांति मिळते, भोगाची इच्छा करणाराला ती मिळत नाहीं.

१५ विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥
७१/२ अ.

१६ तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥
४१।३ अ.

१७ इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्योबुद्धेः परतस्तु सः ॥
४२।३ अ

१८ एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥
४३।३ अ.

१९ शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥
२३।५ अ.

---

१५ सर्व कामना सोडून जो मनुष्य निःस्पृह होऊन वागतो, ज्याला ममत्व व अहंकार नसतो, त्यालाच शांति मिळत असतें,

१६ म्हणून हे भरत श्रेष्ठा, तूं आधीं इंद्रियांना वशकरून घेऊन, ज्ञान व विज्ञान यांचा नाश करणाऱ्या या कामाचा नाश कर.

१७ विषयांपेक्षां इंद्रियें श्रेष्ठ, इंद्रियां पेक्षां मन श्रेष्ठ, मना पेक्षां बुद्धि श्रेष्ठ आणि जो बुद्धि पेक्षां ही श्रेष्ठ तो आत्मा, असे म्हणतात.

१८ हे पराक्रमी अर्जुना, या प्रमाणें बुद्धीहून श्रेष्ठ, व पलीकडे असलेल्या आत्म्याला जाणून देहबुद्धीला आत्मबुद्धीनें आवरून अजिंक्य काम शत्रूला ठार कर.

१९ जो या लोकीं, देहपाता पूर्वी काम क्रोधांचा वेग सहन करण्यास समर्थ होतो तोच खरा योगी व तोच खरा सुखी होय,

२० योऽन्तः सुखोऽन्तरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥
२४।५ अ.

२१ लभंते ब्रह्मनिर्वांणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥
२५/५ अ,

२२ कामक्रोध वियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्म निर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥
२६।५ अ,

२३ यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छा भयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥
२८।५ अ.

२४ स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥
२७।५ अ.

---

२० आत्मसुख हेंच ज्याचें सुख, आत्मानंदांत ज्याला विश्रांति व आत्म प्रकाश हाच ज्याचा प्रकाश, असा ब्रम्हस्वरूप योगी ब्रम्हांत निर्वाण पावले.

२१ ज्यांचीं सर्व पापें नष्ट झाली आहेत, सर्व संशय दूर झालें आहेत, अशा आत्मसंयमी व सर्व भूतांच्या हितांत रत झालेल्या ऋषींना मोक्ष ब्रम्हानंद - लाभतो.

२२ कामक्रोधरहित, आत्मसंयमी व आत्मज्ञानसंपन्न अशा यतींना ब्रम्हनिर्वाण—मोक्ष—ब्रम्हानंद सदा सन्निधच असतो,

२३. २४, बाह्य विषय बाहेरच ठेऊन दृष्टि भ्रू मध्यांत स्थिर करून, नाकांतून वाहणाऱ्या प्राण व अपान वायूचा गति सम करून, ज्यानें इंद्रियें मन व बुद्धी यांचे संयमन केलें, मोक्षपरायण होऊन ज्यानें इच्छा भय व क्रोध ही सोडून दिलीं, असा मुनि सदा मुक्तच असतो.

२५ त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
काम:क्रोधस्तथालोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥
२१/१६ अ.

२६ एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परांगतिम् ॥
२२।१६ अ

२७ यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥
२३/१६ अ.

२८ तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्मकर्तुमिहार्हसि ॥
२४।१६ अ.

---

२५ काम, क्रोध व लोभ हीं जीवात्म्याचा नाश करणारीं नरकाची तीन द्वारें आहेत, म्हणून या त्रयीचा त्याग करावा.

२६ हे कौंतेय, या तीन्ही नरकव्दारांपासून मुक्त झालेला पुरूष आपल्या कल्याणाचें आचरण करतो आणि त्यायोगें तो , परम गतीला पावतो,

२७ जो शास्त्रविधि सोडून काम प्रेरित होऊन आपल्या इच्छेप्रमाणें वागतो त्याला सिद्धि मिळत नाहीं, सुखनाहीं आणि उत्तम गतीही नाहीं,

२८ म्हणून तुला कर्तव्य व अकर्तव्य यांचा निर्णय घेताना शास्त्र हेच प्रमाण आहे' शास्त्रांत जें काय सांगितलें आहे तें समजून तदनुसार कर्म करणें या लोकीं तुला योग्य आहे,



# अध्याय १ वा.

## श्रद्धात्रय विभाग योग.



सत्व, रज व तम हे त्रिगुण श्रद्धेमध्ये ही दिसून येतात व त्यामुळे यज्ञ, दान, तप इत्यादि कर्मातही श्रद्धानुरूप त्रिगुणांचा समावेश होऊं शकतो, हा या अध्यायाचा विषय आहे. मनुष्याची श्रद्धा त्रिगुणात्मक असल्याकारणाने तिचा भरंवसा न धरतां सशास्त्र कर्म केले पाहिजे व त्याकरतां, आप्तस्तु यथार्थवक्ता, या व्याख्ये प्रमाणें कर्मात आप्तवाक्यच प्रमाण मानलें पाहिजे हा या अध्यायाचा मुख्य हेतु आहे, त्रिगुणात्मक श्रद्धा ही अपरा श्रद्धा असते म्हणून परा श्रद्धायुक्त ब्रह्मनिष्ठ नित्ययुक्त असा ज्ञानी पुरुषच आप्तवाक्य प्रामाण्याला लायक ठरतो व त्याच्याच वाक्यानें मनुष्याची अपरा श्रद्धा पराकोटीला पोंचुं शकते. परा श्रद्धेनें केलेले कर्मच ब्रह्मरुप होऊं शकेल व मगच मनुष्य खरा बुद्धिमान् ठरून अकर्ता होईल, व पराभक्तीच्या कसोटीला उतरेल.



# अध्याय १ वा.

## श्रद्धात्रय विभाग योग.



श्री अर्जुनउवाच –

१ ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ।
तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहोरजस्तमः ॥
१।१७ अ.

श्रीभगवानुवाच –

२ त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां श्रृणु ॥
२।१७ अ.

३ सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरूषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥
३/१७ अ.

४ यजंते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥
४/१७ अ.

---

**अर्जुन म्हणाला** – १ हे कृष्णा, शास्त्रविधिसोडून पण श्रद्धापूर्वक जे यज्ञ करतात, त्यांची निष्ठा कोणती ? सात्विक. राजस कीं तामस ?

**श्रीभगवान् म्हणाले** -- २ मनुष्याची श्रद्धा त्यांच्या स्वभावाप्रमाणें, सात्त्विक, राजस, व तामस अशीं तीन प्रकारची असते, ती तूं ऐक.

३ सर्वांची श्रद्धा त्यांच्या प्रकृति धर्मांप्रमाणें असते जीव हा श्रद्धामय आहे जशी ज्याची श्रद्धा तसा तो होतो.

४ सात्विक लोक देवाची उपासना करतात, राजस लोक यक्ष–राक्षसांची, आणि तामस लोक प्रेते व भूतगण यांची आराधना करतात,

५ अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।
दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥
५।१७ अ

६ कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवांतः शरीरस्थं तान्विद्ध्या सुरनिश्चयान् ॥
६।१७ अ,

७ आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवतिप्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥
७।१७ अ.

८ आयुः सत्त्वबलारोग्य सुखप्रीति विवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥
८।१७ अ,

९ कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरुक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥
९।१७ अ.

---

५, ६, जे लोक शास्त्र विरुद्धघोर तप करतात, दंभ व अहंकार यांनीं युक्त होऊन, कामना, आसक्ति आणि बलाचा गर्व धरतात, शरीरांतील पंचभूतांच्या समुदायाला व अंतर्यामी असणाऱ्या मलाहो कष्ट देतात, ते लोक आसुरी बुद्धीचे होत असे समज.

७ सर्वांच्या आवडीचा आहारहीं त्रिविध असतो; यज्ञ, तप व दान यांचेही तीन प्रकार आहेत, त्यांचे हे भेद तूं ऐक.

८ आयुष्य, वृद्धि, बल, आरोग्य, सुख व प्रीति यांना वाढविणारे, रसयुक्त स्निग्ध, पौष्टिक व मनाला आनंददायक असें आहार सात्त्विकाला प्रिय असवात.

९ तिखट, आंबट, खारट, अतिउष्ण, तीक्ष्ण, रुक्ष, दाहकारक असेंच दुःख शोक व रोग यांना उत्पन्न करणारे आहार राजसांना प्रिय असतात.

१० यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ।।
१०।१७ अ,

११ अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ।।
११/१७ अ,

१२ अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ।।
१२।१७ अ.

१३ विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ।।
१३।१७ अ,

१४ देवद्विजगुरु प्राज्ञ पूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ।।
१४।१७ अ.

---

१० शिजान्यावर प्रहरउलटून गेलेले. रसरहित, दुर्गंधी, शिळे, उष्टें व मद्यमांसांनियुक्त असे अपवित्र अन्न तामसांना प्रिय असते,

११ फलेच्छाटाकून, मनाचे समाधान ठेऊन व कर्तव्य म्हणून शास्त्राविधीनें केलेला यज्ञ तो सात्त्विक होय.

१२ पण भरत श्रेष्ठा, मुलांची आशा धरून किंवा दंभासाठीं जो यज्ञ केला जातो, तो राजस होय असे जाण.

१३ शास्त्रविधोला सोडून, अन्नदानरहित, मंत्ररहित, दक्षिणा न देतां श्रद्धा नसतां केलेला जो यज्ञ त्यास तामस म्हणतात.

१४ देव, द्विज, गुरू व विद्वान् यांचें पूजन, शुचिर्भूतपणा. सरलता, ब्रम्हचर्य व अहिंसा याला कायिक तप म्हणतात.

१५ अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥
१५।१७ अ.

१६ मनः प्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥
१६।१७ अ.

१७ श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥
१७/१७ अ.

१८ सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥
१८।१७ अ.

१९ मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥
१९।१७ अ.

---

१५ कोणाच्याही मनाला न टोंचणारे, सत्य, प्रिय व हितकारक असे भाषण तसेंच वेद शास्त्रांचे अध्ययन व नामजपांचा अभ्यास याला वाचिक तप म्हणतात.

१६ मनाचीं प्रसन्नता, सौम्यत्व ( शांति ) , मौन, आत्मनिग्रह, शुद्ध भावना याला मानसिक तप म्हणतात,

१७ फलाचीं आशा न धरतां परमश्रद्धेनें निष्काम योगी पुरूषांनीं आचरिलेले हे त्रिविध तप ‘ सत्त्विक तप ’ म्हणतात.

१८ सत्कार, मान व पूजा होण्यासाठीं केलेले किंवा दांभिकपणानें आचरिलेलें, अनिश्चित व क्षणिकफल देणारे तप ‘ राजसतप’ म्हणतात,

१९ दुराग्रहांनें स्वतःला पीडा, कलंक, किंवा दुसऱ्याचा नाश करण्यासाठीं केलेलें तप, ‘ तामस तप ’ म्हणतात.

२० दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥
२०।१७ अ,

२१ यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥
२१।१७ अ.

२२ अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥
२२।१७ अ.

२३ ॐ तत्सदिति निर्देशो ब्रम्हणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥
२३।१७ अ.

२४ तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपः क्रियाः ।
प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥
२४।१७ अ.

---

२० कर्तव्यबुद्धीनें देश, काल व पात्र पाहून, आपल्यावर उपकार न केलेल्याला जें दान दिले जाते, त्याला ' सात्त्विक दान ' म्हणतात.

२१ प्रत्युपकाराच्या इच्छेनें किंवा फलांची आशा धरून व कष्टांनें दिलेले दान ' राजस दान ' होय.

२२ अयोग्य स्थळीं, अयोग्य काळीं व अपात्रीं, सत्कार केल्या वांचून अवहेलना करून दिलेले दान ' तामस दान ' होय.

२३ ब्रम्हाचा ॐ तत् सत् असा तीन प्रकारचा निर्देश केला जातो. या नामत्रयीनेंच पूर्वी ब्राम्हण, वेद व यज्ञ निर्माण केले आहेत.

२४ म्हणून ब्रम्हवादी लोकांचीं यज्ञ दान तपादि शास्त्रोक्त कर्मे सर्वदा ' ॐ ' असा उच्चार करून सुरू होतात.

२५ तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपः क्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः ॥
२५।१७ अ,

२६ सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्द पार्थ युज्यते ॥
२६।१७ अ,

२७ यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥
२७।१७ अ.

२८ अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥
२८।१७ अ.

२९ अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥
३/९ अ.

---

२५ मोक्षार्थी लोकांकडून फलांची आशा न ठेवतां यज्ञदानतपादि कर्में, 'तत्' या निर्देशानें - तत् असे म्हणून केली जातात.

२६ हे अर्जुना, 'सत्' हा शब्द सत्यभाव किंवा आस्तिक भाव आणि 'साधु भाव' - चांगलीं भावना या अर्थी योजला जातो. तसेच चांगल्या कर्मांसही हा 'सत्' शब्द लावण्यांत येतो,

२७ यज्ञ, दान व तप यांचे टिकाणीं जी निष्ठा तिलाही 'सत्' असें म्हणतात; आणि परमात्म्यासाठी ( तत् नामानें संबोधिला जाणारा परमात्मा ) केलेलें जें कर्म त्यालाही "सत्" असेंच म्हणतात.

२८ हे पार्था, श्रद्धेवांचून केलेला यज्ञ, दान, तप किंवा कोणतेही कर्म 'असत्' म्हटले जातें. परलोकाच्या उपयोगी पडत नाही व दूर लोकांतही उपयोगी पडत नाहीं

२९ अर्जुना या तत्वज्ञानरूप धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरूष मला येऊन न मिळतां जन्ममरणसंसार मार्गांत पुनः पुनः येरझारा घालीत असतात.

# अध्याय १० वा.

## नानाविध उपासना योग.



मागील अध्यायाचें शेवटीं सत्त्वगुणप्रधान कर्म करण्याचा उपदेश अर्जुनाला केला; उपासना करतांनाही हाच नियम ध्यानांत ठेवावा व तदनुसार उपासना करावी असें सुचवून या अध्यायांत लोक कोणकोणत्या तऱ्हेनें उपासना करीत असतात हें सांगितलें आहे. उपासनेचे सर्व प्रकार दाखवून शेवटीं ज्ञानोपासना श्रेष्ट ठरविली आहे. कारण सर्व दैवी उपासना, जरी सत्त्वप्रधान असल्यामुळें सात्त्विक ठरतात तरी आत्यंतिक सत्त्वस्थ वृत्ति आत्म्याच्या उपासनेंतच होऊं शकते, म्हणून ज्ञान यज्ञच म्हणजे नामस्मरण श्रेष्ठ असा अभिप्राय अखेरीला श्री कृष्णांनीं व्यक्त केला आहे.



# अध्याय १० वा.

## नानाविध उपासना योग.



श्रीभगवानुवाच –

१ चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥
१६।७ अ.

२ तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥
१७।७ अ.

३ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥
११।४ अ.

४ कांक्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥
१२।४ अ.

---

**श्रीभगवान् म्हणतात** – १ हे भरतश्रेष्ठा पुण्यकर्मे करणारे असे आर्त (दुःखग्रस्त), जिज्ञासु (ज्ञान मिळवू ईच्छिणारा), अर्थार्थी (धनेच्छु) व ज्ञानी (तत्वज्ञ) असे चार प्रकारचे लोक मला भजतात.

२ यांत मत्पराय व अनन्य भक्ति असलेला ज्ञानी श्रेष्ठ होय. कारण ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय व तो ज्ञानीही मला अत्यंत प्रिय असतो.

३ हे पार्था, जे ज्या हेतुनें मला भजतात त्यांना तसेंच फळ मी देतो. लोक सर्व प्रकारें माझ्याच मार्गाचें अनुकरण करतात.

४ कर्म फळांची इच्छा करणारे लोक या लोकीं अन्य देवतांची पूजा करतात; कारण या मनुष्यलोकीं कर्मांची सिद्धि लवकर प्राप्त होते,

५ कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥
२०।७ अ

६ यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ।
२१।७ अ.

७ स तया श्रद्धया युक्तस्तस्या राधनमीहते ।
लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥
२२।७ अ.

८ अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥
२३।७ अ.

९ त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गति प्रार्थयंते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोक मश्नान्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥
२०/९ अ.

---

५ वेगवेगळ्या कामनांनीं ज्यांचें ज्ञान हरण करून घेतलें आहे असें लोक स्वप्रकृतिवश होऊन भिन्न भिन्न ( उपासनेचे ) नियम पाळून अन्य देवताना भजतात,

६ जो जो सकाम भक्त ज्या ज्या देवतेची श्रध्देनें आराधना करूं इच्छितो त्याची श्रध्दा त्या त्या देवतेच्या ठिकाणीं मी स्थिर करतो.

७ त्या श्रध्देनें युक्त होऊन तो त्या देवतेची आराधना करतो, व मग त्या देवतेकडून मीच निर्मिलेल्या त्या कामनांचीं फळें त्याला मिळतात.

८ पण अशा अल्पबुध्दि लोकांना मिळणारे फळ नाशवंत असतें. देवतांचे भक्त त्या देवतांकडे जातात व माझें भक्त माझ्याकडे येतांत.

९ तिन्ही वेदांप्रमाणें कर्में करणारे, सोमरस पिणारे, पापनाशानें पवित्र असें पुरूष यज्ञांनीं माझें यजन करून स्वर्गाची इच्छा करतात तें पुण्यमय इंद्रलोकास पोचून देवांचे दिव्य भोग भोगतात,

१० तें तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥
२१।९ अ.

११ येऽप्यन्य देवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौन्तेय यजंन्त्यविधिपूर्वकम् ॥
२३।९ अ.

१२ अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।
न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्चवन्ति ते ॥
२४।९ अ.

१३ ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥
१५/९ अ.

१४ अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥
१६/९ अ,

---

१० ते त्या विशाल स्वर्गलोकांचा उपभोग घेऊन पुण्य संपल्यावर मृत्यु लोकांत येतात, या प्रमाणें वेदांतील सकाम कर्माच्या मागें लागलेले, स्वर्ग मृत्यु लोकांच्या वाऱ्या करीत असतात.

११ अन्य देवतांचे भक्तही जे श्रध्दानें उपासना करतात, तेही हे कौंतेया, अविधिपूर्वक माझेंच यजन करींत असतात,

१२ कारण, सर्व यज्ञांचा भोक्ता व स्वामीही मीच आहे; परंतु ते मला तत्वतः जाणत नाहींत म्हणून पतन पावन पावतात.

१३ दुसरे ज्ञानयज्ञानेच यजन करून माझी अभदभावानें उपासना करतात. दसरे कांहीं भेदभावानें देवतारूपांनीं भिन्न समजून तर कांहीं विश्वतोमुखानें एकत्वानें उपासना करतात,

१४ हवन रूपी यज्ञ मी, उपासना रूप यज्ञ मी, पितृयज्ञही मीच वनस्पति मी. मंत्र मी, तूप मी, अग्नि मी व आहुतीही मींच,

१५ दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुव्हति ॥
२५।४ अ.

१६ श्रोत्रादीनिन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुव्हति ।
शद्बादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुव्हति ॥
२६।४ अ.

१७ सर्वाणींन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुव्हति ज्ञानदीपिते ॥
२७।४ अ.

१८ द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥
२८।४ अ.

१९ अपाने जुव्हति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।
प्राणापानगति रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥
२९/४ अ.

---

१५ कांहीं योगी लोक देवपूजारूप यज्ञाचीच चांगली उपासना करतात; तर दुसरे कांहीं योगी ब्रम्हरूप अग्नीत यज्ञानें मज्ञरूप परमेश्वराचें यजन करतात,

१६ कोणी संयमरूप अग्नींत श्रोत्रादि इंद्रियांचा यज्ञ करतात; तर कोणी इंद्रियरूप अग्नींत शद्बादि विषयांचा यज्ञ करतात.

१७ ज्ञानाने प्रदीप्त झालेल्या आत्मनिग्रहरूपी अग्नींत दूसरे कोणी योगी इद्रियांची व प्राणांचीं सर्व कर्मे हवन करतात.

१८ कोणी द्रव्ययज्ञ, कोणी तपोयज्ञ, कोणी योगयज्ञ, कोणी अहिंसादि व्रतानें युक्त होऊन स्वाध्याय यज्ञ व ज्ञान यज्ञ करणारे असें यत्नशील पुरुष आहेत.

१९ प्राणायामतत्पर असलेले कित्येक प्राण व अपान यांचा निरोध करून प्राणाचा अपानांत व अपानाचा प्राणांत होम करतात

२० अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥
३०।४ अ

२१ यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोऽस्त्य यज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥
३१।४ अ,

२२ एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥
३२।४ अ,

२३ श्रेयान्द्रव्यमयात् यज्ञातऽज्ञानयज्ञाः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थं ज्ञानें परिसमाप्यते ॥
३३।४ अ.

२४ उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।
आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥
१८/७ अ,

---

२० दूसरे कोणी आहारनियमित करून प्राणांतच प्राणांचें हवन करतात; हें सर्वही यज्ञ जाणणारे व यज्ञानें आपल्या पापाचा क्षय करून घेणारे होत.

२१ हे कुरूश्रेष्टा, यज्ञशेष प्रसादामृताचे सेवन करणारे सनातन. ब्रम्हाला पावतात; यज्ञ न करणाऱ्याला इह लोक सुखदाइ नाहीं, तर परलोक कोठून होणार ?

२२ या प्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ वेदमुखानें विस्तार पावले आहेत; ते सर्व कर्म जन्य आहेत हे जाण; असे जाणल्यानेच तूं मुक्त होशील.

२३ हे परंतपा अर्जूना, द्रेषमय यज्ञापेक्षा ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ आहे. कारण सर्व कर्माचें पर्यवसान ज्ञानात होत असतें.

२४ हे सर्व ही उत्तमच आहेत, पण त्यांत ज्ञानी तर माझा आत्माच असें मी मानतो; कारण मीच सर्वोत्तम गती मानून त्यानें निरंतर माझाच आश्रय केलेला असतो.

२५ भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥
२९।५ अ.

२६ यान्ति देवव्रता देवान्पितॄन्यान्ति पितृव्रताः ।
भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपिमाम् ॥
२५।९ अ,

२७ यं यं वापि स्मरन्भाव त्यजत्यन्ते कलेवरम् ।
तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥
६।८ अ.

२८ आब्रह्म भुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपत्य तु कौतेंय पूनर्जन्म न विद्यते ॥
१६।८ अ.

२९ अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥
५।८ अ,

---

२५ मी सर्व यज्ञांचा व तपांचा भोक्ता तसेच सर्व लोकांचा ईश्वर आणि सर्व प्राण्यांचा प्रिय सखा असे जो यथार्थ जाणतो त्याला अक्षय्य शांति लाभते.

२६ देव, पितर आणि भूते यांची आराधना करणारे लोक त्यांच्या लोकांस जातात, माझे भजन करणारे मला येऊन मिळतात,

२७ अंतकाळीं ज्या ज्या स्वरूपाचें स्मरण करींत मनुष्य देह सोडतों त्याला तो जाऊन मिळतो, कौन्तेया, मनुष्य ज्याचा सदैव ध्यास घेतो तोच अंतकालीही असतो.

२८ हे अर्जूना, ब्रम्हलोकांपर्यंत सर्व लोक पुनर्जन्म येणारे आहेत, पण हे कौतेया, मला येऊन पावल्यावर मात्र पुनर्जन्म येत नाहीं.

२९ आणि अंतकाळीं जो माझेंच स्मरण करीत देह सोडून जातो, तो साक्षात् माझ्याच स्वरूपाला पोंचतो यांत संशय नाहीं.

३० मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवंती महात्मानःसंसिद्धिं परमां गताः ॥

१५।८ अ

---

३० मला येऊन मिळाल्यावर परम सिद्धि पावलेल्या या महात्म्याना दुःखाचे आगर व अशाश्वत असा पुनर्जन्म प्राप्त होत नाही.



# अध्याय ११ वा.

## विभूति — योग.



या अध्यायांत, अर्जुनानें. " स्वतःच्या सगुण उपासने करतां तुमची एकादी चांगली विभूति असावी म्हणून मला तुमच्या निरनिराळ्या काळीं विभूति सांगा, " असा श्रीकृष्णाला प्रश्न केला, तेव्हां त्याला अनुसरून मुख्य मुख्य विभूति यांत दिग्दर्शित केल्या आहेत. या विभूतींची उपासना करतां करतां बुद्धि परिपक्व झाली म्हणजे शेवटीं बुद्धि योगाचा म्हणजे श्वासाबरोबर नामस्मरणाचा मार्ग मीच त्यांना दाखवतो व अज्ञानांतून त्यांना मुक्त करतो असा अध्यायाचे अखेरीस निर्णय देऊन आत्मस्वातंत्र्याचा लगामही श्रीकृष्णांनीं आपल्याच हातांत घट्ट धरून ठेवला आहे. म्हणून मानवी प्रयत्नानें तुर्यावस्थेपर्यंतच मजल गांठतां येते. उन्मनी अवस्थाही सर्वथैव भगवंताच्या इच्छेवर राहते. म्हणूनच तुकाराम महाराजानीं आपले चरित्र सांगताना लिहिलेल्या अभंगांत— " यासि शूद्र वंश केला वेवसाव – " या अभंगांत शेवटीं " आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणें " असा देवावर निर्वाळा ठेवलेला आहे.



# अध्याय ११ वा.

## विभूति — योग.

श्री अर्जुन उवाच –

१ परंब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।
पुरूषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥
१२/१० अ.

५ आहुरस्त्वामृषयः सर्वे देवर्षिनरिदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषिमे ॥
१३।१० अ.

३ सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
न हिते भगवन्व्यक्ति विदुर्देवा न दानवाः ॥
१४/१० अ.

४ स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरूषोत्तम ।
भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥
१५।१० अ.

---

**अर्जुन म्हणाला** – १, २, परब्रम्ह, परधाम ( श्रेष्ठ स्थान ), परम पवित्र, दिव्य व शाश्वत, आदिदेव, अजन्मा आणि विभु ( सर्व व्यापी) तुम्ही आहां असे सर्व ऋषि, देवर्षि नारद, असित, देवत आणि व्यासही सांगतात, व स्वतः तुम्हीही मला तेच सांगतां

३ हे केशवा, तुम्ही जे सांगतां ते मी सत्य मानतों, हे भगवान, व्यक्तिरूप धारण करण्याऱ्या तुला देवदानवही यथार्थतेनें जाणत नाहींत,

४ हे भूतांच्या उत्पादका, भूतेषा, देवाधिदेवा, जगापतें. हे पुरूषोत्तमा, आपण स्वतःच आपल्याला ओळखू जाणें !

५ वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।
याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥
१६/१० अ,

६ कथं विद्यामहं योगिस्त्वां सदा परिचिन्तयन् ।
केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥
१७।१० अ.

७ विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥
१८।१० अ,

श्रीभगवानुवाच –

८ हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥
१९।१० अ,

९ आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥
२१।१० अ

---

५ ज्या विभूतींच्या योगानें तुम्ही हे सर्व लोक व्यापून राहिला आहां त्या सर्व विभूति सांगण्यास आपणच योग्य आहा.

६ हे योगेश्वरा, मी कशारीतीनें निरंतर चिंतन करीत आपणाला जाणावे बरें ? आणि हे भगवान, कोणकोणत्या भावांमध्यें आपले चिंतवन मी करावें ?

७ हे जनार्दना, आपली विभूति व योग पुनः विस्तारपूर्वक सांगा ? कारण तुमचें अमृतवचन ऐकत असतां माझी तृप्ति होत नाहीं.

**श्रीभगवान् म्हणतात** – ८ ठीक आहे, माझ्या अनेक दिव्य विभूती पैकी मुख्य मुख्य तुला सांगतों; कारण हे कुरूश्रेष्ठा, माझ्या विभूति विस्ताराला अंत नाहीं.

९ अदितीच्या द्वादश पुत्रांमध्यें विष्णु मी तेजस्व्यांमध्यें प्रकाशमान् सूर्य मी, वायु देवतांचे तेज मी व नक्षत्रांत चंद्रमा मी आहे.

१० वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥
२२।१० अ.

११ रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥
२३।१० अ.

१२ पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥
२४।१० अ.

१३ महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥
२५।१० अ.

१४ अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥
२६।१० अ.

---

१० वेदांमध्यें सामवेद मी, देवांमध्ये इंद्र मी, इंद्रियामध्ये मन मी व प्राण्यांमधील चैतन्य मी आहे.

११ एकादश रुद्रामध्यें शंकर मी, यक्षराक्षसामध्यें कुबेर मी, वसूमध्यें अग्नि मी, आणि पर्वतामध्यें मेरू मीच आहे.

१२ पार्था, पुरोहितांमध्यें मुख्य जो बृहस्पति तो मीं, सेनापतींत स्कंद ( कार्तिकस्वामी ) मी व जलाशयामध्यें समद्र मीच आहे.

१३ महर्षी मध्यें भृगु मी, वाणी मध्यें एकाक्षर ॐ, यज्ञांमध्यें जपयज्ञ व स्थावरांमध्यें हिमालय मी आहे.

१४ सर्व वृक्षांमध्ये अश्वत्थ मी, देवऋषींमध्यें नारद, गंधर्वा मध्यें चित्ररथ व सिद्धांमध्यें कपिलमुनि मी आहें.

१५ उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेन्द्राणां नरायणां च नराधिपम् ॥
२७।१० अ.

१६ आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥
२८।१० अ.

१७ अनंतश्चास्मि नागानां वरूणो यादसामहम् ।
पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥
२९।१० अ.

१८ प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ।
३०।१० अ.

१९ पवनः परतामस्मि रामः शारअभृतामहम् ।
झषाणांमकरश्चास्मि स्त्रोतसामस्मि जाह्नवी ॥
३१/१० अ.

---

१५ अश्वामध्ये अमृताबरोबर समुद्रमथनाच्या वेळीं उत्पन्न झालेला उच्चैः श्रवा नांवाचा अश्व मी, गजेंद्रामध्यें ऐरावत व मनुष्या मध्ये मी राजा आहे.

१६ शस्त्रा मध्ये वज्र व गाई मध्ये कामधेनु मी आहे.. प्रजोत्पत्ति करणारा काम व सर्पामध्यें वासुकि मी आहे.

१७ नागामध्यें अनंत ( शेष ) मी, व जल चरा मध्यें वरूण मी आहे. पितृगणामध्यें अर्यमा मी व संयमां मध्यें यम मीच आहे

१८ दैत्यांमध्ये प्रल्हाद मी व गणकांमध्ये काल मी आहे; मृगामध्यें सिंह मी व पक्ष्यांमध्ये गरुड मी आहे.

१९ पवित्र करणाऱ्यां मध्यें वायु मी व शस्त्रधरामध्यें राम मी आहे. मत्स्यामध्यें मगर मी व नद्यां मध्यें गंगा मी आहे,

२० सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ।

३२।१० अ.

२१ अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च ।
अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥

३३।१० अ.

२२ मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥

३४।१० अ.

२३ बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।
मासानां मार्गशीर्षोऽहमृतुनां कुसुमाकरः ॥

३५।१० अ.

२४ द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।
जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥

३६।१० अ.

---

२० हे अर्जुना, सृष्टीचा आदि, अंत व मध्य मी असून सर्व विद्यांत अध्यात्मविद्या मी आहे; वाद करणारांचा तत्त्वनिर्णयाचा वाद मी आहे.

२१ अक्षरांत अकार मी व समासांत द्वंद्व समास मी आहे. अक्षय काल महाकाल मी असून सर्वतोमुख असा धाता मीच आहे.

२२ सर्वांचा नाश करणारा मृत्यु मी असून पुढें उत्पन्न होणाऱ्या वस्तूचा उद्भव मी आहे. स्त्रियांमध्यें कीर्ति, श्री, वाणी, स्मृति, मेधा धृति व क्षमा मी आहे.

२३ सामवेदांत बृहत्साम स्तोत्र मी व छंदांमध्यें गायत्री छंद मी आहे. मासामध्यें मार्गषीर्ष व ऋतूमध्यें वसंत मी आहे.

२४ छळ करणारामध्यें जुगार मी असून प्रभावशाली पुरूषांचें तेज मी आहे. विजय, निश्चय व सत्त्ववतांचे सत्व मी आहे.

२५ वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः ।
मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥

३७/१० अ.

२६ दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।
मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥

३८।१० अ.

२७ नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥

४०।१० अ.

२८ यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥

४१।१० अ.

२९ एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।
सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥

७।१० अ.

---

२५ यादवांमध्यें वासुदेव मी पांडवांमध्यें धनंजय मी आहें. मुनींमध्यें व्यास व कवींमध्यें शुक्राचार्य मी आहे.

२६ दमन करणारांतील दमनशक्ति मी असून जयेच्छू मध्यें नीति मी आहे. गुह्यांतील मौन व ज्ञानवंतांतील ज्ञान मी आहे.

२७ हे परंतपा, माझ्या दिव्य विभूतींना अंत नाही. विभूतींचा हा विस्तार दिग्दर्शनार्थ मी तुला संक्षेपानें सांगितला

२८ जी जी वस्तु ऐश्वर्ययुक्त, श्रीयुक्त व शक्तियुक्त असेल ती ती माझ्या तेजाच्या अंशाची अभिव्यक्ति आहें असें तूं समज.

२९ जो माझी ही विभूती व योगशक्ति यथार्थ जाणतो तो निश्चल योगयुक्त होतो यांत संशय नाहीं.

३० अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।
इति मत्वा भजन्ते मां बुधाः भावसमन्विताः ॥
८।१० अ,

३१ मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।
कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥
९।१० अ,

३२ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥
१०।१० अ.

३३ तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥
११।१० अ.

---

३० मी सर्वांचे उत्पत्तिकारण व मजमुळें सर्व कार्यप्रवृति हें जाणून प्रेमानें बुद्धिमान मला भजत असतात.

३१ माझ्या ठिकाणीं चित्त लावून व प्राण अर्पण करून, परस्परांना बोध करीत, माझें गुणसंकीर्तन करीत, ते त्यांतच सदा संतुष्ट व रममाण होतात.

३२ निरंतर भक्तियुक्त होऊन प्रीतिपूर्वक मला जे भजतात, त्यांना. ते मला येऊन मिळतील अशा प्रकारचा बुद्धियोग, मीच देत असतो.

३३ त्यांच्यावर कृपा करण्या साठींच त्यांच्या हृदयांत वास करणारा मी तेजस्वी ज्ञानदीपानें त्यांचा अज्ञानांधकार नाहींसा करतों.



# अध्याय १२ वा.

## बुद्धि योग.



आतांपर्यंत श्रीकृष्णांनीं पुरुष व प्रकृति यांची सर्व माहिती अर्जुनाला दिली, व ज्ञानविज्ञान विषय पुरा केला. यालाच सांख्य शास्त्र असें म्हणतात. येवढयावरून विज्ञानमर्यादा व आत्म्याची व्याप्ति जरी अर्जुनाला समजली, तरी आत्म्याचें हें स्वरूपवर्णन सर्व शाब्दिकच झालें. केवळ शब्दविज्ञानानें आत्म्याचें यथार्थ ज्ञान अर्जुनाला होणें अशक्य होतें. ज्ञानांची शाब्दिक कल्पना म्हणजे ज्ञानमार्ग नव्हे, शाब्दिक विज्ञानानें आपल्याला काय प्राप्त करुन घ्यावयाचें हें कळेल, त्याची प्रत्यक्ष प्राप्ति करून घेतां, येणार नाहीं शब्दविज्ञान ही शास्त्र प्रचीति होऊं शकते, तिनें आत्मप्रचीति येऊं शकणार नाहीं. म्हणून तो ज्ञानाचा मार्ग ठरत नाहीं. ज्ञानयोग याचा अर्थ ज्ञानमार्ग असा नसून, व्यापक अर्थानें आत्म्याचें शब्दविज्ञान असा होतो. हें शाब्दिक स्वरुप कळल्यावर आत्म्याचा स्वानुभव येण्याला मार्ग कोणता हा साहजिकच प्रश्न उद्‌भवतो व त्याचेच सूतोवाच ' बुद्धि योग ' या अध्यायांत केलेले आहे.

मागें आपण पाहिलेंच आहे कीं श्वासनिरोधन होऊन सगुण बुद्धि तयार होते व सगुणबुद्धीनें इंद्रियांशी किंवा मनाशीं आत्मा संलग्न झाल्यावर निर्गुणबुद्धिनें विज्ञान प्राप्त होत असतें. शास्त्र प्रणीत मार्गानें विषय सेवना करतां निर्गुण बुद्धि इंद्रियांशीं किंवा मनाशी संलग्न झाली तर तिला सुबुद्धि म्हणतात; अशास्त्रोक्त विषयसेवना करतां उपयोग झाला तर तिला दुर्बुद्धि म्हणतात, परंतु परमेश्वराच्या नामाशीं संयोग झाला तर मन निर्गुण होऊन आत्मज्ञान होऊन तिला आत्मबुद्धि किंवा सदबुद्धि असे म्हणतात; म्हणून नामस्मरण हाच ज्ञानाचा मार्ग ठरतो व निर्गुणबुद्धि नामाशीं संलग्न झाली म्हणजे तिला व्यवसायात्मिकाबुद्धि असें म्हणतात. श्रीकृष्णांनीं अर्जुनाला " तूं योगी हो, " नामस्मरणानें आत्मबुद्धियुक्त हो " असाच उपदेश केला आहे, व हा ज्ञानमार्ग दाखवून त्यानेंच " तूं कर्म करीत असतांही निर्लेप राहू शकशील असें तर्कशुद्ध आश्वासनहीं दिलेले आहे. नुसतें कर्म केल्याने देहबुद्धि सुटत नाहीं व मनुष्य त्यांतच गुरफटून जातो, म्हणून ते हीन दर्जाचें ठरतें, असें सांगून, आत्मबुद्धियुक्त कर्म केल्याने द्वंद्वातीत होता येऊन पूर्ण ज्ञानीही होता येतें व प्रकृतिस्वभावाचे कर्मही करतां येतें, असा श्रेयस्कर व प्रेयस्कर मार्गाचा सल्ला श्रीकृष्णांनी त्रिकालाबाधित करून ठेवलेला आहे ।

# अध्याय १२ वा.

## बुद्धियोग.

श्रीभगवानुवाच :--

१ एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥
३९/२ अ.

२ नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥
४०/२अ.

३ व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ।
४१।२ अ.

४ यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीतिवादिनः ॥
४२।२ अ.

---

**श्रीभगवान् म्हणालें:-** १ ही तुला सांख्य बुद्धि म्हणजे ज्ञान विज्ञान विषय सांगितला, आतां योगबुद्धि ऐक; या बुद्धि योगाने युक्त झालास म्हणजें तूं कर्म बंधनाला तोडून टाकशील.

२ या बुद्धियोगांत अभिक्रमांचा नाश नाहीं व कांहीं चूक घडली तरी दोष नाहीं; ह्या धर्माचे अल्प आचरणही मोठ्या भयापासून रक्षण करतें.

३ हे कुरूनंदना, योगबुद्धि हीच एक स्थिरबुद्धि असते; अस्थिर पुरुषांच्या बुद्धि अनेक फाटे फुटलेल्या व अनेक प्रकारच्या असतात !

४ - ५ - ६, हे पार्था, वेदांच्या अर्थवादांत रमलेले, त्यांवांचून दुसरे कांहींच नाही असे म्हणणारे, कामुक स्वभावाचे, स्वर्गाच्या मागें लागलेलें असे मूढ लोक, जन्मरूपी कर्मफल देणारी, भोग, ऐश्वर्य यांच्या प्राप्ती साठीं अनेक क्रियांचा उपदेश करणारी ,फुललेल्या वृक्षाप्रमाणें मनोहर, अशी जी वाणी बोलतात त्या वाणीनें मोहून गेलेल्या व भोग आणि ऐश्वर्य यांत आसक्त झालेल्या लोकांची बुद्धि समाधिस्थ म्हणजे स्थिर होत नाहीं,

५ कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥
४३।२ अ.

६ भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ स्नविधीयते ॥
४४।२ अ.

७ त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥
४५।२ अ.

८ यावानर्थं उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥
४६।२ अ.

९ बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।
प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥
२९।१८ अ.

---

७ सर्व वेद त्रिगुणात्मक विषयांनीं भरलेले आहेत; हे अर्जुना, तूं निर्गुण, द्वंद्वांतील, आत्मनिष्ठ, नित्य, सत्त्वस्थ, व योगक्षेमाची चिंता न करणारा असा हो.

८ सर्व जलमय झाले असतां विहिरीची जेवढी किंमत, तेवढीच ज्ञानी पुरूषाला सर्व वेदांची असते.

९ हे धनंजया, बुद्धी आणि धृति ( धारणा शक्ति ) यांचे ही गुणांमुळें होणारे त्रिविध भेद मी वेगवेगळें संपूर्ण सांगतों, ऐक.

१० प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिःसा पार्थ सात्त्विकी ॥
३०।१८ अ.

११ यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥
३१।१८ अ.

१२ अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥
३२।१८ अ,

१३ धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी ॥
३३।१८ अ.

१४ यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥
३४।१८ अ.

---

१० हे पार्था, जो बुद्धि प्रवृत्ति व निवृत्ति, कर्तव्य व अकर्तव्य, भय व अभय, तसेंच बंध व मोक्ष हे यथार्थ जाणते, ती 'सात्विक' होय,

११ हे पार्था, धर्म व अधर्म, कार्य व अकार्य, यांचा ज्या बुद्धीनें यथार्थ निर्णय होत नाहीं, ती 'राजस' होय.

१२ पार्था, तमोगुणानें व्याप्त होऊन जी बुद्धि अधर्माला धर्म मानिते याच प्रमाणें सर्व गोष्टी विपरीत उलट समजते ती तामस होय.

१३ पार्था, अव्यभिचारी धारणा शक्तीच्या योगानें साधक मन, प्राण व इंद्रिये यांच्या क्रियांना धारण करूं शकतो--स्वाधीन ठेवतो--ती 'सात्विकधृती' होय,

१४ पण हे अर्जूना, फलाकांक्षी पुरुष ज्या धारणशक्तीनें धर्म अर्थ व काम हे अत्यंत आसक्तीने धारण करतो ती 'राजस' धृति होय,

१५ यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुन्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ।
३५/१८ अ.

१६ योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥
४८।२ अ.

१७ दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥
४९।२ अ,

१८ बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥
५०।२ अ,

१९ कर्मजं बुद्धियुक्ताहि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्म बंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥
५१।२ अ.

---

१५ पार्था, ज्या मुळें दुर्बुध्दि पुरुष निद्रा, भय, शोक विषाद आणि मद यांना सोडीत नाहीं, ती ' तामस ' धृति होय.

१६ हे धनंजया, आसक्ति, सोडून, यशापयशाविषयीं समबुध्दि ठेऊन योग युक्त होऊन कर्म कर. या समबुध्दिलाच योग म्हणतात

१७ बुध्दि योगापेक्षा नुसते कर्म हीन होय बुध्दियोगाचा आश्रय घे नुसत्या फल हेतूने कार्य करणारे हे तुच्छ होत.

१८ बुध्दियोगी या लोकींच पापपुण्य दोहींचा त्याग करतो म्हणून तूं योगाचा आश्रय कर. बंधन कारक न होता युक्तीनें कर्म करणें योग म्हणतात.

१९ बुद्धियोगयुक्त ज्ञानी कर्मांच्या फलाची आशा सोडून जन्मबंधापासून मुक्त होऊन दुःख रहित अशा पदाला पावतात.

२० यदा ते मोहकलिलं बुध्दिर्व्यतितरिष्यति ।
तदागन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥
५२।२ अ.

२१ श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुध्दिस्तदा योगमवाप्स्यसि ॥
५३।२ अ.

२२ रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥
६४।२ अ.

२३ प्रसादे सर्व दुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुध्दिः पर्यवतिष्ठते ॥
६५।२ अ.

२४ नास्तिबुध्दिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥
६६।२ अ.

---

२० जेव्हां तुझी बुद्धि मोहाच्या आवरणांतून पार पडेल तेव्हां श्रुत व श्रोतव्य अशा विषयांचे वैराग्य तुला प्राप्त होईल.

२१ श्रुति श्रवण करून भांबावलेली तुझी बुध्दि जेव्हां ( बुध्दि योगानें स्थिर होऊन ) समाधी स्थितींत स्थिरराहील तेंव्हां तुला योग प्राप्ति होईल.

२२ परंतु रागद्वेष रहित पूर्णस्वाधीन इंद्रियांनीं विषयांत वावरूनहीं आत्मवश पुरूष ( स्वाधीन अंतःकरणाचा ) चित्ताची स्वस्थता किंवा शांति प्राप्त करून घेतो

२३ त्या प्रसन्नतेच्या योगानें त्याच्या सर्व दुःखांचा नाश होत व प्रसन्न चित्त पुरुषाची बुध्दि परमात्म्यांत लवकरच स्थिर होते.

२४ जो योगयुक्त नाहीं त्याची बुध्दि स्थिर नाहीं, म्हणून आत्म्याचें ध्यान ही नाहीं; ज्याला आत्मध्यान किंवा आत्मबुद्धि नाहीं त्याला शांति नाहीं आणि ज्याला शांति नाहीं त्याला सुख कोठून मिळणार ?

२५ सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोविन्दते फलम् ॥
४।५ अ.

२६ यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥
५।५ अ.

२७ योगयुक्तो विशुध्दात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।
सर्वं भूतात्म भूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥
७।५ अ.

२८ नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥
८।५ अ.

२९ प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इंद्रियाणींन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥
९।५ अ.

---

२५ सांख्ययोग व कर्मयोग हे वेगळे आहेत असें अज्ञजन म्हणतात, ज्ञानी म्हणत नाहींत; कारण कोणत्याही एकाची प्राप्ति झाल्यास दोहोंचे फळ मिळतें. ( बुध्दियोगाखेरीज ज्ञानयोग, कर्मयोग कोणताच योग प्राप्त करतां येत नाहीं )

२६ जें स्थान सांख्य योग्यांना मिळतें तेंच बुद्धि योग्यांनाहीं मिळते सांख्ययोग ( ज्ञानयोग ) व बुद्धियोग हे वस्तुन; एकच आहेत असें जो पाहतो तो खरा जाणता होय,

२७ ज्याचें अंतःकरण शुध्द आहे. ज्यानें मन व इंद्रियें जिंकलीं सर्व भूतांचा आत्मा हाच ज्याचा आत्मा झाला, असा योगी पुरुष कर्मं करीत असतां ही लिप्त होत नाहीं.

२८-२९ योगयुक्त तत्त्ववेत्ता पुरूष आपण पाहतांना, ऐकतांना, स्पर्श करतांना, वास घेताना, खातांना. चालतांना, निद्रा घेतांना, श्वसन करतांना, बोलतांना, त्याग करतांना, ग्रहण करतांना, डोळयाच्या पापण्या उघडतांना व झोपतांना ( सर्व क्रिया करतांना ) इंद्रिये विषयांच्या ठायीं वर्तत आहेत, असे समजून वागतो व आपण कांहींच करीत नाहीं असें निःसंदेह मानतो.

३० ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्म पत्रमिवांभसा ॥
१०।५ अ.

३१ यस्य नाहंकृतो भावो बुध्दिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमांल्लोकान्न हंति न निबध्यते ॥
१७।१८ अ,

३२ चेतसा सर्वं कर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुध्दियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥
५७।१८ अ.

३३ मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्वमहंकारान्नश्रोण्यसि विनंक्ष्यसि ॥
५८।१८ अ.

३४ इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥
१।४ अ.

---

३० जो सर्व कर्मे ब्रम्हार्पण करून व आसक्ति सोडून करतो, तो पाण्यातील कमळपत्रा प्रमाणें पापापासून अलिप्त असतो.

३१ ज्याच्या ठिकाणीं "मी कर्ता" असा भाव नाहीं व ज्याची बुद्धि कर्मांत लिप्त नाहीं त्यानें सर्व लोकांना मारलें तरीही तो त्याना खरोखर मारीत नाही व बद्ध होत नाही.

३२ मनानें सर्व कर्मे मला अर्पण करून मत्परायण हो–आणि बुद्धियोगाचा आश्रय करून निरतर माझ्या ठिकाणीं चित्त ठेव.

३३ माझ्या ठिकाणीं चित्त ठेऊन माझ्या प्रसादाने सर्व संकटांतून तरून जाशील, पण अहंकारानें माझें न ऐकशील तर मात्र नाश पावशील.

३४ हा अविनाशी योग मी पूर्वी सूर्याला सांगितला होता. सूर्यानें तो मनूला व मनूने इक्ष्वाकूला सांगितला.

३५ एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥
२।४ अ.

३६ स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥
३।४ अ.

अर्जुन उवाच –

३७ अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥
४।४ अ.

श्रीभगवानुवाच –

३८ बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥
५।४ अ.

३९ अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपिसन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥
६।४ अ.

---

३५ या प्रमाणें परंपरेनें प्राप्त झालेला हा योग राजर्षिना समजला, पण हे परतपा, दीर्वकालांतरानें हा योग लुप्त झाला.

३६ तोच हा पुरातन योग मी आज तुला सांगितला, तूं माझा भक्त व सखा आहेस म्हणून हे उत्तम रहस्य मी तुला सांगितलें,

**अर्जुन म्हणाला:–** ३७ तुमचा जन्म अलीकडचा व सूर्याचा प्राचीन काळचा; असें असतां तुम्ही त्याला हा योग प्रथम सांगितला हें मी कसें समजूं ?

३८ श्री भगवान् म्हणाले:– हे परंतपा अर्जुना, माझे व तुझेही जन्म पुष्कळ होऊन गेले. मी ते सर्व जाणतो पण तूं तें जाणत नाहींस.

३९ मी अज, अव्यय व ईश्वर असून ही माझ्या प्रकृतीच्या ठिकाणीं अधिष्ठित होऊन योगमायेनें मीं प्रकट होत असतो.

४० यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥
७।४ अ.

४१ परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥
८।४ अ.

४२ जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥
९।४ अ.

४३ वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥
१०।४ अ.

४४ मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥
३४/९ अ.

---

४० जेव्हां जेव्हां धर्माची, हानि होते व अधर्माचे प्राबल्य माजते तेव्हां तेव्हां मी स्वतःच्या सगुण रूपाला प्रकट करतो,

४१ साधूंचे संरक्षण, दुष्टांचा नाश आणि धर्माची स्थापना करण्यासाठी मी युगायुगांत उत्पन्न होतो,

४२ माझें दिव्य जन्म व दिव्य कर्म जो तत्वतः म्हणजे बरोबर जाणतो, तो, हे अर्जुना, देह त्यागा नंतर पुनः जन्मास न येतां मलाच येऊन मिळतो,

४३ आसक्ति, भय व क्रोध टाकून देऊन, मत्परायण होऊन, माझ्या आश्रयास आलेले अनेक लोक ज्ञानरुप तपानें पावन होऊन माझ्या स्वरुपास येऊन मिळालेले आहेत.

४४ माझ्याठायीं मन ठेवणारा हो. माझा भक्त हो, माझा पूजक हो, मला नमस्कार कर, या प्रमाणें मत्परायण होऊन आपले चित्त सर्वकाल माझ्या ठिकाणीं लाविलेस म्हणजे तू मलाच येऊन मिळशील.

# अध्याय १३ वा.

## आत्मसंयम योग.



मागील अध्यायांत आत्मप्राप्तीचा मार्ग म्हणून जो बुद्धियोग सांगितला, त्याचा अभ्यास कसा करावा व तो करीत असतां अतींद्रिय सुख कसें मिळतें व शेवटीं आत्मैक्यता कशी होतें, हें या अध्यायांत सांगितले आहे. नुसता बुद्धियोग समजला म्हणजे काम भागूं शकत नाहीं. त्याचा पुढें अभ्यासच करावा लागतो व तो अभ्यास देहपातापर्यन्त चालू ठेवावा लागतो, " यावत्कल्पांतको देहस्ता व देव गुरुं स्मरेत् " म्हणजे नामस्मरण देह सोडीं पर्यन्त करावे असें गुरुगीतेंतही सांगितलें आहे, श्रीकृष्णही वारंवार अर्जुनाला असें सांगत आहेत कीं, माझ्या ठिकाणीं चित्त ठेव, माझ्या ठिकाणी बुद्धि ठेव, मन माझ्याकडे लाव मला शरण ये, सर्व कर्मांचा न्यास माझें ठिकाणीं कर, आणि त्याकरतां अगोदर माझें नामस्मरण कर. येवढ्याकरतां नामस्मरणाचा अभ्यासच केला पाहिजे व त्या करतां प्रयत्नच करीत राहिलें पाहिजे असें गुरूगीतेंतही स्पष्ट सांगितले आहे, व तल्लाभार्थं प्रयत्नस्तु कर्तव्योहि मनीषिभिः ।। " व हा प्रयत्न करीत असतां किीही कष्ट झाले व खायला मिळाले नाहीं तरीही अभ्यास सोडूं नये असे त्याच गुरुगीतेंत अभ्यासाचें महत्वही वर्णन केलें आहे. " लब्धं वा अर्थं न लब्धं वा स्वल्पं वा बहुलं तथा निष्कामेनैवभोक्तव्य सदा संतुष्ट चेतवा" "याचाच अर्थ " न मिळो खावया न वाटी संतान । परि हा नारायण कृपा करो " यांत श्री तुकाराम महाराजानीं पूर्ण व्यक्त केला आहे.



# अध्याय १३ वा.

## आत्मसंयम — योग.

श्रीभगवानुवाच –

१ मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥
१/७ अ,

२ राजविद्या राजगुह्यं पवित्रमिद मुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥
२।९ अ.

३ मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्तितत्वतः ॥
३।७ अ,

४ योगी युंजीत सततमात्मानं रहसिस्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥
१०।६ अ.

५ शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥
११।६ अ.

---

**श्रीभगवान् म्हणाले** – १ हे पार्था, माझ्या ठिकाणी मन लावून व माझाच आश्रय करून योगाभ्यास करीत असतां तूं मला निःसंशय व संपूर्णपणें कसे जाणशील ते ऐक.

२ हे ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्व गुह्यांचा राजा, पवित्र, अति उत्तम प्रत्यक्ष अनुभवितां येणारे. धर्मानुकुल, अत्यंत सोपें, आणि अव्यय असे आहे.

३ हजारों मनुष्यांत एखादाच मत्प्राप्ति मिळविण्याचा प्रयत्न करतो, व तसा प्रयत्न करणाऱ्या सिद्धांतही एकादाच मला यथार्थ रूपानें जाणतो

४ योग्यानें एकांतांत राहून शरिर, मन व इंद्रियें आंवरून, तसेंच आशा व परग्रह टाकून एकटयानें सतत योगाभ्यासास लागावें.

५, ६, शुद्ध भूमिवर आपलें स्थिर (एकाजागी) आसन मांडावें. ते फार ऊंच व फार नीच नसावे; त्यावर दर्भासन, वर मृगाजिन व त्याच्यावर स्वच्छ वस्त्र घालून, चित्त व इंद्रियें यांचे व्यापार नियमित करून, मन एकाग्र करून आत्मशुद्धि साठीं आसनावर बसून योगाचा अभ्यास करावा.

६ तत्रैकाग्रं मनःकृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥
१२।६ अ.

७ समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥
१३।६ अ.

८ प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रम्हचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥
१४।६ अ.

९ संकल्प प्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥
२४।६ अ,

१० शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥
२५।६ अ.

---

७, ८, शरीर ( पाठ ) डोके व मान सरळ रेषेंत निश्चल धारण करुन स्थिर होऊन, सभोवार न बघता नासाग्री दृष्टि ठेवून शांत व निर्भय मन, ठेवून, ब्रम्हचर्यव्रतानें राहून, मनाचें संयमन करुन, माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून, ( या प्रकारें ) अभ्यास युक्त होऊन मत्परायण होऊन असावें,

९, १०, विषय चिंतना पासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वासनांचा सर्वस्वी त्याग करून, मनांनेच सर्व बाजूंनीं इंद्रियसमुदायांचा निग्रह करून, हळू हळू स्थिर होत जावे, व धैर्ययुक्त बुद्धिनें आत्मस्वरूपीं मन स्थिर करून दुसऱ्या कशाचेही चिंतन करूं नयें .

११ यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥
२६।६ अ,

१२ यूंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।
शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥
१५।६ अ

१३ नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥
१६/६ अ.

१४ युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥
१७।६ अ.

१५ यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निःस्पृहः सर्व कामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥
१८।६ अ.

---

११ चंचल व अस्थिर मन जेथें जेथें बाहेर जाऊं लागेल तेथून तेथून त्याला निग्रहानें आवरून आणून ते आत्म्याच्या ठायीं स्थिर करावें.

१२ या प्रमाणें आपला योगाभ्यास सतत चालू ठेवणाऱ्या आणि मनाचे नियमन करणाऱ्या योग्याला माझ्या ठिकाणची परमशांति लाभेल.

१३ हे अर्जुना, फार खाणारास किंवा कांहीं न खाणारास, अति झोपाळूस किंवा अति जागरण करणारास योग साधत नाहीं.

१४ ज्याचा आहारविहार, कर्माचरण, निद्रा व जागृति परिमित असते त्यालाच हा योग दुःख नाशक होतो.

१५ जेव्हां आवरलेले चित्त आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर होतें व सर्व कामनां विषयीं तो निःस्पृह होतो तेव्हां त्याला 'युक्त' म्हणजे योगी म्हणतात.

१६ यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥
१९।६ अ.

१७ प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥
२७/६ अ.

१८ युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥
२८।६ अ.

१९ यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥
२०।६ अ.

२० सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥
२१/६ अ.

---

१६ निवांत ठायीं ठेवलेल्या दिव्याची ज्योत हालत नाहीं, हीच उपमा आत्मध्यानांत मग्न झालेल्या योग्याच्या संयत चित्ताला दिली जाते.

१७ या प्रमाणें अतिशय शांतचित्त, रजोगुणापासूनमुक्त, निष्पाप या ब्रम्हाशीं ऐक्यत्व पावलेल्या योग्याला अति उत्तम सुख प्राप्त होतें

१८ या प्रमाणें सदा योगाभ्यास करणारा योगी निष्पाप होऊन ब्रम्हप्राप्तिरूप निरतिशय सुखाचा उपभोग सुखानें अनायासे घेतो,

१९ ज्या स्थितीमध्यें योगाभ्यासानें नियमित केलेले चित्त उपरम पावते, आणि तो आत्म्याला पाहुन आत्म्यातच संतुष्ट होतो,

२० ज्या स्थितींत इंद्रियांना अगोचर पण बुद्धिवृत्तिगम्य असें अत्यंतिक सुख तो अनुभवतो आणि जेथें स्थिरावल्यावर आत्मस्वरूपापासून ढळत नाहीं

२१ बिषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसबर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥
५९।२ अ.

२२ सुखंत्विदानीं त्रिविधं श्रृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥
३६।१८ अ.

२३ यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धि प्रसादजम् ॥
३७।१८ अ.

२४ विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥
३८।१८ अ.

२५ यदग्रे चानुबंधेच्च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्य प्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥
३९।१८ अ.

---

२१ निराहारी पुरुषांचें विषय सुटतात, पण आंतील गोडी सुटत नाहीं, ब्रम्ह दर्शन झाल्यावर तीही नाहिशीं होते.

२२ हें भारत श्रेष्ठा, आतां सुखाचेही तीन प्रकार मजकडून ऐक. ज्या सुखांत अभ्यासानें साधक रमतो व सर्व दु;खांचा नाश होतो.

२३ जें सुरवातीला विषासारखें पण शेवटीं अमृतासारखे असतें व जें आत्मप्रवण बुद्धिच्या प्रसादामुळें उत्पन्न होतें, तें सुख ‘ सात्विक ’ म्हटले आहे.

२४ इंद्रियें व विषय यांच्या संयोगापासून होणारे. आरंभीं अमृतासारखें पण परिणामीं विषासारखे होणारे असे जे सुख तें ‘ राजस ’ समजलें जातें.

२५ जें सुख आरंभीं व शेवटीं चित्ताला मोह पाडणारें असतें. तें निद्रा, आळस व प्रमाद यांपासून उत्पन्न होणारें सुख ‘ तामस ’ म्हटले जाते.

२६ बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनियत्सुखम् ।
सब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते ॥
२१/७ अ.

२७ यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकंततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥
२२।७ अ.

२८ तं विद्याद्दुःखसंयोगर्वियोगं योगसंज्ञितम् ।
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥
२३।६ अ,

२९ संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पित मनोबुद्धिर्योमद्भक्त: स मे प्रिय : ॥
१४।१२ अ.

३० बुद्धया विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।
शद्बादीन्यिषयांस्त्यक्त्वा रागद्वैषौ व्युदस्य च ॥
५१।१८ अ.

---

२६ बाह्य सुखाविषयीं ( इंद्रियाचेंविषयस्पर्श ) आसक्तिनष्ट झालेला पुरूष , आत्मस्वरूपांत जो आनंद असतो तो अनुभवतो, त्याला तसेच ब्रम्हनिष्ठ पुरूषाला शुद्ध व अविकृत असे अक्षय सुख मिळतें.

२७ जी स्थिति प्राप्त झाल्यावर तिच्याहून दुसरा कोणताही लाभ तो अधिक मानीत नाहीं, आणि त्यास्थितींत कोणतेंही मोठें दुःख त्याला चाळवूं शकत नाहीं,

२८ त्या दुःखसंबंध नसलेल्या स्थितीलाच ' योग ' हें नांव आहे. असें जाणावें, व या योगाला न कंटाळतां प्रसन्न चित्तानें आणि निश्चयानें अभ्यास करावा,

२९ सदा संतुष्ट, योगी, संयमी, दृढनिश्चयी, मन व बुद्धी माझ्याठांई अर्पण केलेला माझा भक्त मला प्रिय होतो,

३० शुद्धबुद्धिनें युक्त होऊन, धैर्यानें आपल्या चित्ताचे नियमन करून शद्बादि विषय सोडून आणि प्रीति व द्वेष टाकून देऊन,

३१ विविक्त सेवी लध्वाशी यतवाक्कायमानसः ।
ध्यानयोगपरोनित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥
५२।१८ अ.

३२ अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥
५३।१८ अ.

३३ ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समःसर्वेषु भूतेषु मद्भक्ति लभते पराम् ॥
५४।१८ अ.

३४ भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥
५५।१८ अ.

३५ सर्वभूतस्थमात्मानं सर्व भूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥
२९।६ अ.

---

३१, ३२, एकांत वासांत राहणारा, मिताहारी, कायावाचा मन निग्रह करणारा, नित्य ध्यानयुक्त व विरक्त, त्याच प्रमाणें अहंकार, बल, गर्व, काम, क्रोध, परिग्रह सोडून देऊन ममत्वरहित व शांत झालेला असा पुरुष ब्रम्हभूत होण्याला योग्य होतो.

३३ ब्रम्हभूत झाला म्हणजें प्रसन्नचित्त होऊन तो कशाचा शोक करीत नाहीं व कशाची इच्छाही करीत नाहीं, तो सर्वाभूतीं सम होऊन माझी पराभक्ति प्राप्त करून घेतो,

३४ त्या भक्तीच्या योगानें मी कोण, केवढा आहे यांचें त्याला यथार्थ ज्ञान होते आणि या प्रमाणें माझी तात्विक ओळख झाल्यावर तो माझ्यास्वरूपांत लीन होतो.

३५ योगयुक्त आत्मा झाला म्हणजे त्याची दृष्टि सर्वत्र सम होऊन, सर्व भूते ठायीं आपण - आत्मा, व आपल्या ठिकाणीं - आत्म्याच्या ठायीं सर्व भूतांचें असें त्याला दिसु लागते.

३६ सहस्त्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।
रात्रिं युगसहस्त्रांतां तेऽह्नोरात्रविदो जनाः ॥
१७/८ अ.

३७ अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।
रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥
१८।८ अ.

३८ भूतग्रामःस एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥
१९।८ अ.

३९ परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥
२०।८ अ.

४० अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥
२१।८ अ.

---

३६ एक हजार युगांचा कालावधी हा ब्रह्मदेवाचा एक दिवस व तसाच एक हजार युगाचा काल ही त्याची रात्र असे अहोरात्रवेत्तें मानतात.

३७ हा ब्रम्हदेवाचा दिवस सुरु होतांच अव्यक्ता पासून सर्व चराचर दृश्य पदार्थ उत्पन्न होतात, आणि रात्र सुरु झाली म्हणजे त्याच अव्यक्तांत तें लय पावतात.

३८ हे पार्था असा भूतसमुदाय पुनः पुनः उत्पन्न होऊन प्रकृतिवश होऊन ब्रम्हरात्र सुरु होतांच लय पावतो व दिवस सुरु होतांच उत्पन्न होतो

३९ या अव्यक्ताहून निराळा किंवा श्रेष्ठ असा दुसरा एक सनातन अव्यक्त भाव - तत्त्व - आहे. सर्व भूतांचा नाश झाला असतांही तो भाव नाश पावत नाहीं.

४० या अव्यक्तालाच अक्षर किंवा परमगति असे म्हणतात. ज्या पदाला पोंचल्यावर कोणी पुनः परत फिरत नाहीं (जन्माला येत नाहीं) तेंच माझे "परम धाम" होय.

४१ पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥
२२/८ अ,

४२ सर्वं द्वाराणि संयम्य मनो हृदि निरूध्य च ।
मूर्ध्न्यां धायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥
१२/८ अ.

४३ ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमांगतिम् ॥
१३।८ अ.

४४ अभ्यासयोग युक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥
८।८ अ.

४५ कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥
९।८ अ.

---

४१ हे पार्था, ज्याच्या अंतर्गत सर्व भूते आहेत, आणि ज्यानें हे सर्व जग व्यापिलें आहे तो अव्यक्त परम पुरुष अनन्य भक्तीनेंच प्राप्त होणें शक्य आहे,

४२ सर्व इंद्रियद्वारे रोखून, मन हृदयांत स्थिर करून, प्राण मस्तकांत ठेऊन, समाधियोगांत स्थिर होऊन,

४३ माझें स्मरण करीत ॐ या एकाक्षर ब्रम्हा चा लय करीत, जो देह सोडून जातो त्याला उत्तम गति मिळते,

४४ अभ्यासाच्या योगाने चित्त दुसरीकडे जाऊं न देतां स्थिर करून, पार्था, निरंतर चिंतन करीत राहणारा त्या दिव्य परम पुरुषाला जाऊन मिळतो,

४५, ४६, अंतकालीं योगबलानें व भक्तीनें युक्त होऊन, स्थिर मन करून भुवयामध्यें प्राण उत्तमरीतीनें स्थापून, कवि ( सर्वज्ञ ) पुरातन, शास्ता, अणूपेक्षाही सूक्ष्मरूप, सूर्याप्रमाणें तेजस्वी व अविदेच्या पलीकडील शुद्ध परमात्म्याचे जो निरंतर स्मरण करतो तो भक्ति युक्त पुरूष त्याच दिव्य पुरूषाप्रत पावतो.

४६ प्रयाणकालेमनसाचलेन भक्त्यायुक्तो योगबलेन चैव।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्यसम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥
१०।८ अ.

४७ यत्रकाले त्वनावृत्तिमावृत्तिंचैव योगिन :।
प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥
२३।८ अ.

४८ अग्निर्जोतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्।
तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥
२४।८ अ.

४९ धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥
२५।८ अ.

५० शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते।
एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥
२६।८ अ.

---

४७ हे भारतश्रेष्ठा, कोणत्या कालीं देह टाकला असतां योगी परत जन्माला येत नाहींत व कोणत्या कालीं जन्माला येतात तो काल मी सांगतो

४८ अग्नि प्रज्वलीत असणे, दिवस, शुक्ल पक्ष, उत्तरायणाचे सहा महिने, अशा काळीं मृत्यु पावलेले ब्रम्हपदाला जातात.

४९ धूर, रात्र, तसेच कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहामहिने, अशा काळीं मरण पावलेले योगी चन्द्रलोकाला जाऊन परत मृत्यु लोकांत जन्माला येतात.

५० या प्रमाणें जगांतील हे शुक्ल व कृष्ण - देवयान व पितृयान असे दोन मार्ग शाश्वत मानले गेले आहेत. एका मार्गानें जाणारा परत जन्माला येत नाहीं व दुसऱ्याने परत जन्माला येतो,

५१ नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यतिकश्चन ।
तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥
२७।८ अ-

५२ वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥
२८।८ अ.

---

५१ हे पार्था, या दोन मार्गांना तत्वतः जाणणारा योगी मोह पावत नाहीं, म्हणून हे अर्जुना ! तूं सर्वकाल योगयुक्त असा हो,

५२ योगी हें सर्व ज्ञान विज्ञान प्राप्त झाल्यामुळें, वेदांत, तपश्चर्येंत व दानांत जे पुण्यरूपफळ सांगितलें आहे त्या सर्वांच्या पलीकडे जातो आणि श्रेष्ठ अशा परम पदाला जाऊन पोचतो,



# अध्याय १४ वा.

## स्थितप्रज्ञता योग.



बुद्धोयोग मार्गानें म्हणजे श्वासोच्छावासा बरोबर केलेल्या नामस्मरणानें मानवी निर्गुण बुद्धि आत्मस्थित झाल्यावर मनुष्याचीं वृत्ती कशी राहते याचे वर्णन या अध्यायांत आलेलें आहे. त्याच बरोबर जर योगाभ्यास पुरा होऊ शकला नाहीं तर पुनर्जन्मांत तरी तो पुनः चालू होतो व उशीरानें जन्मजन्मांतरीं कां होईना, आत्मप्राप्ति निश्चयानें होतेच, अशी आशाहि जातां जातां दाखवून ठेवलेली आहे.



# अध्याय १४ वा.

## स्थितप्रज्ञता — योग.

अर्जुन उवाच —

१ योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिंस्थिराम् ॥
३३।६ अ.

२ चंचलं हि मनःकृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्येवायोरिव सुदुष्करम् ॥
३४।६ अ.

श्रीभगवानुवाच -

३ असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥
३५।६ अ.

४ असंयतात्मनायोगो दुष्पाप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥
३६।६ अ,

---

**अर्जुन म्हणाला** — १ हे मधुसूदना, समत्वाचा हा जो बुद्धियोग तुम्ही सांगितला, तो मनाच्या चंचलतेमुळें कायमचा टिकेल, असें मला दिसत नाहीं,

२ हे कृष्णा ! कारण, मन हे चंचल, उचंबळ, बलिष्ट व दृढ आहे; त्याचा निग्रह करणें हें वाऱ्याची मोट बांधण्या इतकें मला अत्यंत कठीण वाटतें.

**श्रीभगवान् म्हणाले** — ३ हे महाबाहो, खरोखर हें मन चंचल व आवरण्यास फार कठीण आहे; पण हें कौंतेय, अभ्यासानें व वैराग्यानें त्याला जिकतां येतें.

४ ज्याचें मन स्वाधीन नाही त्याला हा योग साधणें फार कठीण; पण मन ताब्यांत टेवणाऱ्याला उपायानें व प्रयत्नानें हा योम साधणें शक्य आहे, असें माझे मत आहे.

अर्जुन उवाच --

५ अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
अप्राप्य योग संसिद्धि कां गतिं कृष्ण गच्छति ॥
३७/६ अ.

६ कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणःपथि ॥
३८/६ अ,

७ एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥
३९/६ अ.

श्रीभगवानुवाच –

८ पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
नहि कल्याणकृत्कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति ॥
४०/६ अ.

---

**अर्जुन म्हणाला** — ५ हे कृष्णा, एकादा पुरूष, श्रद्धेनें युक्त असून प्रयत्न ढिला पडल्यामुळें योगसिद्धि प्राप्त होण्यापूर्वीच योगापासून चलित चित्त झाला, तर तो कोणत्या गतीला जातो ?

६ हे पराक्रमी कृष्णा, ब्रम्हप्राप्तिच्या मार्गांत मोहानें स्तित न झाल्यास प्रपंच व परमार्थ या दोही कडून भ्रष्ट झालेला हा पुरुष वितळलेल्या ढगाप्रमाणे नाश तर पावत नाहींना ?

७ हें कृष्णां, हा माझा संशय निःशेष दूर करण्यास तुम्हींच योग्य आहांत. तुम्हां वांचून या संशयाचा परिहार करणाराकोणी दिसत नाहीं,

**श्रीभगवान् म्हणाले** — ८ पार्था, त्याला इहलोकीं व परलोकीं ही विनाश नाहीं, बावा, आत्मकल्याण कारक करणारा कोणींही अधोगतिला जात नाहीं.

९ प्रांप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥
४१।६ अ

१० अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥
४२।६ अ,

११ तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यततें च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥
४३।६ अ.

१२ पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रीयते ह्यवशोऽपिसः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्द ब्रह्मातिवर्तते ॥
४४।६ अ.

१३ प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्ध किल्विष. ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥
४५।६ अ.

---

९ योगभ्रष्ट पुरूष, पुण्यकर्मानीं प्राप्त होणाऱ्या लोकीं पोंचून तेथें दीर्घ काल पर्यंत राहून नंतर शुद्धाचरणीं श्रीमंताच्या घरी जन्म घेतो.

१० अथवा ज्ञानवान् अशा योग्यांच्या कुळांत जन्माला येतो, अशा प्रकारचा जन्म या लोकीं, अतिसय दुर्लभ आहे,

११ तेथें त्याला पूर्व जन्मातला बुद्धिसंस्कार अनायासानें प्राप्त होतो; आणि तो योगाच्या सिद्धिसाठी पूर्वी पेंक्षा अधिक प्रयत्न पुनः जोरांत करूं लागतो,

१२ तो विषयाधीन परतंत्र झाला असला तरी पूर्वजन्मीच्या अभ्यासानें भक्तीकडे ओढला जातो. योगमार्गाची ज्याला नुसती जिज्ञासा होतें तोही वेदाला उल्लंघून जातो.

१३ परंतु प्रयत्नपूर्वक अभ्यास करणारा योगी पापांतून शुद्ध होऊन अनेक जन्मोच्या संस्कारांनी याच जन्मांत सिद्धि पावून उत्तम गतीला पोचतो.

१४ तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥
४६।६ अ.

१५ योगिनामपि सर्वेषां मद्‌गतेनांतरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥
४७।६ अ.

१६ सर्व भूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥
३१।६ अ.

१७ ज्ञानविज्ञान तृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥
८।६ अ.

१८ सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥
९।६ अ.

---

१४ तपस्व्यापेक्षा योगी श्रेष्ठ, ज्ञान्यापेक्षांही तो श्रेष्ठ व सकाम कर्मठापेक्षां ही तो श्रेष्ठ असतो. म्हणून हे अर्जुना, तुं योगी बुद्धियोगी हो.

१५ सर्व योग्यां मध्येंही योगयुक्त होऊन जो श्रद्धापूर्वक मला निरंतर भजतो त्याला मी सर्वांत श्रेष्ठ भक्त मानतो.

१६ जो योगी सर्व भूतांत असणाऱ्या मला अभेदबुद्धीने भजतो तो सर्वकर्म करीत असला तरीं माझ्याच ठिकाणीं स्थित झालेला असतो.

१७ जितेंद्रिय, सोनें, दगड, माती समान लेखणारा, निर्विकार, आत्मज्ञान व सृष्टीज्ञान यांनी अंतःकरण तृप्त झालेला असा जो योगी त्यालाच योगारूढ म्हणतात

१८ हितकर्ता, मित्र, वैरी, उदासीन, मध्यस्थ, द्वेष करण्या सारखे बांधव, साधु आणि पापी, यांच्या ठायीं समबुद्धि ठेवणारा अत्यंत श्रेष्ठ होय.

१९ तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिः भक्तिमान्मे प्रियो नरः ।

१९/१२ अ.

अर्जुनउवाच —

२० स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥

५४।२ अ.

श्रीभगवानुवाच –

२१ प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥

५५।२ अ.

२२ दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥

५६।२ अ.

---

१९ निंदा स्तुति समान मानणारा, मौनी, मिळेल त्यांत संतोष मानणारा, व मनांत आसक्ति न ठेवणारा असा स्थिरबुद्धि भक्तिमान् पुरूष मला प्रिय होतो.

**अर्जुन म्हणाला:**– २० हे केशवा, समबुध्दि झालेल्या स्थितप्रज्ञाचीं लक्षणें काय ? स्थितप्रज्ञ कसा बोलतो, व कसा चालतो ?

**श्रीभगवान् म्हणाले:**- २१ जेंव्हां मनुष्य मनांतील सर्व विषय वासना सोडतो आणि आत्मस्वरूपांत आत्मबुध्दिनें संतुष्ट होऊन राहतो तेव्हां त्याला 'स्थितप्रज्ञ' म्हणतात.

२२ दु;खांत ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, सुखांत ज्याची आसक्ति नसते, ज्यानें प्रीति, भय, क्रोध हीं सोडली आहेत, त्याला 'स्थितप्रज्ञ' मुनि म्हणतात.

२३ यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥
५७।२ अ.

२४ यदासंहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥
५८/२ अ.

२५ यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभंमनः ॥
६०।२ अ.

२६ तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥
६१।२ अ.

२७ इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनु विधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥
६७/२ अ.

---

२३ जो सर्वत्र अनासक्त असतो, शुभाशुभ बरेवाईट प्रसंग आले असतां जो त्याबद्दल हर्ष किंवा द्वेष करीत नाही, त्याची बुद्धी स्थिर होते.

२४ कासव जसें आपले अवयव सर्व बाजूंनीं आंखडुन घेंते, त्या प्रमाणें जेंव्हां हा ( स्थितप्रज्ञ ) आपलीं इंद्रियें त्यांच्या विषयांतून आवरून घेतो तेंव्हां त्याची बुद्धि स्थिर होते.

२५ हे अर्जुना प्रयत्नशील विचारी पुरूषाच्याही मनाला ही उच्छृंखल इंद्रिये बलात्काराने ओढून घेतात

२६ म्हणून सर्व इंद्रियांचे दमन करून बुद्धियोगानें माझ्याठिकाणीं स्थिर झालेलें ज्याचीं इंद्रियें स्वाधीन झालेली असतात, त्याची बुद्धि स्थिर होते

२७ कारण विषयांत इंद्रियें संचरत असतां मन ज्या इंद्रियांकडे जातें तें इंद्रिय, वारा ज्या प्रमाणें पाण्यांत नांव ओढून नेतो, त्या प्रमाणें पुरुषाचीं बुद्धि खेचून नेंते.

२८ तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥

६८।२ अ.

२९ न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रम्हणि स्थितः ॥

२०/५ अ.

३० अव्देष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखःक्षमी ॥

१३।१२ अ.

३१ यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः सच मे प्रियः ॥

१५।१२ अ.

३२ अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥

१६।१२ अ.

---

२८ म्हणून हे महाबाहो, विषयांपासून ज्याचीं इंद्रियें सत्र प्रकारें आवरली जातात, त्याचीच बुद्धि स्थिर होते.

२९ ज्याची बुध्दिस्थिर झाली, जो मोह पावत नाहीं. जो ब्रम्हांत स्थिर झाला असा ब्रम्हवेत्ता प्रिय वस्तु प्राप्त झाली असतां हर्ष मानीत नाहीं व अप्रीय वस्तु प्राप्त झाली असतां उद्विग्न होत नाही.

३० कोणत्याही भूतांचा द्वेष न करणारा, मित्रत्वानें वागणारा, दयाळू, ममता रहित, अहंकार रहित, सुख दुःख समान मानणारा, क्षमाशील.

३१ ज्याच्या पासून लोकांना त्रास नाहीं व लोकांपासून ज्याला त्रास नाहीं, हर्ष, क्रोध, भय व उद्वेग या पासून अलिप्त, असा भक्त मला प्रिय होतो.

३२ निरपेक्ष, पवित्र, दक्ष, उदासीन, खेद रहित, सर्व कर्तृत्वाभि मानाचा त्याग करणारा असा भक्त मला प्रिय असतो.

३३ यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥
१७।१२ अ.

३४ समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥
१८।१२ अ.

३५ असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥
४९।१८ अ.

३६ सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।
समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥
५०।१८ अ.

३७ सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥
५६।१८ अ.

---

३३ जो हर्षित होत नाहीं, द्वेष करीत नाहीं, शोक करीत नाहीं, इच्छा करीत नाहीं, शुभाशुभ कर्माचा त्याग करणारा असतो, तो भक्त मला प्रिय होतो.

३४ शत्रु आणि मित्र, मान आणि अपमान, शीत आणि उष्ण, सुख आणि दुःख हीं ज्याला समान झालीं, ज्याला कोणतीच आसक्ति नाहीं.

३५ ज्याची बुद्धि सर्वत्र निरासक्त, ज्यानें देहबुद्धिला आत्मबुद्धि केली, जो निरिच्छ झाला त्याला संकल्परहित स्थितीमुळें परत श्रेष्ठ अशी नैष्कर्म्यसिद्धि - कर्माकर्मातीत स्थिति - प्राप्त होते.

३६ हे कौन्तेया, नैष्कर्म्यसिद्धि - कर्माकर्मातीत स्थिति - प्राप्त झाल्यावर ज्ञानाची परम निष्ठा - सीमा - जें ब्रम्ह तें प्राप्त होतें हे लक्ष्यांत ठेव.

३७ मत्परायण झालेला, सदा सर्व कर्में करीत असतांही माझ्या प्रसादानें शास्वत व अविनाशी पदाला प्राप्त होतो.

# अध्याय १५ वा.

## कर्मयोग.



" शरीर माद्यं खलु धर्मसाधनम् " आत्मप्राप्ती करतां शरीर सुस्थितींत असण्याची आवश्यकता असते. शरीरयात्रा सिद्धिकरतां कर्माचरण हें केलेंच पाहिजे, म्हणून कर्म हें शरीरधारी प्राण्याला चुकवितां येणार नाहीं, काटयांच्या रानांतून जातानां पायांत पायतन घालून गेले तर काटयांचा उपद्रव न होतां सुखानें प्रवास करतां येतो. प्रारब्धकर्म संपेपर्यंत देह सोडतां येत नाहीं व देहामुळें देहकर्मही चुकत नाहीं तेव्हां कर्म करतांना अशी युक्ति पाहिजे कीं, जिच्यामुळें प्रारब्धकर्म भोगतानां कर्मांत राहूनही अकर्तेपणा पदरांत पडून आत्मप्राप्ती होऊं शकेल. कर्म करीत असतां परमेश्वराशीं योग राहणें—परमेश्वरा—पासून वियोग न होणें याचें नांव कर्मयोग. कर्म करणें हा आत्मप्राप्तीचा मार्ग ठरत नाहीं. जगांत प्रत्येक जीवमात्र कर्म करीतच असतो. मग प्रत्येकाला आत्मप्राप्ती होत असते काय ? म्हणून बुध्दियोग युक्त होऊन, म्हणजे नामस्मरण करीत मागील तिन्हीं अध्यायांत सांगितल्या प्रमाणें अभ्यास करून कर्म करीत राहणें हाच कर्मयोगाचा मार्ग ठरतो. ज्याप्रमाणें ज्ञानयोगाचा मार्ग बुध्दियोग हा आहे त्याच प्रमाणें कर्मयोगाचा मार्गही बुध्दियोग हाच आहे. योग याचा अर्थ मार्ग असा करूं नये, ज्ञानयोग, म्हणजे ज्ञानाची माहिती किंवा ज्ञानाचा विषय, कर्मयोग म्हणजे कर्माची माहिती किंवा विषय, असा करावा, खुद्द योग हा शब्दही परमेश्वर प्राप्ती या अर्थानें वापरला आहे. योग हा योगाचा मार्ग होऊं शकणार नाहीं, बुध्दितत्वाचा सर्व विषय, नीट समजून घेऊन बुध्दितत्वाचा उपयोग परमेश्वराच्या नामाकडें केला तरच आत्मप्राप्ति होऊं शकते व तोच आत्मप्राप्तिचा एकमेव मार्ग ठरतो. नामस्मरण करीत कर्म कर म्हणजे तूं अकर्ता होशील हाच या अध्यायांतील विषय आहे. श्री तुकाराम महाराजही येवढयाच करता सर्वांना " हाकारोनी सांगे तुका " नाम घेतां राहो नका " अशी चोहोंबाजूनीं आरोळी देत आहेत ! म्हणून नामस्मरण,

सोडून केवळ कर्मात अडकून, आम्ही कर्मयोगी " आहोंत अशी कोणी आत्मवंचना करून घेऊं नये हेंच श्रेयस्कर ! अज्ञानी राहून कर्म करीत राहूं नये हें शिकवण्याकरतांच हा येवढा गीतेचा खटाटोप आहे. नाहींतर सामान्य माणसा प्रमाणें, तात्पुरत्या स्मशान वैराग्याने विषादी बनलेला अर्जून, कांहीं वेळाने वैराग्याचा भार ओसरल्यावर, आपल्या क्षत्रिय धर्म प्रकृति प्रमाणें युध्दाला निश्चित उभा राहिला असता व याची भगवान श्रीकृष्णांना पूर्ण कल्पना होती व तेवढ्या करतां गीतेची मुळींच जरूर नव्हती, परतु प्रकृति धर्मांनें केलेलें अज्ञानी अवस्थेंतील कर्म मनुष्याला अधोगतीला नेत असतें, म्हणून ज्ञानी होऊन कर्म करण्याच्या उपदेशाकरता येंवढी गीता सांगून, त्यांत ज्ञान म्हणजे काय, ज्ञानाचा मार्ग कोणता व त्या मार्गाची फलश्रुति काय असते, या सर्वांचा यथासांग उहापोह केलेला आहे, नवीन तयार केलेली होडी गाडींत घालून नदी पर्यंत न्यावी लागतें व गाडा नदीपलीकडे पोचण्या करता नांवेंत घालून न्यावा लागतो; नावेवर गाडा व गाड्यावर नाव या प्रमाणेंच नामस्मरणानें कर्माला पूर्णत्व येतें व नामस्मरणाच्या कर्मांनेंच अकर्मत्वाची म्हणजे निर्गूणत्वाची प्राप्ति होत असते. येंवढ्यासाठींच श्रीकृष्णांनी,, कर्मांत अकर्म व अकर्मांत कर्म जाणणाराच खरा बुध्दिमान व सर्व कर्म कर्ता होऊं शकतो असा शेवटचा अभिप्राय व्यक्त केला आहे.



# अध्याय १५ वा.

## कर्मयोग.

अर्जुन उवाच —

१ ज्यायसी चेत्कर्मणस्ते मताबुद्धिर्जनार्दन ।
तत्किं कर्मणि धोरे मां नियोजयसि केशव ॥
१।३ अ.

२ व्यामिश्रेणेव माक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥
२/३ अ.

श्रीभगवानुवाच —

३ लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानध ।
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥
३।३ अ.

४ न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
नच संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥
४।३ अ.

---

**अर्जुन म्हणाला** — १ हे जनार्दन केशवा, कर्मापेक्षां बुद्धियोग श्रेष्ठ असें तुमचे मत आहे, तर मला या घोर कर्मांत प्रवृत्त कां करतां ?

२ संदिग्ध अशा वाक्यानें तुम्ही माझ्या बुद्धीला जणुं मोहच पाडीत आहां. यास्तव ज्यानें माझें कल्याण होईल असे एकच काय तें निश्चित करून सांगा.

**श्रीभगवान् म्हणाले** — ३ हे निष्पापा, या लोकीं ज्ञान योगाने सांख्यांची व कर्मयोगानें योग्यांची अशीं दोन प्रकारची निष्ठा मोक्ष स्थिति मी तुला पूर्वी सांगितली.

४ कर्माचा आरंभ न केल्यानें पुरूष नैष्कर्म्य पावत नाहीं, किंवा कर्माचा त्याग केल्यानें त्याला आत्मसिद्धि मिळत नाहीं.

५ संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥
२।५ अ.

६ आरुरूक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।
योगारुढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥
३।६ अ,

७ कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारःसउच्यते ॥
६।३ अ.

८ यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥
७/३ अ,

९ नियतं कुरुकर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्धद्ध्येदकर्मणः ॥
८।३ अ

---

५ कर्म संन्यास व कर्मयोग हें दोन्ही परम कल्याण कारक आहेत. पण त्यापैकी कर्म सन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ होय.

६ योगसिद्धि संपादन करूं इच्छिणाऱ्यास निष्काम कर्म हेसाधन सांगीतले आहे. आणि जो योगारूढ झाला त्याला शम - मनाची शांति हें त्याचें ज्ञान परिमाकाचे साधन सांगितलें आहे. ( बुद्धियोगाने बुद्धि आत्मबुद्धि झाल्याखेरीज निष्काम कर्म करतां येत नाहीं व देह बुद्धिमुळें शांतीही टिकत नाहीं )

७ जो मुर्ख पुरुष कर्मेन्द्रियांना हट्टानें आवरून मनानें विषय चिंतन करीत बसतो त्याला दांभिक म्हणतात,

८ पण हे अर्जुना, जो मनानें इन्द्रियांचें नियमन करून आसक्ति न ठेवतां कर्मेंद्रियांनी कर्मयोगाचें आचरण करतो तोच श्रेष्ठ होय.

९ तुझें नियत-सहजधर्मानें नेमलेले-कर्म तुं कर, कारण कर्म न करण्या पेक्षां कर्मकरणें हें श्रेष्ठ होय. कर्म न केल्यानें तुझा शरीर निर्वाह ही सिद्ध होणार नाहीं,

१० यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्म बंधनः ।
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर ॥
९।३ अ,

११ सहयज्ञाः प्रजाःसृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥
१०।३ अ.

१२ देवान्भावयतानेन तें देवा भावयंतु वः ।
परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥
११।३ अ.

१३ इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्तेस्तेन एव सः ॥
१२।३ अ.

१४ यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ।
भुंजते ते त्वघं पापा यें पचंत्यात्मकारणात् ॥
१३।३ अ.

---

१० यज्ञाच्या हेतूनें केलेल्या कर्माखेरीज इतर कर्मानें मानव कर्मबद्ध होतो. म्हणुन हे अर्जुना, आसक्ति सोडून परमेश्वराप्रीत्यर्थ तूं कर्म करीत रहा.

११ पूर्वी यज्ञासह प्रजा उत्पन्न करून ब्रम्हदेव त्यांना म्हणाला, या यज्ञानें तुम्ही अभ्युदय करून घ्या. हा यज्ञ तुमचे मनोरथ पूर्ण करणारा होवो.

१२ यानें तुम्ही देवांना संतुष्ट करा. ते देंव तुम्हाला संतुष्ट करोत, त्या प्रमाणें परस्परांना संतुष्ट करून तुम्ही आपले कल्याण करून घ्या.

१३ यज्ञानें तृप्त झालेले देव तुम्हाला इच्छित भोग्य वस्तु देतील, पण त्यांनीं दिलेले भोग त्यांना अर्पण न करतां जो स्वतःच भोगतो तो चोरच होय.

१४ यज्ञ करुन शेष राहिलेल्या भागाचें सेवन करणारे श्रेष्ठ पुरुष सर्व पातकांतून मुक्त होतात, परंतु जे पापी लोक केवळ आपल्यासाठी अन्न शिजवतात, तें पापच भक्षण करीत असतात.

१५ अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।
यज्ञाद्भयति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥
१४।३ अ.

१६ कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥
१५।३ अ.

१७ एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥
१६।३ अ.

१८ तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥
१९।३ अ.

१९ कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥
२०।३ अ

---

१५ अन्नापासून प्राणी उत्पन्न होतात, पर्जन्यापासून अन्न उत्पन्न होतें, यज्ञापासून पर्जन्य उत्पन्न होतो, आणि कर्मापासून यज्ञाची उत्पत्ती होते.

१६ कर्म वेदांपासून व वेद अविनाशी परमात्म्यापासून उत्पन्न होतात, म्हणून सर्वव्यापी परमात्मा नेहमी यज्ञांत प्रतिष्ठितच असतो असे जाणावे.

१७ या प्रमाणें सुरूलेले हें कर्मचक्र या जगांत जो चालवीत नाहीं. त्याचें आयुष्य पापरूप असून त्या इंद्रियलंपटाचें जिणें व्यर्थ आहे,

१८ म्हणून तूं आसक्ति रहित होऊन आपलें वर्तव्यकर्म नेंहमीं करीत रहा. आसक्ति सोडून कर्म करणाऱ्या पुरूषाला परम पद प्राप्त होत असते.

१९ जनकादिकांनींही कर्मानेंच उत्तम सिद्धि मिळविली, या साठी व लोक हिताकडे लक्ष देऊन ही तुला कर्म करणेंच उचित आहे.

२० यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनः ।
स यत्प्रमाणं कुरूते लोकस्तदनुवर्तते ॥
२१।३ अ.

२१ न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥
२२/३ अ.

२२ यदिह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रित: ।
ममवर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥
२३।३ अ.

२३ उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥
२४।३ अ.

२४ सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथाकुर्वंति भारत ।
कुर्यांद्विद्वांस्तथासक्त श्चिकीर्षुर्लोक संग्रहम् ॥
२५/३ अ.

---

२० कारण, श्रेष्ठ पुरूष जें जें कर्म करतो, तें तेंच इतर लोकही करूं लागतात, तो जें प्रमाण ठरवितो, तदनुसारच लोक वर्तू लागतात.

२१ हे पार्था, तिन्हीं लोकात मलां कांहीं कर्तव्य नाहीं, मला अप्राप्त असें कांही नाहीं व प्राप्त करून घ्यावयाचेही कांहीं नाहीं, तरी मी कर्म करीत असतोंच.

२२ कारण मी जर निरलसपणें कर्मं करीत राहणार नाहीं तर लोक सर्व प्रकारें माझेंच अणुकरण करतील,

२३ मी जर कर्म न करीन, तर हे सर्व लोक नष्टभ्रष्ट होतील व मी वर्ण संकर करणारा व या प्रज्ञाचा ध्यान करणारा होईन.

२४ हे भारता, कर्मासक्त अज्ञानी लोक ज्याप्रमाणें कर्मं करीत असतात, त्या प्रमाणें अनासक्त ज्ञानी पुरूषानेंही लोक कल्याणाच्या इच्छेनें कर्मं करावीत.

२५ न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥
२६/३ अ.

२६ प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥
२९/३ अ.

२७ मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥
३०/३ अ.

२८ ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।
श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥
३१/३ अ.

२९ ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।
सर्वज्ञान विमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥
३२/३ अ.

---

२५ ज्ञानी पुरूषानें कर्मांत आसक्त असलेल्या अज्ञ जनांचा बुद्धि-भेद करूं नये, त्यानें स्वतः सर्व कर्में उत्कृष्टपणें करीत राहून इतरांकडूनही तशीच करवावीत,

२६ प्रकृतीच्या गुणांनी वेडावलेले लोक गुण व कर्मे यांत आसक्त होतात अशा अर्धवट अज्ञ लोकांचा पूर्ण ज्ञानी पुरूषानें बुध्दिभेद करूं नये.

२७ तूं आत्मबुद्धि युक्त चित्तानें सर्व कर्मे करून मला अर्पण कर आणि फळाची आशा व ममत्व सोडून शोक रहित होऊन युध्द कर

२८ जे लोक श्रध्दाळू व दोषदृष्टि रहित होऊन माझ्या या मता प्रमाणें निरंतर वागतात. तेही कर्मबंधना पासून मुक्त, होतात,

२९ परंतु जें दोषैक दृष्टीचे लोक माझ्या या मताला अनुसरून वागत नाहींत, ते सर्व ज्ञानाला मुकलेलें, नष्ट व अविचारी होत असे जाण,

३० किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥
१६।४ अ.

३१ कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥
१७।४ अ.

३२ नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ॥
२३।१८ अ.

३३ यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥
२४।१८ अ.

३४ अनुबंधं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम् ।
मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥
२५।१८ अ.

---

३० कर्म कोणतें व अकर्म कोणतें हें ठरवितांना ज्ञानी लोकही मोहित झालेले आहेत; जें जाणले असतां पापापासून तूं मुक्त होशील असें कर्म मी तुला सांगतो.

३१ कर्म काय, विकर्म काय, व अकर्म म्हणजे काय हें सर्व जाणले पाहिजे. कारण कर्मांची गति मोठी गूढ आहे,

३२ फलासक्ति न ठेवणाऱ्या पुरूषाकडून जें नियत कर्म कर्तृत्वाभिमान व रागद्वेष सोडून केले जाते; त्याला 'सात्विक' कर्म म्हणतात.

३३ जें फलाची इच्छा धारणाऱ्या पुरुषाकडून अहंकारपूर्वक व पुष्कळ परिश्रम पूर्वक केले जातें, त्यास 'राजस' कर्म म्हणतात.

३४ जें कर्म अनुबंध—परिणाम, नाश, हिंसा व आपले सामर्थ्य-यांचा विचार न करतां मोहानें केलें जाते, त्यास 'तामस' कर्म म्हणतात.

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥
२६।१८ अ.

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥
२७।१८ अ.

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥
२८।१८ अ.

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥
१७।३ अ.

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।
न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥
१८।३ अ.

---

आसक्तिरहित, निरहंकारी, धैर्य व उत्साह यांनीं युक्त, सिद्धि व असिद्धि या दोहोंत निर्विकार राहणारा, असा जो कर्ता त्यास ‘ सात्विक ’ कर्ता म्हणतात.
विषयासक्त, कर्मफलासक्त, लोभी, घातकी, अपवित्र हर्ष व शोक यांनी युक्त असा जो असतो त्याला ‘ राजस ’ कर्ता म्हणतात.
अयुक्त, अविचारी, ताठ्यानें वागणारा, ठक दुसऱ्याचा अपमान करणारा, आळशी, दुर्मुख, दीर्घसुत्री अशा अज्ञानी कृत्यास ‘तामस’ कर्ता म्हणतात,
परंतु जो केवळ आत्म्यांतच रत असतो, आत्म्यांतच जो तृप्त व आत्मसुखानेच जो संतुष्ट, त्याला मात्र कांहीं कर्तव्य उरत नाहीं. कर्म करण्यांत अगर न करण्यांत त्याचा कांहीं लाभ किंवा हानी नसतें, तसेंच कोणत्याही प्राण्याकडून त्याला कांहीं प्रयोजन साधावयाचें नसतें.

४० यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥
१९।४ अ.

४१ त्यक्त्वा कर्म फलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥
२०।४ अ.

४२ निराशीर्यतचित्तात्मा त्यक्त सर्व परिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥
२१।४ अ.

४३ यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।
समःसद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥
२२।४ अ.

४४ गतसंगस्यमुक्तस्य ज्ञानावस्थित चेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥
२३।४ अ,

---

४० ज्याचें सर्व उद्योग फळेच्छा व आसक्ति रहित होत असतात. आणि ज्ञानाग्नीनें ज्याचीं कर्में दग्ध झालेलीं आहेत, त्याला ज्ञाते पुरुष ‘ पंडित ’ असें म्हणतात,

४१ कर्माचें फल व कर्तृत्वाभिमान सोडून जो सदा तृप्त व निराश्रय अलिप्त – असतो, तो कर्मात प्रवृत्त झाला तरी वस्तुतः कांहींच करीत नाहीं.

४२ निरीच्छ होऊन शरीराचें व चित्ताचें नियमन करणारा, आणि सर्व भोगसामुग्रीचा त्याग करणारा पुरुष केवळ शरीर संबंधी कर्म करीत अला तरी पापाला पात्र होत नाहीं;

४३ यदृच्छेने - सहजगत्या जें मिळेल त्यांत संतुष्ट ( सुख दुःखादि ) द्वंद्वापासून अलिप्त, निर्मत्सर, सिद्धि व असिद्धि यांत सम राहणारा पुरुष करीत असला तरी त्यांत बंधन पावत नाहीं.

४४ आसक्तिरहित, आत्मयुक्त मुक्त, ज्ञानांत ( स्वस्वरूपांत ) स्थिर चित्त झालेला, यज्ञार्थ कर्म करणारा, अशा पुरुषा चें समग्रकर्म ब्रम्हार्पण होतें,

४५ ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥
२४।४ अ.

४६ योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्न संशयम् ।
आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥
४१।४ अ.

४७ कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ॥
स बुद्धिमान्मनुष्येषु सयुक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥
१८।४ अ.

---

४५ अर्पण—यज्ञाचीं साधनें ब्रम्ह, आहुति ब्रम्ह, हवनाग्नि व हवन करणारा ब्रम्ह याप्रमाणें सर्व कर्में ज्याला ब्रम्ह वाटतात, व अशा रीतीनें ब्रम्ह स्वरूपांत ज्याची बुद्धि स्थिर झाली, तो ब्रम्हपदालाच जाणार,

४६ हे धनंजया, आपण भोग बुद्धियुक्त होऊन ज्यानें आपलीं कर्में ब्रम्हार्पण केलीं, ज्ञानानें ज्याचें संशय नाहींसे झाले, अशा आत्मनिष्ठ पुरूषाला कर्में बद्ध करीत नाहींत,

४७ कर्मांत अकर्म व अकर्मांत कर्म जो जाणुं शकतो तो सर्व मनुष्यांत बुद्धिमान व योगी होऊन सर्व कर्मकर्ताही ह्रोच होतो.



# अध्याय १६ वा.

## संन्यास योग.



संन्यास म्हणजे काय, याचें वर्णन या अध्यायांत केलेलें आहे, व संन्यास विषया बरोबर त्यागाचा वियषहीं यांत निर्दिष्ट केला आहे. बुद्धियोगा खेरीज संन्यास होणें अशक्य आहे, हें तत्व यांत सांगून, संकल्पन्यासः संन्यासः, किंवा कर्मफलन्यासः संन्यासः, हें संन्यास लक्षण नामस्मरणाविरहित अशक्य आहें, सूचित केलें आहे, ज्ञान योग व कर्मयोग यांच प्रमाणें संन्यास योग म्हणजे संन्यास विषयाचे विवरण व संन्यास प्राप्तींचा मार्ग किंवा संकल्पातीत होण्यांचा मार्ग म्हणजे नामस्मरण मार्ग हाच होय !



# अध्याय १८ वा.

## संन्यास योग.

अर्जुन उवाच —

१ संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूद ॥
१।१८ अ.

२ संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगंच शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥
१/५ अ.

श्रीभगवानुवाच –

३ काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयोविदुः ।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥
२।१८ अ.

४ त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपः कर्म न त्याज्यमिति चापरे ॥
३।१८ अ.

---

**अर्जुन म्हणाला –** १ हे हृषीकेशा, केशिदैत्यांतका, महाबाहो, संन्यास, व त्याग यांचें तत्व मी वेगळे वेगळे जाणुं इच्छितो.

२ कृष्णा, एकदा कर्म संन्यासाची व पुनः कर्मयोगाची प्रशंसा करतां; या दोहोंपैकीं जे अधिक श्रेयस्कर असेल ते निश्चित करून मला सांगा,

**श्रीभगवान् म्हणाले –** ३ काम्य कर्में सोडणें याला ज्ञानी लोक 'संन्यास' म्हणतात; सर्व कर्मफलांचा त्याग करणें याला विवेकी लोक 'त्याग' म्हणतात.

४ कर्म सदोष असल्यामुळें त्याचा त्याग करावा असें कांहीं विद्वान म्हणतात, तर यज्ञदानतपादि कर्में टाकूं नये असें दुसरे म्हणतात.

५ निश्चयं श्रृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम् ।
त्यागोहि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥
४।१८ अ.

६ यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥
५/१८ अ.

७ एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥
६।१८ अ,

८ नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥
७।१८ अ.

९ दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥
८/१८ अ,

---

५ हे भरतश्रेष्ठा, त्यागा विषयीं माझा निर्णय ऐक, हे पुरुषश्रेष्ठा, त्याग तीन प्रकारचा सांगितला आहे.

६ यज्ञ, दान व तपरूप कर्म सोडूं नये, तें केलेंच पाहिजे. यज्ञ, दान व तप हीं कर्में विचारी पुरुषाना पावन करणारीं आहेत.

७ हे पार्था हीं कर्मेंहीं आसक्तीचा व फलाचा त्याग करून केलीं पाहिजेत, हे माझें निश्चित असें उत्तम मत आहे.

८ नियत-शास्त्रविहित कर्माचा त्याग करणें योग्य नाही, मोहानें त्याचा त्याग केला असता त्याला ‘ तामस ’ त्याग म्हणतात,

९ शरीराला कष्ट होतील या भीतीनें दुःख कारक म्हणून जर कर्माचा त्याग केला तर तो राजस त्याग होऊन त्यागाचे फळ मिळणार नाहीं.

१० कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥
९।१८ अ.

११ न द्वेष्टयकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।
त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥
१०।१८ अ.

१२ न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्म फलत्यागी स त्यागी त्यभिधीयते ॥
११।१८ अ.

१३ अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥
१२।१८ अ.

१४ ज्ञेयः स नित्य संन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।
निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥
३/५ अ.

---

१० हे अर्जुना, आसक्ति व फलाशा सोडून, कर्तव्य म्हणून, जें शास्त्र–विहीत कर्म केलें जातें त्याचा कर्मफल त्याग हा सात्विक त्याग समजला जातो,

११ जो अप्रिय कर्मांचा कंटाळा करीत नाहीं व प्रिय कर्मांत आसक्त होत नाही, तो त्याग वृत्तीचा मनुष्य सत्त्वशील, बुद्धीमान व संशय रहित होय.

१२ देहधारी जीवाला कर्मांचा नि:शेष त्याग करणें शक्य नाहीं. या करता जों कर्मफळाचा त्याग करतो तोच 'त्यागी' म्हटला जातो.

१३ अनिष्ट, इष्ट व मिश्र अशीं कर्मांची तीन प्रकारचीं फळें, त्याग न करणाऱ्या पुरूषांना मरणा नंतर मिळत असतात; संन्यासांनाहीं चिकटत नाहींत.

१४ हे महाबाहो, जो कर्मयोगी कोणाचा द्वेष करीत नाही व कशाची इच्छा करीत नाहीं तो नित्य संन्यासीच समजावा कारण, द्वद्वरहित पुरुष संसार बंधनातून सहज मुक्त होतो.

१५ संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥
६।५ अ.

१६ कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥
११।५ अ.

१७ युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फलेसक्तो निबध्यते ॥
१२।५ अ.

१८ सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥
१३।५ अ.

१९ यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।
न ह्यसंन्यस्त संकल्पो योगी भवति कश्चन ॥
२।६ अ.

---

१५ परंतु हे अर्जुना बुद्धियोगावांचून संन्यास-कर्म फलाचा त्याग प्राप्त होणें फार कठीण आहे. बुद्धियोगी मुनीला ब्रम्हाची प्राप्ति त्वरित होते.

१६ कर्मयोगी लोक कायेनें, मनानें, बुद्धीनें आणि केवळ इंद्रियांनीं आसक्ति सोडून आत्मशुद्धीकरतां कर्मैं करीत असतात.

१८ बुद्धियोगी पुरुष कर्मफल टाकून आत्मप्राप्तिरूप शांति मिळवतो. आत्मबुद्धियुक्त नसलेला पुरुष कामनेच्या योगानें फलासक्त होऊन बद्ध होतो.

१८ जितेंद्रिय असा बुद्धियोगी पुरूष सर्व कर्मांचा मनानें संन्यास करून नऊ द्वारांच्या देह नगरींत कांहीं न करतां व न करवितां आत्मसुखांत राहतो.

१९ मांदवा, ज्याला संन्यास म्हणतात तो योगच आहे. असें समज. कारण संकल्पाचा फला शेचा त्याग केल्या खेरीज कोणीही योगी होऊं शकत नाहीं.

२० यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।
सर्वं संकल्प संन्यासी योगारूढस्तदोच्यतें ॥

४।६ अ.

२१ अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्मकरोति यः ।
स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥

१।६ अ.

---

२० जेंव्हां तो इंद्रिय भोगांच्या व कर्मांच्या ठिकाणींही आसक्त होत नाहीं व सर्व संकल्प टाकून देतो तेव्हांच त्याला 'योगारूढ' असें म्हणतात ( तोच खरा सन्यासी )

२१ कर्मफलाची अपेक्षा न करतां जो कर्तव्य कर्म करतो, तोच 'संन्यासी' व तोच 'योगी' होय. गृहस्थाश्रमांचा त्याग करणारा व कांहींहीं कर्म न करणारा 'संन्यासी ही नव्हे व 'योगीही' नव्हे.



# अध्याय १७ वा.

## विश्वरूप – दर्शन – योग.



' सर्व भुतानिचात्मनि, ' ' सर्वं च मयि पश्यनि ' ' भूतानि भगवत्यात्मनि ' :– आत्म्याच्या ठिकाणीं सर्व विश्व, माझ्या ठिकाणीं सर्व विश्व, परमेश्वराच्या ठिकाणीं सर्व विश्व वगैरे आत्मसाक्षात्कारी वाक्यांच्या अर्थाचें प्रात्यक्षिक दाखविण्याकरतां अर्जुनानें प्रार्थना केल्यावरून या अध्यायांत भगवंतांनीं अर्जुनाला दिव्य दृष्टि देऊन आपल्या देहांत सर्व विश्व प्रकट करून दाखविलें. आतां पर्यंत सांगितलेल्या शास्त्रप्रचीतीचा मेळ विश्वरूप दर्शनानें गुरुप्रचीतींत घालून, अर्जुनाला, आत्मप्रचीतीनें, हाच अनुभव अभ्यासानें प्राप्त करून घेण्यास मोकळा केला आहे.



# अध्याय १७ वा.

## विश्वरूप – दर्शन – योग.

अर्जुन उवाच –

१ मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।
यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥
१।११ अ.

२ भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥
२।११ अ.

३ एकमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥

४ मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।
योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥

---

**अर्जुन म्हणाला** – १ मजवर कृपा करण्यासाठीं अध्यात्म नामक जें अत्यंत गुह्य ज्ञान तुम्ही मला सांगितलें, त्यानें माझा मोह गेला.

२ कारण, हे कमलपत्राक्षा, आपणांकडून मी भूतांची उत्पत्ति व प्रलय या विषयीं विस्तारपूर्वक ऐकलें आहे, तसेंच तुमचे अविनाशी माहात्म्य ही ऐकलें आहे.

३ हे परमेश्वरा, तुम्ही आपलें जसें वर्णन केलें, तसेंच तें आहे खास. हे पुरूषोत्तम, तुमचें ईश्वरी ( ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बल, वीर्य व तेज युक्त ) स्वरूप मी पाहूं इच्छितो.

४ हे प्रभो. जर तें स्वरूप मला पाहतां येणें शक्य आहे असें तुम्हांस वाटेल, तर हे योगेश्वरा, आपले ते तेजस्वी ईश्वरी रूप मला दाखवा.

श्रीभगवानुवाच –

५ पश्य मे पार्थ रूपाणी शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥

६ पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥

७ इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥

८ न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥

संजयउवाच –

९ एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥

---

**श्रीभगवान् म्हणाले–** ५ हे पार्था, आतां तूं माझीं नाना प्रकारचीं नाना रंगांचीं व नाना आकारांचीं शेकडों हजारों अलौकिक रुपें पहा.

६ हे भारता, आदित्य ( अदितीचे द्वादश पुत्र ), अकरा रूद्र, दोन अश्विनीकुमार एकूण पन्नास मरुद्गण, यांना पहा. पूर्वी कधीं न पाहिलेलीं आश्चर्य कारक रूपें पहा.

७ हे गुडाकेशा, आज येथें माझ्या देहांत एकत्रित असलेलें चराचर जगत् पहा, तसेंच आणखी जे कांहीं तूं पाहूं इच्छितोस तें सर्व पहा.

८ पण तुझ्या या चर्मचक्षूंनी तूं मला पाहूं शकणार नाहींस, तुला मी दिव्य दृष्टि देतो, तिने, तूं माझे ईश्वरी योगसामर्थ्य – आत्मबुद्धि सामर्थ्य पहा !

**संजय म्हणाला** — ९ हे राजा, या प्रमाणें बोलून महायोगेश्वर हो श्रीकृष्ण यांनी आपलें परम श्रेष्ठ ईश्वरी रूप पार्थाला दाखविलें,

१० अनेकवक्त्रनयनमनेकाद्‌भुत दर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यनेकोद्यतायुधम् ।
११ दिव्यमाल्यांबरधरं दिव्यागंधानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥
१२ दिवि सूर्यसहस्त्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्‌भासस्तस्य महात्मनः ॥
१३ तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देव देवस्य शरीरे पांडवस्तदा ।
१४ ततःस विस्मया विष्टो हृष्टरोमा धनंजयः ।
प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥

अर्जुन उवाच -

१५ पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रम्हाणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥

---

१० ज्याला असंख्य मुखें व डोळे आहेत, ज्यांत अनेक अद्‌भुत गोष्ठी दिसत आहेत, ज्यांवर अनेक दिव्य अलंकार आहेत ज्याच्या हातीं अनेक दिव्य शस्त्रें सज्ज आहेत.

११ ज्यानीं दिव्य पुष्पहार व वस्त्रें धारण केलीं आहेत, ज्यांनें दिव्य सुवासिक उटी लाविली आहे, ज्याला सर्वत्र तोंडेंच तोंडे आहेत व ज्याच्या विशाल पणाला सीमाच नाहीं असें सर्व आश्चर्यांनीं भरलेले स्वरूप अर्जुन पाहतां झाला,

१२ जर आकाशांत हजारों सूर्यांचीं प्रभा एकाच वेळीं प्रगट होईल. तर ती त्या विश्वरूपाच्या प्रभेसारखीं होईल.

१३ त्यावेळीं अर्जूनानें अनेक भागांत विभागलेलें सर्व जग त्या देवाधि देवाच्या देहांत एकत्र स्थित झालेलें असे पाहिलें.

१४ तेव्हां अर्जुन आश्चर्य चकित झाला व त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले, हात जोडून देवाला शिरसा नमस्कार करून तो म्हणाला.

१६ अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।
नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामिविश्वेश्वर विश्वरूप ॥
१७ किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दिप्तिमंतम् ।
पश्यामित्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमयम् ॥
१८ त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरूषो मतो मे ॥
१९ अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्य नेत्रम् ।
पश्यामित्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम ॥
२० द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्टवाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥

---

**अर्जुन म्हणाला:—** १५ हे देवा, तुमच्या या देहांत सर्व देव, गिरनिराळया प्राण्यांचे समुदाय, कमलासनस्थ ब्रम्हदेव, सर्वऋषी व दिव्य सर्प मला दिसत आहेत.

१६ तुम्हांला अनंत बाहु, उदरें, मुखें व नेत्र असून सर्व बाजूनीं तुम्हाला अनंत रूपे आहेत असें मी पाहतो पण हे विश्वेश्वरा, विश्वरूपा, तुमचा आदि मध्य व अंत मला दिसत नाहीं.

१७ मला तुम्हीं किरीट, गदा व चक्र धारण करणारा, सर्वत्र प्रज्वलित अशा अग्नीप्रमाणें व सूर्याप्रमाणें लखलखणारा, अमर्याद, डोळयांनी पाहण्यास अशक्य असे दिसत आहां.

१८ तुम्हींच जाणण्यास योग्य असे अक्षर परब्रम्ह आहा. तुम्हीच या विश्वाचें परम आश्रयस्थान आहां, तुम्हीच शाश्वत धर्माचे रक्षक आहां, तुम्हीच अविनाशी सनातन पुरूष आहां असे मला वाटतें.

१९ आदि मध्य अंत रहित, अनतशक्ति, अनंत भुज, चंद्रसूर्य हेच ज्याचे डोळें व प्रज्वलित अग्नि हेच ज्याचें मुख, असे तुम्ही या विश्वाला आपल्या तेजानें तापवित आहां असें मी पाहत आहे.

२० हे महात्मन्, आकाश व पृथ्वी यां मधिल अंतर आणि दाही दीशा तुम्हीं एकटयानें व्यापून टाकिल्या आहेत. तुमचें हे अद्भुत उग्ररूप पाहून त्रैलोक्याची गाळण उडाली आहे.

२१ अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयोगृणंति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाःस्तुवन्तित्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः।
२२ रुद्रादित्यावसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च॥
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघावीक्षन्तेत्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥
२३ रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वालोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥
२४ नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वाहित्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामिशमं च विष्णो॥
२५ दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥

---

२१ हे सर्व देवगण तुमच्यांतच प्रवेश करीत आहेत, कित्येक भयानें हात जोडून तुमच्या नामाचे व गुणांचे उच्चारण करीत आहेत, ' स्वस्ति ' जगाचें कल्याण असो असे म्हणून उत्तम स्तोत्रानीं महर्षी व सिद्ध यांचे संघ तुमचे स्तवन करीत आहेत.

२२ एकादशरुद्र, द्वादश आदित्य, अष्टवसु तसेंच साधारण, विश्वदेव, अश्विनी, कुमार, मरुद्गण, पितृगण, गंधर्व, यक्ष, राक्षस, व सिद्ध यांचें संघ आश्चर्य चकित होऊन तुमच्याकडे पहात आहेत.

२३ हे महाबाहो, तुमचे हें अनेक तोंडांचें. अनेक नेत्रांचे. अनेक बाहू, मांड्या, व उदरें असलेले, तसेच अनेक दाढांमुळें विक्राळ दिसणारें रूप पाहून सर्व लोक व्याकूळ होऊन गेले अहोत व माझीही तीच अवस्था झाली आहे.

२४ कारण हे विष्णो, आकाशास भिडलेले, तेजस्वी, अनेक वर्णांनीं युक्त, तसंच जबडा पसरलेले, प्रदीप्त व विशाल नेत्रांचें अशा तुम्हाला पाहून माझा अंतरात्मा व्याकूळ झाल्यामुळें मला धैर्य व शांति मिळत नाहीं.

२५ विक्राळ दाढांनीं युक्त व प्रलयकालच्या अग्नीं सारखी प्रज्वलित तुमची मुखें पाहून मला दिशा समजेनाशा झाल्या व सुखही वाटेनासे झाले. यांसाठीं हे देवाधिदेवा, जगन्निवासा मजवर कृपा करा.

२६ अमीहित्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।
भीष्मो, द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥
२७ वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥
२८ यथानदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखाद्रवंति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशंतिवक्त्राण्यभिविज्वलंति ॥
२९ यथाप्रदीप्तंज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥
३० लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥

---

२६ - २७ राजांच्या समुदायांसह धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, तसेच भीष्म, द्रोण, कर्ण आणि आमचे ही मुख्य मुख्य योद्धे या तुमच्या विक्राळ दाढांच्या अनेक भयंकर तोंडांत त्वरेनें शिरत आहेत, व कांहीं दातांमध्यें अडकून मस्तकांचा चुराडा झालेले असे मला दृष्टीस पडत आहेत.

२८ जसें नद्यांचे मोठ मोठे प्रवाह धांव घेऊन समुद्रांत मिळतात, तसें हे नरलोकाचे वीर समुदाय तुमच्या सर्वतः प्रज्वलित अशा मुखांत शिरत आहेत !

२९ प्रदीप्त अग्नींत मोहवश पतंग मरण्याकरतां जसे वेगानें शिरत असतात. तसें हे लोक नाश पावण्यासाठीं तुमच्या मुखांमध्ये मोठया वेगानें शिरत आहेत,

३० हे विष्णो, तुम्ही समग्र लोकांना ज्वाला धडकणाऱ्या मुखांनीं ग्रासीत व चोहोंकडून जिभांनीं चाटीत आहां. तुमच्या उग्र प्रभा आपल्या प्रखर तेजानें संपूर्ण जगाला व्यापून तापवीत आहेत,

३१ उग्ररूप धारण करणारे असें तुम्ही आहां तरी कोण ते मला सांगा. हे देवश्रेष्ठा, तुम्हास नमन असो, तुम्ही प्रसन्न व्हा. तुम्हां आदिपुरुषास तत्वतः जाणण्याची माझी इच्छा आहे. कारण तुमची प्रकृति लीला मला कळत नाहीं.

३१ आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥

श्रीभगवानुवाच –

३२ कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपित्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताःप्रत्यनीकेषु योधाः ॥
३३ तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भूंक्ष्वराज्यंसमृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्य साचिन् ॥
३४ द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्वजेतासि रणे सपत्नान्॥

संजय उवाच --

३५ एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥

---

**श्रीभगवान् म्हणाले –** ३२ जगताचा संहार करणारा मी वाढलेला महाकाळ आहे. यावेळीं या लोकांचा संहार करण्यास्तव मी येथे प्रवृत्त झालों आहे. तुं जरी युद्ध केलें नाहींस तरी या सैन्यांत उभे असलेले सर्व योद्धे जिवंत राहणार नाहींत,

३३ यासाठीं तूं ऊठ, यश मिळव आणि शत्रूंना जिंकून धन धान्यानें समृद्ध अशा राज्याचा उपभोग घे. हे सर्व शूर वीर मी पूर्वीच मारून टाकले आहेत, हे सव्यसाची, तूं नुसता निमित्त हो.

३४ मी मारून ठेवलेल्या भीष्म, द्रोण, जयद्रथ, कर्ण, इत्यादींना व इतर वीरांनाही तुं मार, भिऊं नको, युद्धकर, रणांत तूं शत्रूंना जिंकशील.

**संजय म्हणाला –** ३५ कृष्णाचे हें भाषण ऐकून थरथरा कापणारा अर्जून पुनः हात जोडून नमस्कार करून भीतभीत सद्गदित कंठानें म्हणाला.

**अर्जुन म्हणाला --** ३६ हृषीकेशा, हे योग्यच आहे, कीं तुमच्या नामगुण प्रभावाच्या कीर्तनानें सर्व जग आनंद भरित होऊन तुमच्यावर अनुरक्त होऊन राहिलें आहे. तसेंच राक्षस भयभित होऊन दशदिशा पळत आहेत. व सिध्दांचे संघ तुम्हाला नमस्कार करीत आहेत.

अर्जुन उवाच

३६ स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंतिच सिद्धसंघाः ॥
३७ कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे।
अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥
३८ त्वमादिदेवः पुरूषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वयाततं विश्वमनंतरूप ॥
३९ वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपिनमोनमस्ते ॥
४० नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तुते सर्वत एव सर्व।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषिततोऽसि सर्वः ॥

---

३७ हे महात्मन, ब्रम्हदेवाचाही आदिकर्ता व सर्वांहून श्रेष्ठ अशा तुम्हाला ते कां नमस्कार करणार नाहींत ? हे अनंता ? देवेशा, जगन्निवासा, सत् व असत् आणि त्यांच्याही पलीकडील जे अविनाशीत्व तें सच्चिदानंदघन ब्रम्ह तुम्हीच आहां

३८ तुम्ही आदिदेव, पुराण पुरुष, विश्वाचा आधार, विश्वाला जाणणारे व जाणण्यास योग्य, आणि परंधाम आहा, हे अनंतरूपा, तुम्हीच हें सारें विश्व व्यापिलें आहे,

३९ वायु, यम, अग्नि, वरूण, चंद्र, प्रजापति. व त्यांचाही पिता, ब्रम्हदेव तुम्हींच आहां, तुम्हांला सहस्रशः नमस्कार, पुनश्चहीं तुम्हालाच नमस्कार.

४० हे सर्वात्मका, तुम्हांला समोरून, पाठीमागून आणि सर्व बाजूनीं नमस्कार असो तुमचा पराक्रम अगणित व वीर्य अनंत असून तुम्हीं सर्वांना व्यापून राहिलेले आहां व त्यामुळें सर्वरूप आहां.

४१ सखेतिमत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेत वापि ॥
४२ यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासन भोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥
४३ पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥
४४ तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसिदेव सोढुम् ॥
४५ अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेनच प्रव्यथितं मनोमे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥

---

४१ - ४२ तुमचा महिमा न जाणतां बरोबरीचा मित्र समजून प्रेमानें किंवा प्रमादानें ' हे कृष्णा, हें यादवा, हे सख्या ' असें जें कांहीं मी अमर्याद बोललो असेन व हे अच्युता आहारविहारांत किंवा निजण्या बसण्यांत, एकांती किंवा चार चौघांत मी जो विनोदानें तुमचा अपमान केला असेल, त्या सर्वांबद्दल, अचिंत्य प्रभाव अशा तुमची मी क्षमा मागतो,

४३ तुम्हीं या चराचर जगाचें उत्पादक, पूज्य आणि श्रेष्ठतम गुरू आहां. हे अतुल प्रभावा, त्रैलोक्यांत तुमच्या बरोबरीचा कोणी नाहीं, मग तुमच्याहून अधिक असा कोण मिळणार ?

४४ म्हणून आपल्या चरणांवर, देह वाहून प्रणाम करून स्तुति करण्यास योग्य अशा आपणां ईश्वराला प्रसन्न होण्या विषयीं प्रार्थना करतो. पिता पुत्राचें, सखा सख्याचे, पति पत्नीचें अपराध क्षमा करतो, त्याप्रमाणेंच हे देवा, तुम्हीही माझें अपराध सहन करणें योग्य आहे.

४५ पूर्वी कधीं न पाहिलेले असें आश्चर्यकारक रूप पाहून मला हर्ष झाला; पण भयानेंहीं माझें मन व्याकूळ झालें आहे हे देवेश, जगन्निवासा, आतां प्रसन्न हो आणि आपले चतुर्भूज रूपच मला दाखवा.

४६ मुगुट धारण केलेलें व हातीं गदाचक्र घेतलेले असेच मी तुम्हांला पाहूं इच्छितो. हे सहस्रबाहो, विश्वमूर्ते, आपण त्या चतुर्भूज रूपानेंच आतां प्रगट व्हा.

४६ किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामित्वांद्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भूजेन सहस्त्रबाहो भव विश्वमूर्ते ॥

श्रीभगवानुवाच

४७ मया प्रसन्नेन तवार्जूनेदं रूपं परं दर्शितमात्म योगात् ।
तेंजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥

४८ न वेद यज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरूग्रैः ।
एवं रूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुंत्वदन्येन कुरुप्रवीर ॥

४९ मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वारूपं घोरमीदृङममेदम् ।
व्यपेतभोः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥

संजयउवाच

५० इत्यर्जूनं वासुदेवस्तथोक्त्वास्वकंरूपं दर्शयामास भूयः ।
आस्वासयामास च भीतमेनं भुत्वापुनः सौम्यवपुर्महात्मा ॥

---

**श्रीभगवान् म्हणाले** -- ४७ मी प्रसन्न होऊन तेजोमय, सीमारहित आद्य व श्रेष्ठ असें विराट स्वरूप माझ्या योग सामर्थ्यानें तुला दाखविलें. हें तुजवांचून यापूर्वी दुसऱ्या कोणीहीं पाहिलेलें नाहीं.

४८ हे कुरूश्रेष्ठा, वेदांच्या व यज्ञ विद्येच्या अध्यायनांनीं, दानांनीं विधियुक्त कर्मानीं किंवा उग्र तपांनीं माझें हें स्वरूप तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणालाही पाहतां येणें शक्य नाहीं.

४९ माझें हे घोर रूप पाहून तूं भिवूं नको व भ्रमिष्ट होऊं नको, भय सोडून संतुष्ट मनानें माझें तेंच पूर्वीचें रूप हें पुनः पहा,

**संजय म्हणाला** -- ५० या प्रमाणें भाषण करून वासुदेवानें अर्जूनाला पुनः आपलें स्वरूप दाखविलें आणि तो भ्याला आहे असें पाहून पुनः सौम्य देह धारण करून त्या महात्म्यानें त्याला आश्वासन दिलें,

अर्जुनउवाच –

५१ दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥

श्रीभगवानुवाच

५२ सुदुर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम् ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥
५३ नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवं विधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥
५४ भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवं विधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टु च परंतप ॥
५५ मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥

---

**अर्जुन म्हणाला** -- ५१ जनार्दना, हें तुमचें सौम्य मानवरूप पाहून माझें मन पुर्ववत् सावध व स्वस्थ झालें आहे.

**श्रीभगवान् म्हणालें** -- ५२ तूं पाहिलेलें हें माझें रूप पाहण्यास मिळणें फार कठीण आहे. देव सुद्धां हें माझें रूप पाहण्याची नेहमीं इच्छा करतात.

५३ माझें हें रूप जसें तूं पाहिलेंस तसें वेदाध्ययनानें, तपानें दानानें किंवा यज्ञानेंही कोणी पाहणें शक्य नाहीं.

५४ हे अर्जूना, अनन्य भक्तीनेंच या प्रकारें मला यथार्थपणें जाणणें, पाहणें व माझ्या ठिकाणीं प्रवेश करणें-मद्रुप होणें शक्य आहे,

५५ हें पांडवा, जो पुरुष माझ्या प्रीत्यर्थं सर्व कर्तव्यकर्मे करतो, मत्परायण होऊन राहतो, माझी भक्ति करतो व आसक्ति रहित असतो आणि कोणत्याच भूताचें ठायीं वैर करीत नाहीं तो मलाच येऊन मिळतो,



# अध्याय १८ वा.

## भक्ति योग.

जगांत परमेश्वराकडें वळून त्याची प्राप्ति करून घेतलेले दोन तऱ्हेचे लोक आढळतात, कांहींजण एकांतवासांत आत्मानंदांत मग्न होऊन बसलेले दिसतात, तर कांहीं जण जनकराजा प्रमाणें प्राप्त व्यवहार कर्म करीत असलेले पहावयास सांपडतात. दोन्ही प्रकारच्या लोकांनीं आत्मप्राप्तीकरतां प्रथम कष्ट सोसलेलेच असतात, तेव्हां या दोन प्रकारच्या पुरुषांत अधिक योग्यतेचा कोण आत्मप्राप्तीच्या मार्गांत कोण जास्त पुढें गेलेला असतो असा अर्जुनाने प्रश्न विचारला. तो विचारण्यांत त्याचा जसा हेंतु होता कीं, श्री कृष्णांच्या ठिकाणच्या विश्वरूप दर्शना प्रमाणें आपल्या ठिकाणीं विश्वरूप पाहता येण्या पर्यंत आपली नामस्मरणाच्या मार्गांत प्रगति झाली व " आत्मनि सर्व भूतानि " अशी आत्मप्रचीति झाली, म्हणजे मग सतत त्याच आत्मानंदांत राहूं कां आणखी अभ्यास करून पुढें जाण्यासारखा कांहीं आत्मप्राप्तीचा भाग शिल्लक असेल तर तो गांठण्याचा प्रयत्न सुरू ठेऊं ? "

याला श्रीकृष्णांचें असें उत्तर कीं, " जे एकनिष्ठ मनानें माझे भक्त होऊन प्राप्त व्यवहार करीत असतात, तेच खरे 'भक्त' या पदवीला पोंचलेले असतात. " जों पर्यंत साधक ब्रम्हानंदाचा उपभोग घेत असतो तो पर्यंत द्वैत कायम असतें; आंबा खात असतां जो पर्यंत तोंडांतील आंब्याची चव समजत असते, तोपर्यंत, आंबा व आंबाखाणारा असें दोन भाग वेगळेपणानें कायम असतात, पण आंबा खाऊन पोटांत गेला म्हणजे तो आत्मसात् होतो, मग त्याची वेगळी अशी चव उरत नाहीं--आंबा व आंबा खाणारा एकरूप होऊन जातात. म्हणून आत्मानंद घेतां घेतां आपण आत्मानंद घेत आहोंत याचाही विसर पडाला म्हणजे उन्मनी अवस्था प्राप्त होते व तीच खरी परमेश्वराशी होणाऱ्या तादात्म्याची पराकाष्ठा व तिलाच पारभक्ति असें म्हणतात. श्री समर्थांनीं दासबोधांत म्हणूनच

' विभक्त नव्हे तो भक्त ' असें सांगून ' भक्त म्हणजे कोण ' या प्रश्नाला उत्तर दिलें आहे. या स्थितीला पोचल्यावर आपण काय करतो आहोंत याची साधकाला जाणीव नसते; हीच सिद्धावस्था; हिलाच ब्राम्ही-स्थिति म्हणतात. हिचें वर्णन श्री तुकाराम महाराजांनीं, ' नाम घेतां पंढरीराया । मनासहित पालटे काया । असें स्वानुभवानें व यथार्थतेनें केलेलें आहे. नामस्मरणाला सुरवात केली म्हणजे, प्रथम ' नाम घेतां मन निवें । जिव्हें अमृतचि स्रवें ।। ही स्थिति होते व शेवटीं मनासुद्धां सर्व काया पालटून पूर्ण आत्मैक्याची अशी उन्मनी अवस्था प्राप्त होते. हीच ज्ञानाची पराकाष्ठा व हिलाच भक्ति असें म्हणतात; सर्व संकल्प विकल्प रहित याच स्थितीला संन्यास म्हणतात. कर्म चालू असतां आपण कर्म करीत आहो याची सुद्धां जेथें जाणीव नसते अशी ही खरी निष्काम कर्मयोगी अवस्था ! हिलाच निर्गुणत्वा पासून झालेला वियोग दूर झाल्यामुळें - देह बुद्धिची आत्मबुद्धि होऊन पूर्ण आत्मैक्यामुळें - योग किंवा युक्तस्थिति असें म्हणतात. ज्ञान, अकर्म, योगसन्यास व भक्ति हे आत्मस्थितीचें पर्याय शब्द आहेत; आत्मस्थिति प्राप्त करण्याचे ते मार्ग नाहींत, नामस्मरण हा एकच मार्ग आहे आणि त्यानें प्राप्त होणारा आत्मा हाही एकच आहे !

माझ्या ठिकाणीं बुद्धीयुक्त हो असें श्रीकृष्णानीं अर्जुनाला सांगितले; ' हे जर कठीण वाटत असेल तर त्याचा अभ्यास कर ' असें नंतर सुचविलें, अभ्यास होत नसेल तर नामस्मरण करीत कर्म कर असा उपदेश केला; नामस्मरणही जर होत नसेल तर कर्मफलाचा मनाने त्याग कर असा शेवटचा निकृष्ट मार्ग सुचविला आहे. शाब्दिक ज्ञानापेक्षां आत्मध्यान श्रेष्ठ व ध्याना पेक्षां ध्यान करीत असल्याची जाणीव नसणें ही अवस्था श्रेष्ठ व हिलाच उन्मनी किंवा कर्मफल त्यागी अवस्था असें म्हणतात. कर्म ब्रम्हार्पण हवो, असा मनानें संकल्प करून कर्म ब्रम्हार्पण करून कर्मफलाचा त्याग करणें वेगळें व उन्मनी अवस्थेंत सहजा सहजी न कळत कर्मफलाचा त्याग होणें वेगळें ! एक कनिष्ट पायरी व दुसरीं सर्व श्रेष्ठ पायरी ठरते. वास्तविक भक्ति ही उन्मनी अवस्थेतील श्रेष्ठ पायरी आहे व परमगति

त्या खेरीज प्राप्त होणार नाहीं. परंतु ' अकरणांत् मंदकरणं श्रेय: ' या न्यायानें अजीबातच कांहीं होत नसेल तर निदान कर्मफलत्यागाचा मनानें संकल्प तरी कर असा सल्ला श्रीकृष्णांनीं साधकाला दिलेला आहे. हाच या अध्यायाचा विषय गीतेचा समारोप म्हणून अर्जुनाला भगवंतांनीं सांगितलेला आहे.

मनांत पालट होणें व भौतिक शरीरांतही बदल होणें या दोन्हीं गोष्टीं कशा होतात. हें मी स्वत: प्रत्यक्ष पाहिलेलीं व अनुभवलेलीं दोन उदाहरणें सांगून खुलासा करतो म्हणजे ह्या अवस्थांचें स्वरूप नीट लक्षांत येईल.

इ. सन १९११ सालची गोष्ट. मी त्यावेळीं न्यू इंग्लिश स्कूल मध्यें पूणे येथें इंग्रजी तिसरी ईयत्तेंत शिकत होतो. त्यावेळीं बंगालमध्यें चक्रधरपूर या स्टेशनवर गुड्स क्लार्क म्हणून असलेले आमचे स्नेही रा. गोपाळराव अभ्यंकर नांवाचे, आमचें घरीं कांहीं दिवस राहण्यास म्हणून आले. हे स्वत: उत्तम हिप्नाटिस्ट – मोहिनी विद्या जाणणारे होते. त्यांचा शिष्य सब्जेंक्ट हा शहापूरला बेळगांवीं रहात असे. दर शनिवारीं संध्याकाळीं तें दोघेजण आत्मिक मनोमय मार्गानें एकमेकांना भेटत असत व ही भेट तीन तीन तास पर्यंत होत असे; अभ्यंकर पुण्याला आराम खुर्चींत पडून रहात व त्यांचा शिष्य शहापूरलाही त्याच प्रमाणें पडून राहीं. माझा स्वभाव जात्याच फार चिकित्सक. एका शनिवारीं संध्यांकाळी मी खेळायला न जातां मुद्दाम घरीं राहिलो, नेंहमींच्या नियमा प्रमाणें अभ्यंकर खुर्चींत पडून राहिले. कांहीं वेळानें मी हळूच त्यांचे जवळ गेलो व त्यांचा हात वर उचलून पुन: खालीं टाकला; तो हात प्रेताच्या हाता प्रमाणें जड स्थितींत खाली पडला, येवढ्यानेंही माझें समाधान झालें नाहीं, या लुच्च्याने हें ढोंग केलें असेल असें वाटून मी काड्याची पेटी घेतली व एक काडी ओढून अभ्यंकरांची सबंध करंगळी काडी विझे पर्यंत जाळलीं. त्या वेळीं त्यांना त्यांचें कांहींच ज्ञान झालें नाहीं. पुढें ते तीन तासानंतर शहापूरहून पुन: देह भानावर आले व तेव्हां पासून त्यांच्या करंगळीची आग होऊं लागली व थोड्याच वेळांत भाजल्याचा मोठा फोड्हो आला व तो त्याना बरेंच दिवस जाणवला.

वरील उदाहरणावरून कळून येईल कीं मनांत जरी बदल करतां आला तरी पार्थिव शरीरांत जोपर्यंत बदल करतां येत नाही तोपर्यंत ही मनाचीं स्थिति तात्पुरतीच असते, व तिचा उपयोग होत नाहीं. हिप्नाटिझम, मेस्मेरिझम, मोहिनी विद्या वगैरे अशातऱ्हेचे सर्व प्रकार मनुष्याला अधोगतीला नेतात. वरील अभ्यंकरांची पुढें मरतांना तशीच स्थिति झाली. अत्यंत वाईट दशेंत कुत्र्याच्या मौतीनें त्याना मरावें लागलें. असो, आतां मन व काया, हीं दोन्हीं कशीं पालटतात त्याचें उदाहरण सांगतो.

नवरात्रांत अष्टमीच्या दिवशीं रात्रीं मी एका देवीच्या ठिकाणीं गेलो होतो. कालीमाते समोर होमकुंड तयार करून त्यांत लाकडें घालून त्या कुंडाचें पूजन झालें व तूप ओतून तें यज्ञकुंड पुजाऱ्यानें पेटविलें. खूप मोठा जाळ होऊन सर्वकुंड पेटल्यावर तेथें दोघांच्या अंगांत देवीचा संचार झाला व हातांत उराशीं जळतां धगधगीत पोत घेऊन दोघेंहीं संचार स्थितींत नाचूं लागलीं व खेळतां खेळतां दोघेही कुंडांत शिरलीं: सुमारें दोन तासपर्यन्त कुंडांत नाचून सर्व विस्तवाची शेंवटीं राख झाली व मग ती विभूती सर्वांना प्रसाद म्हणून लावण्यांत आली. सुमारें शंभरावर मनुष्यें त्यावेळीं हजर असतील ! दुसरें दिवशीं मी मुद्दाम जाऊन संचार झालेल्यांचे पाय वगैरे कितपत भाजले आहेत हीं चौकशी केली, दोघांनीं हो पाय पुढें करून दाखविले व सांगितलें कीं आम्हांला कांहीं सुद्धां त्रास झालेला नाहीं. ते म्हणाले, 'अहो हे कुंड कांहींच नाहीं आमच्या देवीचें कोंकणांत मूळस्थान आहे. तेथें तर नवरात्रांत अष्टमीच्या दिवशीं शिमग्यांतील मोठ्या होळी प्रमाणें होमकुंड पेटवतात व तेंथील पुजारी संचार स्थितींत त्यांत बसून रसरसलेल्या निखाऱ्यांनीं डोक्यावरून स्नान करतो. सर्व ब्रम्हमय झाल्यावर तेथें कोण कोणाला भाजणार !

ही जी देवी संचार स्थिति होत असते ती उन्मनी अवस्थेचा नमूना म्हणून कल्पने करतां दाखवितां येईल. परंतु ही अवस्था फक्त संचार स्थिति पुरतीच असतें, ती शाश्वत नसते, म्हणून मन व शरीर दोन्हीं, संचार नाहिसा झाला म्हणजे पूर्व पदाला येतात

नामस्मरणानें उन्मनींत गेलेला मनुष्य, मनानें व शरीरानें कायमचा ब्रम्हेला असतो. तेलांत घातलेली वात पेटवल्यावर ज्योत निर्माण होतें व ही ज्योत पुनः तेलवात होऊं शकत नाहीं. तेलवात संपल्यावर ज्योतींत ज्योत मिसळून जाते. म्हणून संत म्हणतात कीं नामस्मरणानें आत्म ज्योतींत/ आत्म ज्योत मिसळून जातें, ते म्हणतात.

" प्रभु तेरा भेद न जानें कोई । भक्ती ज्योत में ज्योत मिलाई ।। अशी आत्म ज्योत तयार झाल्या नंतर श्री तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले या म्हणण्यांत अतिशयोक्ति वाटण्याचे कांहींच कारण नाही उन्मनी अवस्थेंतील देह सामान्य लोकांना जरी इतरांच्या देहाप्रमाणे पंच भौतिक वाटला. तरी नो वास्तविक तसा नसतो. तो ब्रम्हरूप, निर्गुण झालेला असतो. श्री ज्ञानेश्वरानीं भक्तांच्या समाधाना करतां आपण देह येथेंच ठेवतों असे सांगून लोकांना दिसण्या पुरतां आभासात्मक देह इहलोकीं ठेवल्याचें दाखवून जिवंत समाधि घेतल्याचें नाटक केलें व भक्ति परंपरा चालू ठेवली श्री तुकाराम महाराजांनां येवढेंही द्वैत खपलें नाहीं. " मेघवृष्टीनें करावा उपदेश । परंतु गुरूने करूं नये शिष्य " अशी त्यांची स्वभावतः शिकवण असल्यामुळें त्यांनीं जातानां आपला देह सुद्धां भक्ति वाढण्यां-करतां शिल्लक असलेला इहलोकीं दाखविला नाहीं ! यांचे नांव खरे ज्योतींत ज्योत मिसळणें ? व खरी अनन्य भक्ति, नुसती मनानें केलीं जाणारी भक्ति ही दगा देईल, व नुसतें पत्र पुष्प म्हणून मानून घेतलेले मनाचे समाधान शेवटीं टिकणार नाहीं. कांहीं कष्ट न घेतां नुसतें भक्ति या नांवाखालीं दडलेल्या लोकांना परमेश्वराचें चरण तर दूरच राहिलें, पण उलट पाठींत तोबा बसून " भला मारला तोबा । कंबर मोडली । " अशी पाळी न आली तर भाग्यच म्हणावयाचे ? म्हणून श्री समर्थांनीं बजाऊन ठेवलें आहे कीं, भोळा भाव सिद्धि जाव । हा तो अज्ञानाचा स्वभाव । तेणें देवाधिदेव पाविजेल कैसा ।।" म्हणून साधकानो, सावध रहा. पत्रं पुष्पं भक्तीला शब्दांनीं फसून जाऊ नका, देव भोळा नाहीं,तो महावस्ताद आहे. तो पत्रं पुष्पं स्वीकारतो. पण कोणाचे ? जें त्याच्याच योग्यतेचे ज्ञानी व भक्त बनले आहेत त्यांचेंच ? श्रीकृष्णानीं विदुरांच्या कण्या खाल्लया कारण विदुर पूर्ण ज्ञानी व भक्त बनलेले होते. त्यांनां सर्व विश्व ब्रम्हरूप झालेले होतें, मग त्याच्या

त तरी ' कण्या ' पण कोठें राहिला होता ? त्या कण्याही पच बनलेल्या होत्या. मग श्रीकृष्णांनी त्या खाल्या तर नवल काय ? त्रा दगडी परीस बनलेला असतो पण विभक्ताचे सोनेही दगड बनते त्याची काय ? म्हणून भक्तीचें नांव घेतांना फार विचार केला पाहिजे. ही आत्मज्ञान मार्गांतील शेवटची प्राप्ति आहे. तो सोपा मार्ग नव्हे ! ारण हा एकच मार्ग आहे आणि अत्यंत कष्टांनी मिळणारे असे हे त्याचें फळ आहें. सांगण्याचें तात्पर्य येवढेंच कीं, ' आमचा साधा भक्ति मार्ग ' असें म्हणून अव्हासवा विषयोपभोग डू नका. पुढें जड जाईल ! श्री तुकाराम म्हणून म्हणतात सुळा आहे. " बोले बोलता वाटे सोपें ! करणी करतां दोर ।। " ( वरची ओळी आहे )



# अध्याय १८ वा.

## भक्ति योग.

### अर्जुनउवाच

१ एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥
१।१२ अ.

### श्रीभगवानुवाच

२ मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥
२।१२ अ.

३ ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥
३।१२ अ.

४ संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहितेरताः ॥
४।१२ अ.

---

**अर्जुन म्हणाला** — १ या प्रमाणें निरंतर भजन – ध्यानांत रत होऊन जें भक्त तुमचें सगुण ब्रम्हाचें भजन करतात, आणि जें अव्यक्त अक्षराची, निर्गुण ब्रम्हाची उपासना करतात, त्या पैकीं अति उत्तम योगवेत्ते कोण ?

**श्रीभगवान् म्हणाले** — २ जे माझ्या ठायीं मन लावून आत्मबुद्धी युक्त होऊन परम श्रद्धेनें माझी सगुण परमेश्वराची ( कर्मरूप ) उपासना करतात तेच मला योग्यांत उत्तम योगी वाटतात.

३, ४, पण जें इंद्रियांचें संयमन करून सर्वत्र समबुद्धि, ठेवून, सर्व प्राणिमात्राचे हित करण्या विषयीं तत्पर होऊन अनिर्वाच्य, अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य, अविकार्य, अचल व नित्य अशा अक्षराची निर्गूण ब्रम्हाची उप सना करितात तेही मलाच प्राप्त होतात.

५ क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥
५।१२ अ.

६ ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥
६।१२ अ.

७ तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥
७।१२ अ.

८ तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥
७/८ अ.

९ अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥
१४।८ अ.

---

५ त्यांचे मन अव्यक्ताच्या ठिकाणीं आसक्त झाल्यामुळें त्यांना साधनांत अधिक कष्ट होतात. कारण देहबुद्धीच्या पुरूषांना अव्यक्ताची उपासना देहातीत निर्गूण व उन्मनी अवस्था प्राप्त करून घेणें फार कष्टानें साधते.

६ पण हे पार्था, आत्मबुद्धियुक्त होऊन जे – ( नामस्मरण करीत ) – सर्व कर्मे मला अर्पण करून अनन्य भावानें माझें स्मरण करीत उपासना करीत असतात ( कर्म करतांना उपासना चालू असते )

७ त्या मच्चित्त झालेल्या भक्तांचा मी या जन्ममरणरूप भवसागरांतून त्वरीत उद्धार करतो.

८ या करतां, सर्व काळीं, तूं माझेंच स्मरण करीत रहा आणि युद्धही कर. अशा रीतीनें आत्मयुक्तबुद्धी होऊन वागूं लागलास म्हणजे तूं मलाच प्राप्त होशील यांत संशय नाहीं.

९ हे पार्था, अनन्यचित्त होऊन सदा जो मज पुरुषोत्तमाचे निरंतर स्मरण करतो, त्या नित्ययुक्त योग्याला मी सहज प्राप्त होतो.

१० पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥
२६।९ अ.

११ यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥
२७।९ अ.

१२ शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्म बंधनैः ।
संन्यास योगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥
२८।९ अ.

१३ समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥
२९।९ अ.

१४ अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥
३०।९ अ.

---

१० जो कोणी भक्तीने मला पान, फूल किंवा पाणी अर्पण करतो त्या शुद्धचित्त मनुष्याचें तें भक्तीनें अर्पण केलेलें पदार्थ मी मोठ्या प्रेमानें खात असतो.

११ हे कौन्तेया, तु जे करतोस, जें खातोस, जें हवन करतोस, जें दान देंतोस व जे तप करतोस तें सर्व मला अर्पण कर - आत्मबुद्धि युक्त हो.

१२ या प्रमाणें केल्यानें शुभाशुभ फलरूपी कर्म बंधनापासून तूं मुक्त होशील आणि कर्मफलन्यासानें – कर्म करीत असतांही आत्मयुक्त होऊन, मुक्त होऊन मला येऊन मिळशील.

१३ मी सर्व भूतांमध्यें समान आहे, मला कोणी अप्रिय नाहीं किंवा कोणी प्रियही नाहीं. मला जें भक्तीने भजतात ते माझ्या ठायीं व मींही त्यांच्या ठायीं प्रत्यक्ष प्रगट असतो.

१४ जर कोणी अत्यंत दुराचारी असतांही अनन्य भावानें मला भजूं लागला तर तो साधूच मानणें योग्य आहे, कारण त्याची प्रवृत्ति सन्मार्गाकडे निश्चित झालेली असते.

१५ क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांति निगच्छति ।
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥
३१।९ अ.

१६ मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥
३२।९ अ.

१७ किंपुनर्ब्राह्मणाः पुण्याः भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥
३३।९ अ.

१८ मय्येव मन आधत्स्व मयिबुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥
८।१२ अ.

१९ अथ चित्तं समाधातुं न शक्तोषि मयि स्थिरम् ।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥
९।१२ अ.

---

१५ तो सत्वर धर्मात्मा होतो आणि शाश्वतशांतीला पोंचतो. हे कौन्तेया माझा भक्त कधीही नाश पावत नाहीं, हे तूं निश्चयानें जाण.

१६ कारण हे पार्था, माझा आश्रय केल्यानें स्त्रिया, वैश्य, शूद्र किंवा नीच कुळांत जन्मलेले चांडालादिकही परमगतीला पोंचतात.

१७ तर मग जे पुण्यवान ब्राम्हण किंवा राजर्षि माझें भक्त असतील त्यांना सद्गति मिळेल हे का सांगावे ? या करतां अनित्य व दुःखकारक अशा मृत्युलोकीं तूं जन्म पावला आहेस, म्हणून माझेच भजन कर.

१८ या करतां तूं माझ्याच ठायीं मन ठेव माझ्याच ठिकाणी बुद्धि स्थिर कर म्हणजे देहपातानंतर माझ्याच ठायीं येऊन वास करशील यांत संशय नाहीं.

१९ आतां माझ्या ठिकाणीं चांगल्या प्रकारें चित्त स्थिर ठेवणें तुला शक्य होत नसेल तर अभ्यास योगानें मला प्राप्त करून घेण्याची इच्छा कर,

२० अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यमि ॥
१०।१२ अ.

२१ अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥
११।१२ अ.

२२ श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥
१२।१२ अ,

२३ ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥
२०।१२ अ.

२४ अनन्याश्चिन्तयंतो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥
२२।९ अ.

---

२० असा अभ्यास करण्यासही तुं असमर्थ असशील तर सर्वकर्मे मंत्प्रीत्यर्थ कर; मदर्थं कर्मे केल्यानेंही तु मत्प्राप्तिरूप सिध्दि पावशील,

२१ आत्मबुध्दियुक्त होऊन आत्मस्थित होऊन मत्प्रीत्यर्थ कर्म करणें हेंही तुझ्यां हातून होत नसेल तर सर्व कर्मफलांचा त्याग कर.

२२ अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ट, ज्ञानांहुन ध्यान श्रेष्ठ, आणि ध्यानाहून कर्मफलत्याग श्रेष्ठ; कारण त्यागापासून त्वरित शांति प्राप्त होतें.

२३ जें श्रद्धावान् पुरूष मत्परायण होऊन या वर सांगितलेल्या अमृततुल्य धर्मांची उपासना करतात ते भक्त तर मला अतिशय प्रिय होतात.

२४ जे अनन्य भावाने माझें चिंतन करीत मला भजतात, त्या नित्य योगयुक्त पुरूषांचा योगक्षेम मी चालवितो ( प्रपंचनिर्वाह व परमार्थं निर्वाह ही मींच करतों )

२५ मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥
६५।१८ अ.

२६ इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥
६३।१८ अ.

२७ इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥
६७।१८ अ

२८ य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥
६८।१८ अ.

२९ न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥
६९।१८ अ,

---

२५ माझ्या ठायीं मन ठेव, माझी भक्ति कर, माझें यजन कर व मला वंदन कर, म्हणजे तू मलाच प्राप्त होशील हें सत्य मी तुला प्रतिज्ञा करून सांगतो, कारण तूं मला अत्यंत प्रिय आहेस.

२६ या प्रमाणें गुह्यांतलें गुह्य ज्ञान मी तुला सांगितलें. आंतां याचा पूर्ण विचार करून तुझ्या ईच्छेस येईल तसें तूं कर.

२७ हें गुह्यज्ञान तपोहीनाला, अभक्ताला, ऐकण्याची इच्छा नसणाऱ्याला व माझा मत्सर किंवा निंदा करणाऱ्याला केव्हांही सांगू नको.

२८ जो मनुष्य माझ्या ठिकाणीं अत्यंत प्रेम करून, माझें परम गुह्य ( गीताशास्त्र ) माझ्या भक्ताला सांगेल, तो निःसंशय मलाच येऊन मिळेल.

२९ त्याच्यां पेक्षां माझें अधिक प्रिय कार्य करणारा सर्व मनुष्यांमध्यें दुसरा कोणीही नाहीं आणि त्याच्याहून अधिक आवडता यां पृथ्वीवर दुसरा कोणीही होणार नाहीं.

३० अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥
७०।१८ अ.

३१ श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥
७१।१८ अ.

३२ कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेणचेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥
७२।१८ अ.

अर्जुनउवाच

३३ नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥
७३।१८ अ.

---

३० तसेंच आमच्या दोघांच्या या धर्ममय संवादाचे - गीतेचें जो कोणी अध्ययन करील त्यानें ज्ञानयज्ञानें माझें पूजन केलें असे मी मानीन,

३१ श्रद्धायुक्त व दोषदृष्टि रहित होऊन जो कोणी नुसतें श्रवण करील, तोही सर्व पापापासून मुक्त होऊन पुण्यवानांच्या उत्तम लोकांप्रत पावेल.

३२ हे धनंजया, तूं हें एकाग्रचित्तानें ऐकलेस ना ? आणि तुझा अज्ञानजनित मोह आतां निखालस गेला ना ?

**अर्जुन म्हणाला** – ३३ हे अच्युता, तुझ्या प्रसादानें मोह नष्ट झाला. मला ( कर्तव्याची ) स्मृति उत्पन्न झाली. माझा संशय फिटून मी सावध झालों. आतां मी तुमच्या आज्ञेप्रमाणें वर्तन ( युद्ध ) करीन.

संजयउवाच

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥
७४।१८ अ.

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥
७५।१८ अ,

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥
७६।१८ अ.

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥
७७।१८ अ,

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवाः नीतिर्मतिर्मम ॥
७८।१८ अ,

---

**य म्हणाला** — ३४ या प्रमाणें वासुदेव व महात्मा अर्जुन यांचा हा अद्भुत, रहस्ययुक्त व रोमांचकारक संवाद मी ऐकला.

श्री व्यासांच्या कृपेनें दिव्य दृष्टि प्राप्त होऊन हे परमगुह्य - योग ज्ञान प्रत्यक्ष योगेश्वर श्रीकृष्ण सांगत असतां. मला ऐकावयास मिळालें.

हे राजा, श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या या अद्भुत व पुण्यकारक संवादाचें पुनः पुनः स्मरण करून मी वारंवार हर्षित होत आहे.

तसेंच, हे राजा, श्रीकृष्णाच्या त्या अत्यद्भुत विश्वरूपाचें पुनः पुनः स्मरण करून मला मोठा विस्मय होत आहे व वारंवार हर्ष होत आहे.

जेथें योगेश्वर श्रीकृष्ण आणि जेथें धनुर्धर पार्थ आहे, तेथेंच अचल लक्ष्मी, विजय, ऐश्वर्य आणि नीति ठेवलेलीच आहेत असे माझें मत आहे.



# उपसंहार.

आदी बिज एकलें । बिज अंकुरलें रोप वाढलें ॥
एका बीजापोटीं तरु कोटी । जन्म घेती सुमनें फले ॥
व्यापुनि जगता तूंहि अनंता । बहुविध रूपें घेसी ॥
परी अंतीं ब्रह्म एकलें ॥ आदीं बिज एकलें ॥

प्रत्येक मनुष्य व जीवमात्र हा परमेश्वरच आहे, म्हणजे आत्मचैतन्य आहे. आत्म्याच्या निर्गुण शक्तीला चिदाकाश असें म्हणतात व मानवांतीला सगुण शक्तील हृदयाकाश असे म्हणतात. आकाश हा शब्द शक्तीचा द्योतक आहे. मनुष्य पंच ज्ञानेंद्रियांनीं सगुणत्वाचा अनुभव घेऊन आपल्या हृदयाकाशांत त्याची मन म्हणून सांठवण करीत असतो. याचाच अर्थ हृदयाकाशाची सांठवण चिदाकाशांत होत असते; म्हणजे मानवांतील निर्गुणबुद्धि सगुण बनते; म्हणून मानवी मन जड आहे. मनाचा व्यापार सगुणबुद्धीच्या आधारावर चालतो; याचाच अर्थ मनाची क्रिया होतांना श्वासनिरोधन व्हावें लागतें, व त्यामुळें पांचीं ज्ञानेंद्रियांनीं घेतलेला अनुभव पुनः मनांत आणतांना श्वासाच्या स्थलकाळाच्या बंधनामुळें फक्त आकाशतत्वातच नामरूपात्मक घेतां येतो व म्हणून तो मूळच्या अनुभवाच्या एक पंचमांश अनुभव असतो. अशा रीतीनें मानवी मनाची इच्छाशक्ति अपूर्ण ठरते, व जरी या इच्छाशक्तीचा आधार परमेश्वरच म्हणजे निर्गुणबुद्धीच असते तरी परमेश्वराच्या संकल्पामुळे हें अपूर्णत्व नाटकांतील नटाप्रमाणें निर्गुणबुद्धीनें पत्करलेलें असतें, विश्वांतील प्रत्येक वस्तूंत शक्ति असते पण त्या शक्तीवर त्या पदार्थाची सत्ता नसते. सूर्याच्या तेजावर सूर्याची सत्ता नाहीं, दगडांतील शक्तीवर दगडाची सत्ता नाहीं या सर्व विश्वावर आत्म्याची सत्ता आहे. मनुष्याला स्वतःला आपली अशी वाटणारी शक्ती हिच्यावरही आत्मचैतन्याचीच

सत्ता असते तिच्यांतील अपूर्णत्व आत्म्याच्या संकल्पत्वानें उत्पन्न झालेलें असतें. हेंच एकाच वेळीं पूर्णत्वांत व अपूर्णत्वांत असण्याचें सामर्थ्य परमेश्वराच्या निर्गूणत्वाचें द्योतक आहे या निर्गुणत्वामुळेंच परमेश्वर पूर्ण आहे व त्याची सत्ताही पूर्णच आहे. मनुष्याला कार्यांचे वेळीं आपल्या शक्तीची जाणीव होते. व मग तो त्या शक्तीच्या आधारावर कार्य करतो. त्याच प्रमाणें शिवशक्ति एकरूप असलेल्या आत्म्याला विश्व-उत्पन्न करतांना आपल्या निर्गुण शक्तीची जाणीव होते व त्या पूर्ण सामर्थ्यांतून परमेश्वर आपलें विश्वनाटकाचा खेळ सुरू करतो. माणसाची शक्ति ज्याची त्यालाच कळते; त्याच प्रमाणें परमेश्वराची निर्गूण पूर्ण शक्तीही परमेश्वरालाच कळते. म्हणून आत्मा स्वसंवेद्य आहे, असे म्हणतात. हेंच ज्ञानेश्वरांनीं, "उभय संगु पहिलें । बुद्धितत्त्व प्रसवलें ॥" यांत दिग्दर्शीत केलें आहे' यांतून पुढें अष्टधा प्रकृति उत्पन्न झाली व या अपरा प्रकृतींतील हेच निर्गुण बुद्धितत्व सगुणत्वामुळें मर्यादित झाले. ज्ञानेश्वर म्हणतात " एऱ्हवी सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी । जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । तें वस्तु गा मी ॥." भावार्थ हाच कीं, चिदाकाशच हृदयाकाश बनतें. म्हणजे आत्माच विज्ञानमय होतो. हा विज्ञानमय आत्मा नामांतील चित् शक्तीनें पुनः ज्ञानमय होतो, म्हणून श्री तुकाराम महाराज म्हणतात " लपलासी तरी नाम कोठें नेशी । आम्ही अहर्निशीं तेंचि घोकूं."

हाच सर्व विषय आतां पर्यंत विस्तारपूर्वक सांगितला, परमेश्वर मनुष्य, ज्ञान व विज्ञान, अकर्म व कर्म, योग व वियोग, संन्यास व अहंकार; भक्ति व विभक्ति, अक्षरपुरुष व क्षरपुरुष, पुरुष व प्रकृति, क्षेत्रज्ञ व क्षेत्र, निर्गुणत्व व सगुणत्व हें सर्व पूर्णत्व व अपूर्णत्व यांचेच निदर्शन आहे. केवळ ॐकारांतून सगुण एकाक्षर ब्रम्ह निर्माण होतें आणि नामस्मरणानें पुनः बुद्धि केवळ ॐ कारांतच स्थिर होतें. म्हणून अर्जुनाने शेवटीं श्रीकृष्णांना पूर्णत्वानेच नमस्कार केला आहे. " नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व ॥" यांत अष्टधा प्रकृतीचा नमस्कार दिसून येतो व यालाच खरा साष्टांग नमस्कार म्हणतां येईल. याचेंच वर्णन श्री तुकारामांनीं " नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥" या

अभंगवाणींत करून जगाला सदेह रामराम ठोकून त्यांनीं आत्माराम मिळवला आहे.

अशा रीतीनें आत्माच प्रथम निर्गुण बुध्दि, नंतर सगुण बुध्दि मग सगुण मानवी मन बनतो व परत माघारी फिरून नामांतील शक्तीनें निर्गुण मन व निर्गुणबुध्दि बनून पुन:. आत्म्यांतच लीन होतो. "ईश्वर सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति" अशी आत्मज्ञानाची सुरवात करून श्रीकृष्णांनीं " सर्वस्य चाहंहृदि संन्निविष्ठो " यांतच आत्मज्ञानाची समाप्ति केली आहे, व हाच,

**"श्रीकृष्णांचा आत्मसाक्षात्कार" भगवद्गीतेंत अभिप्रेत आहे !**



# " सुबोध-गीता कार्यालयाचीं "

## आगामी प्रकाशन

(१) श्री गुरुचरित्रांतील

" श्री नरसिंह – सरस्वतींचा आत्मसाक्षात्कार "

( प्रस्तावना लेखक – श्री प्रभुदास आप्पासाहेब महाराज देशपांडे, )
बी. ए. एल. एल्. बी

(२) श्री ज्ञानेश्वरीतील " आत्मसाक्षात्कार "
( ५०१ ओव्यांत नित्यपाठाकरतां ज्ञानेश्वरीसार )

(३) सुबोध–ज्ञानेश्वरी
( सुबोध – गीता प्रमाणें ओव्याची विषय वर्गवार मांडणी )

(४) बाल–गीता

(५) श्री दासबोधांतील " आत्मसाक्षात्कार "